# कर्तव्याची हाक


: लेखक :

साने गुरुजी



दि महाराष्ट्र ग्रंथ भांडार, लि०, मुंबई ४

मूल्य ४ रुपये

चित्रकार : **रघुवीर मुळगांवकर**

प्रकाशक : **शं. वा. कुलकर्णी,** महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४.

मुद्रक : **बाळकृष्ण दत्ताजी खडपे**

मुद्रणस्थळ : **नीलिमा प्रिंटिंग प्रेस,** ४६, खोताची वाडी, गिरगांव, मुंबई ४.

निर्माते : **बा. द. सातोस्कर,** सागर साहित्य प्रकाशन, १४ त्रिभुवन रोड मुंबई ४.

# प्रास्ताविक

१५ ऑगस्ट १९४७ रोजी देश स्वतंत्र झाला. परंतु दुखंड जमीन स्वतंत्र झाल्यामुळें त्याची अपार किंमत द्यावी लागली. लाखों निर्वासितांची रीघ झाली. जगांत कधीं घडलें नाहीं असें स्थलांतर झालें. हिंदु आणि मुसलमान यांच्यांतील द्वेष पराकाष्ठेला जाऊन पोंचला. नवीनच मुक्त झालेल्या देशाला हें धर्मान्धतेचें विष ग्रासून राहिलें होतें. हें विष पचवायला महात्माजी शिवशंकराप्रमाणें उभे राहिले. राष्ट्राला प्रेमस्नेहाचें अमृत देण्यासाठीं राष्ट्रपिता हातांत प्राण घेऊन धडपड करीत होता. त्यांतच त्यांचा करुण वध झाला. जातीयवादानें पृथ्वीमोलाचा बळी घेतला.

मी कर्तव्य सायंदैनिक त्यावेळेस सुरू केलें. जातीय वृत्ति स्वतःच्या जीवनांतून व समाजाच्या जीवनांतून जावी म्हणून त्यावेळेस मी एकवीस दिवसांचा उपवास केला होता. त्या उपवासांतच हें सायंदैनिक मी चालवीत होतों. देश स्वतंत्र झालेला, राष्ट्रपिता निघून गेलेला, अशा वेळेस आपलें कर्तव्य काय तें नम्रपणें परंतु निर्धारानें जनतेसमोर मांडण्यासाठीं कर्तव्य दैनिक जन्मलें. तें जेमतेम चार महिने चाललें. पुढें बंद करावें लागलें. तें पुन्हां केव्हां तरी सुरू होणार आहे. तोंवर कर्तव्याचें काम साधना साप्ताहिक करीत आहे.

कर्तव्य चालवीत असतांनाच अनेक मित्र म्हणाले कीं यांतील लेखांचें पुस्तक होणें आवश्यक आहे. कर्तव्य हें सायंदैनिक होतें. मुंबईतच खपे. बाहेर फारसें जात नसे. त्यामुळें त्यांतील लेख अनेक ठिकाणच्या अनेक मित्रांना पुस्तकरूपानें हवे होते. म्हणून हें पुस्तक प्रसिद्ध होत आहे.

हिंदुस्थानांत स्वराज्य आलें. परंतु तें स्वराज्य गरिबांचें करायचें आहे. महात्माजी दिल्लीच्या एका प्रार्थनाप्रवचनांत म्हणाले, " स्वतंत्र हिंदुस्थान एक दिवसहि आर्थिक विषमता सहन करणार नाहीं. " महात्माजींनीं सुचविलें होतें आचार्य नरेन्द्रदेवांना किंवा जयप्रकाशांना राष्ट्रसभेचे अध्यक्ष करा. परंतु राष्ट्रपित्याची गंभीर सूचना दूर सारण्यांत आली. आणि त्यांच्या वधानंतर

राष्ट्रसभेची नवी घटनाच अशी करण्यांत आली कीं समाजवादी पक्षास पक्ष म्हणून तेथें राहतां येऊं नये. एका व्यापक बंधनांत अनेक पक्षोपपक्षांना एकत्र वागवून ब्रिटिश सत्तेशीं लढणारी असें स्वरूप राष्ट्रसभेचें राहिलें नाहीं. जरी तिनें राष्ट्रसभा हें नांव सोडलें नाहीं तरी एक पक्ष असेंच तिचें आतां स्वरूप झालें. समाजवादी दूर झाले.

आज देशाला समाजवादी पक्षच तारील अशी माझी निश्चित खात्री झाली आहे. पंडित जवाहरलाल नेहरू राष्ट्रसभापक्षांत असले तरी तेवढ्यानें तिला समाजवादी रंग चढत नाहीं. जवाहरलालजी म्हणूनच एका व्याख्यानांत म्हणाले, " मीहि सरकारांत नसतो तर या सरकारावर टीका केली असती. " नफावांटणीची जी योजना प्रसिद्ध झाली आहे ती का पंडितजींच्या मताप्रमाणें असेल ? ज्या नफावांटणीच्या योजनेनें कामगारांना वांटायलाच जवळजवळ कांहीं रहात नाहीं, ती का पंडितजींच्या हातची ? कारखानदारांनी गंगाजळी म्हणून ठेवलेल्या कोट्यवधि रुपयांवर सहा टक्के व्याज द्यायचें हा कोटला प्रकार ? आधीं यांना व्याजें द्यायचीं कीं आधीं कामगारांचा हिस्सा बाजूला काढायचा ? साऱ्या फाल्तु योजना. मुंबई सरकारनें शेतीच्या बाबतीत ५० एकरांहून अधिक जमीन कोणाजवळ नको म्हणून बिल आणलें. परंतु ही अधिक जमीन विकत कोण घेणार ? शेतीवर मजुरी करणाऱ्याजवळ जमीन विकत घेतां येईल इतके का पैसे शिल्लक असतात ? झाडाचा पाला नि कडू कंद खाणाऱ्या वारली लोकांजवळ शेतजमिनी विकत घ्यायला कोठून पैसा ? श्री. मुरारजीभाई म्हणतात " शेतकऱ्यांनीं काटकसर करावी नि पैसे शिल्लक टाकावे. " बाबारे, कोटली चैन तो राबणारा शेतमजुर करीत असतो ? ज्याच्या अंगावर कपडा नाहीं, मुलें उपाशीं, उघडीं, त्यानें शिल्लक कसली ठेवायची ? असें बोलणें म्हणजे दुःखावर मीठ चोळणें होय. जमीन अधिक असेल ती काढून घ्या. ज्यांना नाहीं त्यांना देऊन टाका. त्या जमिनीची किंमत मालकाला द्यायचीच असेल तर ती सरकारनें द्यावी. पंचवीस वर्षांच्या हप्त्यानें वसूल करावी. आज कोठून आणणार तो मजूर पैसा ? फाल्तू योजना. पंडित जवाहरलालजींकडे बोट दाखवतात नि असल्या टाकाऊ योजना अधीर नि कंठीं प्राण आलेल्या श्रमजीवींसमोर ठेवतात. राष्ट्रसभेंत भांडवलशाही

वृत्तीचाच पगडा आहे. आणि म्हणून समाजवादी पक्षच गरिबांचें राज्य आणूं शकेल. राष्ट्रसभाच समाजवाद आणील असें कोणी म्हणतात. समजा तिच्या द्वाराच यायचा असला तरीहि समाजवादी पक्षासारखा निर्मळ, ध्येयवादी पक्ष पाठीशीं दुमणें लावायला नसेल तर राष्ट्रसभेच्या हातून ती गोष्ट व्हायला कित्येक वर्षें लागतील.

एकीकडे भांडवलशाही रंग असणारी राष्ट्रसभा व दुसरीकडे लालरंगी रशियानिष्ठ कम्युनिस्ट. यांच्यामध्यें समाजवादी पक्ष उभा आहे. कांहीं राष्ट्रसभावाले मुद्दाम म्हणत असतात कीं कम्युनिस्ट आणि समाजवादी एकच ! एक तर हे धडधडीत खोटें बोलत असावेत किंवा मूर्ख तरी असावेत. कम्युनिस्ट आणि समाजवादी यांच्यांत दोन ध्रुवांचें अंतर आहे.

| कम्युनिस्ट | समाजवादी |
|---|---|
| १ साधनशुद्धीचा सवालच नाहीं | १ साधनशुद्धीवर स्पष्ट भर |
| २ लोकशाहीवर विश्वास नाहीं | २ लोकशाही मार्गावर श्रद्धा |
| ३ सदैव रशियाधार्जिणें धोरण | ३ राष्ट्राचें स्वतंत्र धोरण |
| ४ सदैव फुटीर वृत्ति वाढविणें | ४ राष्ट्रीय वृत्ति वाढविणें |
| ५ सर्वत्र रशियाच्या नेतृत्वाखालीं प्रयोग व्हावे | ५ त्या त्या राष्ट्रांनीं इतर राष्ट्रांशीं विचारविनिमय करून आपापले समाजवादी प्रयोग करावे |
| ६ हिंदुस्थानांत अनेक राष्ट्रे आहेत असें म्हणतात. प्रांतांना फुटून निघण्याचाहि अधिकार हवा म्हणतात | ६ समाजवादी द्विराष्ट्र सिद्धान्तहि मानीत नाहींत, मग अनेक राष्ट्रे हिंदुस्थानांत आहेत म्हणणें दूरच |

असे किती तरी महत्त्वाचे भेद दोघांत दाखवितां येतील. जगांतील समाजवादीहि एकत्र जमतात. परंतु एखाद्या राष्ट्राची दुसऱ्यावर हुकमत चालावी म्हणून नव्हे. विचारविनिमय करतात. एक प्रकारची मोकळी देवाण घेवाण ती आहे. जगांतील त्या त्या राष्ट्रांच्या विशिष्ट वृत्तिप्रवृत्ति असतात. समाजवाद निरनिराळ्या ठिकाणीं परिस्थित्यनुरूप निरनिराळें रूप धारण करील. आत्मा एक असेल. बाहेरचें रंगरूप निराळें असणें शक्य आहे. समाजवाद म्हणजे आजचा स्टॅलिनी साचा असें नव्हे.

समाजवादी पक्ष राष्ट्रीय असून आंतरराष्ट्रीय वृत्तीचाहि आहे. महात्माजींचें हेंच वैशिष्ट्य होतें. भारताचें असूनहि ते विश्वाचे हृदय झाले होते.

महाराष्ट्रांत बहुजनसमाजवादी पक्ष म्हणून एक आहे. परंतु हा पक्ष प्रांतापुरता आहे. समाजवादी पक्ष हा राष्ट्रसभेप्रमाणें देशव्यापी आहे. लौकरच राष्ट्रसभेप्रमाणें लाखों सभासद देशभर करून राष्ट्रव्यापी समाजवादी संघटना तो उभारील. पुनः बहुजनसमाजवादी कम्युनिस्टांशीं हस्तांदोलन करणारे आहेत. आणि कम्युनिस्ट तर या राष्ट्रांत सुव्यवस्थित कारभार कधीं चालूं नये या धोरणाचे. कम्युनिस्टांचें सर्व देशांत एकच धोरण आहे. तो तो देश जर रशियाधार्जिणा नसेल तर तेथें दंगेधोपे, अस्वस्थता, फाटाफुटी सतत चालतील असें करावयाचें. कम्युनिस्टांच्या धोरणाचा उलगडा ही त्यांची दृष्टि लक्षांत आली म्हणजे पटकन होतो. बहुजनसमाजवादी पक्षाच्या एका प्रमुख पुरस्कर्त्यानें मुंबईच्या संयुक्त महाराष्ट्राच्या प्रचारसभेंत सांगितलें, " महाराष्ट्राला हिंदीसंघराज्यांतून फुटण्याचाहि अधिकार हवा. नवराबायकोचें भांडण झालें तर काडीमोडीचा हक्क आतां मिळाला आहे. " जणूं राष्ट्राचा प्रश्न म्हणजे नवराबायकोचें भांडण! राष्ट्र वस्तु इतकी का स्वस्त आहे बापा? भाषावार प्रांत होणें निराळें, आणि प्रान्तांनीं स्वतःला स्वतंत्र राष्ट्र समजून अलग होण्याचा हक्क मानणें निराळें. हिंदुस्थानातील प्रान्त म्हणजे का स्वतंत्र राष्ट्रें? म्हणजे मरहूम जिनासाहेबच बरोबर एकंदरींत? हिंदुस्थान म्हणजे अनेक राष्ट्रें असलेलें एक खंडच आहे असें प्रतिगामी ब्रिटिश म्हणतात तेंच खरें कीं काय? रशियाच्या घटनेंत फुटून जायचा म्हणे अधिकार आहे! रशियाची मध्यवर्ति सत्ता अशी प्रचंड शक्तिशाली आहे कीं कोण रे बाबा फुटून जाईल? उद्यां दिल्लीसरकारजवळ अशी कोणती सत्ता आहे कीं तुम्ही सर्व प्रान्त फुटून जायचें म्हणाल तर तुमच्यावर दोष आणील? पाकिस्तान झालें, तोच किस्सा तुम्हीं गिरवणार वाटतें? भारताचें हृदय एक आहे. हात का देहापासून कधीं अलग होतो?

तुमचें आमचें भाग्य की ३० कोटींचें राष्ट्र अजून उरलों आहोंत. युरोपांत छोटीं छोटीं राष्ट्रें आहेत तसें करण्याची का अवदसा या लोकांना आठवली आहे? या छोट्या राष्ट्रांची काय दुर्दशा होते तें मागच्या महायुद्धांत दिसूनच आलें.

बहुजनसमाजवादी कम्युनिस्टांच्या फुटीर धोरणांत कसे गुंतत आहेत तें यावरून दिसेल. महाराष्ट्रांतील जनतेनें याचा गंभीरपणें विचार केला पाहिजे. हिंदी संघराज्यांतून फुटण्याचाहि आम्हांस हक्क आहे असें म्हणत असाल तर तुमच्या वाऱ्यासहि आम्ही उभे राहूं इच्छित नाहीं असें महाराष्ट्रानें या फुटीर लोकांस स्पष्ट बजावलें पाहिजे. तुमचा म्हणावें होईल खेळ, राष्ट्राचा जाईल जीव. या देशाचे किडवडे झाले तेवढे का पुरेसे नाहींत?

समाजवादी पक्ष राष्ट्रव्यापी पक्ष आहे. निर्मळ साधनांनीं, लोकशाही मार्गानें जाणारा आहे. श्रमणाऱ्यांचें राज्य व्हावें म्हणून धडपडणारा आहे. राष्ट्राची आणिबाणीची स्थिति लक्षांत घेऊन वागणारा आहे. राष्ट्रीय असून आंतरराष्ट्रीय आहे. भाषावार प्रांतरचना करा म्हणणारा परंतु फुटून निघायचा अधिकार नाहीं असें स्पष्ट सांगणारा हा पक्ष आहे. म्हणून या पक्षाचा मी सभासद नसलों तरी त्याच्यासाठीं मी प्रार्थना करतों. तोच भारताला तारील, तोच महात्माजींच्या ध्येयाला अधिक जवळचा आहे अशी प्रामाणिक डोळस श्रद्धा बाळगतों.

जातीयता, धर्मांधता, सर्व प्रकारची संकुचितता नि क्षुद्रता याच्याविरुद्ध जास्तींत जास्त कोणी प्रचार करीत असल तर समाजवादी पक्षच होय. हें राष्ट्र सर्वांचे, सर्वांना येथें संधि, हें अत्यंत प्रामाणिकपणें समाजवादी पक्ष मानतो. हिंदुस्थानची राष्ट्रभाषा हिन्दुस्थानी असावी असें महात्माजी म्हणत. जवाहरलालजींचें तेंच मत. समाजवादीहि तेंच प्रतिपादितात. ज्याची दृष्टि आम जनतेकडे असते तो हेंच बोलेल. युक्त प्रान्तीय विधिमंडळांत केवळ संस्कृतप्रचुर बोलाल तर मुसलमानभाईंना कसें कळणार? आपण बोलूं तें सर्वांना समजेल ही तरी इच्छा हवी ना? कां बोलणें हें अहंकारासाठीं आहे? भाषा दुसऱ्यांच्या हृदयाला पोंचण्याचें साधन आहे. महात्माजी जनतेला दैवत मानतात. हा धर्म का तो धर्म सवाल नाहीं. मानवतेचा प्रश्न. खरा धर्म सर्वांना सांभाळण्यांत, सर्वांना संधि देण्यांत आहे. माझ्या विकासाला वाव नाहीं असें कोणासहि वाटतां कामा नये.

मी कोणत्याहि दृष्टीनें विचार करूं लागलों, पाहूं लागलों तरी समाजवादी पक्षच तारक म्हणून समोर रहातो. या समाजवादी पक्षाला येऊन मिळा अशी

कर्तव्याची हांक आहे. लोकशाही समाजवाद असणें हा आजचा युगधर्म आहे. व्यक्तीला केवळ यंत्र बनवणारी, वैयक्तिक स्वातंत्र्याचा अपहार करणारी हुकुमशाही नको, भांडवलशाही लोकशाहीहि नको–तर शेतकऱ्यांत, कामगारांत, मध्यमवर्गीयांत जागृति निर्मून, त्यांची सेवा करीत, त्यांची संघटना करीत लोकशाही समाजवाद आणणें यांत तरणोपाय आहे. महाराष्ट्रीय जनता, नवयुगाचा अर्थ समजून घेणारी महाराष्ट्राची नवीन तरुण पिढी तरी क्षुद्र बुद्धिवाद टाळून, सर्व संकुचितता दूर करून, कोणत्याहि प्रकारची जातीयता मनांत न आणतां समाजवादी पक्षाला मिळून समाजवादीपक्ष सत्सामर्थ्यानें संपन्न करून हिंदुस्थानांत एक प्रयोग करायला उभी राहील अशी आशा नि श्रद्धा मी मनांत बाळगतों तर खरी. होणें जाणें विश्वशक्तीच्या भारतभाग्यविधात्याच्या हातीं. कर्तव्य करणें एवढेंच आपलें !

**मेधाभुवन, पार्शी कॉलनी,**
**दादर, मुंबई**
२५ ऑक्टोबर–१९४८

**पां. स. साने.**

## कर्तव्याची कहाणी नि महात्माजींना कृतज्ञतांजलि

मी मुंबईत राष्ट्रसेवादलाच्या मेळाव्यासाठीं १९४७ च्या डिसेंबरांत आलों होतों. परंतु तो महान् मेळावा आयत्या वेळेस रद्द केला गेला. मी परत जाणार होतों, परंतु २९ डिसेंबरचा संप होता. मित्रांबरोबर शांतताफेरींत मीहि हिंडलों. मुंबईत राहणें वाढलें. आणि मुंबई कॉर्पोरेशनच्या निवडणुका आल्या. येथील कारभारांत कायापालट व्हावा, येथील कारभाराची गरिबांच्या वस्तीकडे आधीं दृष्टि जावी या उदात्त हेतूनें समाजवादी पक्ष स्वतंत्रपणें निवडणुकीस उभा राहिला. परंतु थोरामोठ्यांचा गहजब त्याच्यावर होऊं लागला. मला वेदना झाल्या. गेले सहा सात महिने जवळ जवळ मी निवृत्तवत् होतों. पंढरपूरच्या उपवासाचीहि झालेली विटंबना मला सहन झाली नव्हती. आपण रामनाम म्हणत दूर रहावें असें वाटे. परंतु मी पुन्हां ओढला गेलों.

मी मुंबईत समाजवादी पक्षाचा निवडणुकप्रचार करूं लागलों. मी माझें सरळ अंतःकरण सर्वत्र ओतूं लागलों. समाजवादी पक्ष पत्रकें काढी, त्यांच्या सभा होत. परंतु कोठल्याहि वर्तमानपत्रांत त्यांना फारसें स्थान नसे. अनेक मालकांनीं "खबरदार त्या समाजवाद्यांचें कांहीं लिहाल तर" अशा संपादकांना तंब्या दिल्या. सर्वत्र भांडवलशाहीचे वेढे राष्ट्रीय जीवनाला करकचून टाकीत आहेत. मी माझ्या बाळगोपाळ मित्रांना म्हटलें, "एखादें पत्र काढा. आजकाल दैनिकाशिवाय तरणोपाय नाहीं. मी खान्देशांत १९३८ मध्यें पै जवळ नसतांना काँग्रेस साप्ताहिक सुरू केलें. तसें येथें आपण करूं. सारे लेखक अवैतनिक. अंक खपवणारीं आपलींच माणसें. असे कष्ट करूं नि दैनिक सुरू करूं. सदैव अडचणींचे डोंगरच समोर उभे कराल तर कार्याला आरंभ कधींच होणार

नाही. जा, सायंदैनिकाची सरकारदरबारीं घोषणा करून या. त्यांची परवानगी आणा."

पत्राचें नांव काय? मी म्हटलें "कर्तव्य." निवडणुकींत नागरिकांचें कर्तव्य काय तें सांगण्यासाठीं तर हा आरंभ होत आहे. आणि कर्तव्याची जाणीव कोणाला आहे? कर्तव्य म्हणजे करायला योग्य तें. आज आपणांस कोणती गोष्ट करणें उचित, कोणती अनुचित याचें भान नाहीं. मोठी दृष्टि जणुं सार्वजनिक जीवनांतून गेली आहे. सारें जीवनच काळ्याबाजारानें भरलें आहे असें दिसतें. सर्वत्र बुजबुजाट आहे. नफेबाजीचा बुजबुजाट, जात्यंधतेचा बुजबुजाट. अशा वेळेस "एष पन्था, नान्यः पन्था विद्यते अयनाय" असें जनतेस नम्रपणें परंतु निर्धारी वाणीनें सांगणें प्राप्त आहे. म्हणून आपल्या या पत्राचें नांव कर्तव्य ठेवूं.

१९४८–३० जानेवारीच्या आधींच्या आमच्या या हालचाली. परंतु ३० जानेवारी हिंदुस्थानच्या इतिहासांत अति कृष्ण दिवस ठरायचा होता. महात्माजींची ती पावनमंगल मूर्ति प्रार्थनेस निघाली. आणि गोळ्या झाडण्यांत आल्या. ज्या हृदयांत भूतमात्राविषयीं अपरंपार प्रेम नि करुणा याशिवाय कांहीं नव्हतें, ज्या हृदयांत प्रेमस्वरूप नि सत्यस्वरूप परमेश्वराची मूर्ति सदैव विराजत होती, त्या विश्वहृदयावर गोळ्या झाडण्यांत आल्या. महात्माजींनीं अंतकाला ते सेवामय हात जोडून अंतिम प्रणाम केला, त्या अंतकाच्या ठायींहि त्यांना परम कृपाळु भगवान् का दिसला? अमृताचा पेला देणारी, विषाचा पेला देणारी तीच जगन्माता. महात्माजींचा तो प्रणाम म्हणजे अद्वैताच्या अनुभवाचें परमोच्च प्रतीक होतें. पाव्हरीबाबांना साप चावला. ते म्हणाले, "तो प्रभु आला आणि चुंबून गेला." महात्माजींना अंतकाच्या हातांतील पिस्तुल प्रभुकृपेनें नि प्रेमानें थबथबलेलें का दिसलें?

केवढा वज्राघात, केवढी भीषण आपत्ति! महात्माजींचा देहच नाहीं पडला तर जणुं भारताचें भाग्य, सौभाग्य पडलें. पुंजीभूत पुण्याई पडली. मानवता कोलमडली. उदात्त धर्म, शाश्वत सत्यें हीं जणूं पडलीं. तो प्रहार महात्माजींच्या हृदयावर नव्हता. तो विश्वाच्या हृदयावर होता. आज भारत दीनवाणा आहे. असें एकहि घर, एकहि झोंपडी भारतांत नव्हती जेथें अश्रु घळघळले नाहींत, हुंदके आले नाहींत, कंठ दाटला नाहीं, हृदय गहिंवरलें नाहीं. लहान बालका-

पासून तों महामना धीरोदात्त पंडितजींपर्यंत सारे रडत होते. काय करायचें? रडायचें नाहीं तर काय? राष्ट्राचा पिता गेल्यावर पोरांनीं कोठवर धीर धरायचा?

महात्माजींनीं राष्ट्र निर्माण केलें. हिंदी जनतेची माणुसकी त्यांनीं सिद्ध केली. आम्ही मरूं परंतु अन्याय सहन करणार नाहीं असें निःशस्त्र जनता बोलूं लागली. साऱ्या राष्ट्रानें आफ्रिकेंतून यशस्वी होऊन आलेलें सिद्ध शस्त्र हातीं घेतलें आणि महान् नेत्याच्या नेतृत्वाखालीं अखेरचा चलेजाव लढा करून आज ब्रिटिश सत्ता दूर केली आहे. महात्माजींनीच राष्ट्रांत प्राण ओतला. स्त्रीपुरुषांत, मुलाबाळांत चैतन्य निर्मिलें. त्यांनी कोळशाचे हिरे केले, दगडांचीं पारिजातकें केलीं, मृत्कणांचीं माणिकमोतीं केलीं. एक नवराष्ट्रधर्म त्यांनीं सर्वांना दिला. नेताजी सुभाषचंद्रांनीं आझादसेना उभारतांना "गांधीजी, तुम्ही राष्ट्राचे तात आहांत. आशीर्वाद द्या." अशी परदेशांतून भक्तिपुरस्सर हांक मारली. आणि त्या परम थोर पित्यावरच एका मुलानें गोळ्या झाडल्या आणि महात्म्यानें त्याला प्रेमानें प्रणाम केला.

महात्माजींच्या जीवनाला अनंत धारा होत्या, अनंत स्रोत होते. त्यांचें जीवन म्हणजे अथांग सागर. अनेक कर्मक्षेत्रांतून ते सिंहाप्रमाणें संचरत होते, सामर्थ्य देत होते, राष्ट्राला आकार देत होते. खादी, ग्रामोद्योग, वर्धाशिक्षण, राष्ट्रभाषा, गोसंवर्धन, आहारशास्त्र, निसर्गोपचार, एक का दोन, हा राष्ट्रपिता राष्ट्राच्या अखिल संसाराची चिंता वहात होता. सरकारी रासायनिक खात्याकडे ते चिंच पाठवीत, निंबाचा पाला पाठवीत, घोळीची भाजी पाठवीत. यांत कोणतीं जीवनसत्त्वें आहेत? असतील तर माझी गरीब जनता तीं भरपूर खाईल. सत्याचे प्रयोग करणारा हा सत्योपासक जनतेच्या हितमंगलाचेहि बारीक सारीक प्रयोग करी. त्यांना अमुक मोठें नि अमुक छोटें असें नसे. स्वातंत्र्याचे महान् संग्राम पुकारण्यापासून तों आश्रमांतील एखाद्या आजाऱ्याची व्यवस्था लावण्यापर्यंतचीं सारीं कामें ते तितकींच पवित्र मानीत. त्या त्या वेळेस त्या त्या कर्मांत जणुं ते मुक्ति बघत. राष्ट्राच्या अखिल जीवनाला अखंड भरपूर ओलावा देणारा महापुरुष गेला. ती कामधेनु गेली.

महात्माजी अखंड वर्धमान होते. क्षणक्षण कणकण झिजवून ते उत्तरोत्तर पुढें जात होते. वरळीला हरिजन वस्तींत राहूं लागले, दिल्लींत भंगी वस्तींत

राहूं लागले. सारखें पुढें जाणें हें त्यांचें ब्रीद. तेथें ना विसांवा, ना विश्रांति. ध्येय सदैव पुढेंच जाई. आणि देशांत कत्तली सुरू झाल्या. महात्माजी वेदना-विव्हळ झाले.

ते नौखालींत अश्रू पुसायला गेले. त्या आगींत दुसरा कोण शिरता, धीर देता? अनवाणी चालले, लांकडांवरून पडले. परंतु हा पुण्यात्मा सतींचे अश्रू पुशीत, दीनांची मान उंच करीत निघाला. आधीं ते निराश झाले. घरांतून कोणी बाहेरच येईना. सर्वत्र भीति. शेवटीं त्यांच्या बरोबरच्या सोबत्यांनीं घरांतील मुलांना खेळायला बोलावलें. आणि मुलें आलीं, खेळलीं! चेंडू लगोऱ्या खेळलीं. आणि एक दिवस तिरंगी झेंडा उभारून मुलांनीं गाणें म्हटलें. आणि थोड्या दिवसांनीं रघुपति राघव राजाराम म्हणत बालवीरांची निर्भय सेना निघाली. मुलांच्या पाठोपाठ घरांतील वडील मंडळी बाहेर पडली. 'येथें रामनाम कोण घेतो बघूं' असें मुस्लीम गुंड म्हणत. परंतु रामनामाचा जयघोष करीत ध्रुवप्रल्हादाचे वारसदार निघाले. मुस्लीम गुंड डोळे ताठ करून पाहूं लागले. ते दिपले. त्यांच्यानें घाव घालवला नाहीं. त्या दिवशीं महात्माजींच्या डोळ्यांत अश्रू आले. आणि आशाहि फुलली. नौखालीची अमर यात्रा अद्वितीय ठरली.

पुढें देश स्वतंत्र झाला. परंतु फाळणी झाली. ती फाळणी स्वीकारतांना महात्माजींच्या हृदयाचे तुकडे झाले असतील. परंतु त्यांनीं परिस्थिती जाणली. पंडितजी, सरदारजी यांच्या पाठीमागें ते उभे राहिले. स्वातंत्र्य आलें. देश दुखंड झाला. पुढें पंजाब बंगालच्या सीमा उद्घोषिल्या गेल्या. आणि निर्वासितांचे प्रचंड लोंढे इकडून तिकडे, तिकडून इकडे येऊं लागले. आणि द्वेष मत्सरांचे लोळ पेटले. खाटिकखाना सुरू झाला. भारतमातेचीं शेंकडों वर्षें एकत्र गुण्यागोविंदानें राहणारीं मुलेंबाळें एकमेकांचे गळे कापूं लागलीं. हरहर! स्वातंत्र्याची शेवटीं अपरंपार प्राणदानानें, निष्पाप बलिदानानें किंमत चुकवावीच लागते का? पाकिस्तानचें स्वातंत्र्य नि हिंदुस्थानचें स्वातंत्र्य दोघांसाठीं अपरंपार अश्रूंची नि रक्ताच्या नद्यांची किंमत दिली गेली.

स्वातंत्र्य आलें नि सभोंवतीं अंधार दाटला. तिकडे कलकत्त्यांत पुन्हां आगी पेटल्या. महात्माजी धांवले. आपल्या जीवनाचा अमृतकुंभ घेऊन ते उभे राहिले. तपस्येची शांतिधारा ओतूं लागले. उपवास सुरू झाला. त्यांच्यावरहि

हल्ले झाले. परंतु चमत्कार झाला. कलकत्ता शांत झालें. भारताचें तोंड फुललें. आणि दिल्ली शान्त करायला गांधीजी धांवले. दिल्ली नवराष्ट्राची राजधानी. येथें राष्ट्राची नाडी, राष्ट्राची अब्रू; येथें राष्ट्राचा प्राण, येथें राष्ट्राची प्रतिष्ठा. महात्माजी आले. निर्वासितांत ते जात. त्यांच्या शिव्याशापांना ते सोशीत आणि त्यांचे अश्रू पुशीत. धीर सोडूं नका, प्रभूवर विसंबा; सरकार शक्य तें सारें करील. तुम्हीहि आशेनें उठा. हातपाय हलवा. स्वच्छता आणि नवप्रकाश अंधारांत आणूं या. महापुरुष सांगत होता. परंतु अस्मान् फाटलें होतें.

महात्माजींना अनन्त वेदना होत होत्या. ते पाकिस्तानांत जाऊं इच्छित होते. परंतु दिल्ली शांत झाल्याशिवाय कसे जाणार ? त्यांनीं उपवास आरंभला. सारें जग स्तिमित झालें. अवाक् झालें. जाणार का गांधीजी ? ही शेवटची का पूर्णाहुति ? परंतु पुन्हां प्रकाश आला. जनतेनें अटी मंजूर केल्या. उपवास सुटला. महापुरुष आनंदला. मी आतां पाकिस्तानांत जाईन म्हणाला. परंतु पाकिस्तानवाल्या कांहीं मंत्र्यांनीं उपवासाची स्तुति केली तरी गांधीजींना "पाकिस्तानांत या" असें प्रेमस्नेहाचें आमंत्रण मात्र दिलें नाहीं.

उपवासाच्या वेळींच गांधीजी मरोत असें तेथें येऊन कोणी ओरडत. पुढें तर एक बॉंब फेंकला गेला. परंतु दूर पडला. त्यावेळेस महात्माजी म्हणाले, "बॉंब फेंकणारा समोर येऊन उभा असतां मी कसा वागलों असतों, प्रभु जाणे. परंतु तोंडावर मरतांना स्मित असावें, मारणाऱ्याविषयींहि प्रेम असावें असें वाटतें." आणि पुन्हां काळ गुपचूप पाठोपाठ आला.

काळ गुपचूप आला. गोडसे यांच्या रूपानें आला. तुमच्या आमच्या सर्वांच्याच हृदयांत लपून बसलेली धर्मांधता व जात्यंधता त्याच्या रूपानें महात्माजींवर गोळी झाडायला उभी राहिली. पूज्य विनोबाजी म्हणाले त्याप्रमाणें प्रभूच्या मनांतच बापूंना न्यायचें आलें असेल. महात्माजी नेहमीं म्हणत, "माझी आवश्यकता संपल्यावर एक क्षणहि परमेश्वर मला ठेवणार नाहीं." गोडसे याचें निमित्त करून प्रभूनें पन्नास वर्षें अहोरात्र चंदनाप्रमाणें सेवेंत झिजणारा आपला महान् पुत्र आपल्याजवळ नेला. भारत पोरका, निराधार झाला.

नौखालीच्या वेळेपासून महात्माजींचा आत्मा जणूं अधिकच वेगानें विश्वाशीं एकरूप होऊं पहात होता. सर्वत्र अश्रु नि आपत्ति. रक्त नि संहार. या लहान देहांत राहून मी कोणाचे अश्रु पुसूं ? कोणाला जवळ घेऊं ? देह

फाडून हा आत्मा व्यापक होऊन सर्वांच्या भेटीला जावा, सर्व निर्वासितांच्या दुःखाशीं एकरूप व्हावा असें का त्यांना वाटे ? त्यांच्या तोंडावर वेदना असे. तोंडावर मुक्त पुरुषाचें स्मित असलें तरी त्या स्मितांत अनंत करुणा असे. अखेर अखेर त्यांना का देहबंधन ओझें वाटूं लागलें ? आंतला आत्मा विश्वरूप व्हायला अधीर झाला ? पाकिस्तानांतच काय, सर्व जगभर जेथें जेथें दुःखी निराधार आहेत, त्यांच्याशीं मिळायला का अधीर झाला ? पू. विनोबाजी स्वर्गीय जमनालालजींच्या निधनप्रसंगीं म्हणाले, " जमनालालजींचें मन वाढत होतें. त्यांचा आत्मा वाढत होता. तो शरीरांत मावेना. शरीर फाडून मोकळा झाला, विश्वाशीं मिळाला. " महात्माजींचें असें का झालें ? गोडसे निमित्त झाला. जणूं टिचकी मारावी, त्याप्रमाणें त्या परम मंगल देहकलशावर गोळ्या आल्या. देहाचा पडदा फाटला. महात्माजींचा महान् आत्मा विश्वाला मिठी मारायला मोकळा झाला. त्यांनीं मारेकऱ्यालाहि प्रणाम केला. त्यावेळची त्यांची मनःस्थिति कोणी सांगावी ? महात्म्यांच्या अनंत जीवनांत नि अनंत मरणांत कोण बुडी घेणार ?

महात्माजी गेले. परंतु ते हृदयाहृदयांत आहेत. त्यांनी पेटवलेला, उजळलेला प्रकाश जगाला, भारताला सदैव मार्गदर्शन करील, ऊब देईल, फुलवील, आनंदवील. आपण दुःख मनांत गिळून त्यांची शिकवण भारतीय जीवनांत सर्वत्र पेरायला उठूं या. जात्यंधतेच्या विषारी वातावरणानें बापूंचा बळी घेतला. गोडसे मुस्लीमद्वेषाच्या संप्रदायाचें प्रतीक होता. परंतु आपल्या देशांत नाना द्वेष मत्सर आहेत. मुस्लीमद्वेष आहेत, जातिद्वेष आहेत. आपण सारेच एका अर्थी महात्माजींचे मारेकरी आहोंत. माझ्यामध्यें जातीयतेचें लेशभरहि विष नाही असें किती जणांना म्हणतां येईल ? तुमच्या आमच्या मनांतील जातीयतेची पुंजीभूत मूर्ति म्हणजे गोडसे. गोडसे तुमच्या आमच्या सर्वांच्या हृदयांत आहे. तो दूर करणें हें आतां कर्तव्य आहे. शत्रु हृदयांत आहे. तेथें त्याला ठार करा. जातीयभावना, प्रान्तीयभावना यांचा सुकाळ आहे. प्रान्तीयता नि जातीयता विसरून जाऊं तेव्हां नवहिंद राष्ट्र उभें राहील. तेव्हांच महात्माजींचें या देशांतील महान् कार्य पुरें होईल. त्यांचा आत्मा आनंदेल.

महात्माजींच्या पूज्य स्मृतीस स्मरून हें कर्तव्य दैनिक या विचारांचा अखंड पाऊस पाडील. जातीयवृत्ती नष्ट करणें आणि लोकशाही समाजवाद आणणें

हीं दोन ध्येयें माझ्यासमोर आहेत. जातीयतेच्या बुजबुजाटांत समाजवाद फुलणार नाहीं; आणि समाजवादी दृष्टि आल्याशिवाय जातीपाती नष्ट होणार नाहींत. दोहोंचा अविरत प्रचार मी आणि माझे मित्र करूं. प्रभु शक्ति देवो. आम्ही नीट प्रेमानें वागूं, विचारानें नि प्रामाणिकपणें लिहूं, बोलूं, नम्र परंतु निर्भय असूं तर महात्माजींचाहि आम्हां धडपडणाऱ्या लेकरांस आशीर्वाद मिळेल. आम्हांला कर्तव्याची तीव्रतेनें जाणीव होवो हीच महात्माजींच्या चरणीं नि प्रभुचरणीं विनम्र प्रार्थना.



## अखंड क्रान्तिकारी महात्मा

महात्माजी हे सदैव वर्धमान होते. एकानें म्हटलें आहे कीं महात्माजीं-सारखा अखंड विकासमान पुरुष जगांत दुसरा नाहीं. त्यांनीं आपलें जीवन ठोकळेबाज कधीं केलें नाहीं. आपल्या अनुयायांना कल्पनाहि नसेल असें ते एकदम उद्घोषीत. अनुयायी चकित होत. ते ठराविक चाकोरींतून जाणारे. गांधीजी असें करतील असें नव्हतें वाटलें असें हे मागून म्हणावयाचे ! गांधी-जींच्या या वर्धिष्णु जीवनाची निकटवर्तीयांसहि फारशी जाणीव नसे.

१९२८ मध्यें कलकत्ता कॉंग्रेसला पंडित मोतीलाल अध्यक्ष होते. तेथें तरुणांचा नि वृद्धांचा खटका उडाला असता. परंतु महात्माजी तरुणांना म्हणाले, "एक वर्षभर थांबा. एका वर्षाच्या आंत ब्रिटिशांनीं सत्ता न दिली तर मी राष्ट्रव्यापक लढा पुकारीन." तरुण शान्त झाले. कारण तो गांधीजींचा अविचल असा निर्धारी शब्द होता.

आणि कांहीं महिन्यांनीं वर्ष संपणार होतें. लाहोरची बैठक जवळ येत होती. अध्यक्ष कोणाला करायचें ? महात्माजींनीं विचार करून तरुण जवाहरलालजींचें नांव अध्यक्ष म्हणून सुचविलें. सर्वांनाच तें मनांत पसंत होतें असें नाहीं. जवा-हरलाल तडफदार, समाजवादी विचारसरणीचा. राष्ट्र खड्ड्यांत तर नाहीं नेणार ? अशी जुनाटांना क्वचित् शंका आली. महात्माजींनीं लिहिलें, "जवाहर स्फटिकाप्रमाणें निर्मळ आहे. राष्ट्र त्याच्या हातांत सुरक्षित आहे." महात्माजींनीं जवाहरलालजींची निवड केली. कारण राष्ट्राची नाडी ते जाणत होते. वर्षाची मुदत संपणार होती. स्वातंत्र्याचा उग्र सत्याग्रही लढा पुकारावा लागणार होता. अशा वेळेस तरुणांच्या गळ्यांतील ताईत, नवयुगाचें आशास्थान, त्यागी नि

तेजस्वी असा जवाहर अध्यक्ष झाला तर सारें राष्ट्र उचंबळेल. तरुण संस्फूर्त होतील. ही गोष्ट या राष्ट्रधुरंधरानें ओळखली. सहानुभूतिमय प्रतिभा महात्माजींच्या जवळ अनन्त होती. म्हणून अनुदार वृत्तीच्या इतरांना जें सुचत नसे, पचत नसे, वा रुचत नसे, तें गांधीजींना सुचे, रुचे, पचे. जवाहरलालजींचें नांव सुचविण्यांत त्यांची अखंड क्रांतिकारी वृत्ति दिसून येते. ते काळाबरोबर पुढें जाणारे होते. तरुणांच्या बरोबर राहण्यांत, त्यांना संयम शिकवून पुढें नेण्यांत त्यांना परम आनंद वाटे.

आज तशीच क्रांतिकारक वेळ आली होती. देश दुखंड झाला परंतु मुक्त झाला. वेदना असली तरी छातीवरचें सहा हजार मैलांवरचें परकी प्रचंड दडपण दूर झालें होतें. देश स्वतंत्र झाला तरी अनंत आपत्तीमुळें तसें वाटेना. एक प्रकारचा उत्साह, आनंद दिसेना. कांहीं तरी क्रांतिकारक करणें जरूर होतें. कॉंग्रेसचा कायापालट करणें जरूर होतें. वर्षानुवर्षे कॉंग्रेसमध्यें कामें केलेले प्रांतोप्रांतीचे लोक, परंतु थोडी शिथिलता येत होती. गांधीजींना पत्रें येत होतीं कीं कॉंग्रेस भ्रष्ट होत चालली. जनतेच्या आकांक्षा वाढलेल्या. शेतकऱ्यांना जमीन हवी होती. कामगारांना मान उंच व्हावी अशी इच्छा होती. ज्या कॉंग्रेसच्या द्वारा मी स्वातंत्र्याचे लढे केले, त्या कॉंग्रेसचें स्वरूप मलिन झालेलें मी कसें पाहूं ? ती निष्प्राण होत चालली तर मी कशी पाहूं ? तिच्यावरील जनतेची श्रद्धा भंगली तर तें केंवढें दुःख ? असे विचार महात्माजी करीत असतील. स्वातंत्र्य मिळाल्यावर कॉंग्रेसनें एक सेवकांचा संघ—सत्ताहीन संघ म्हणून रहावें असें त्यांना पूर्वीपासून मनांत वाटे. आजहि वाटे. परंतु या क्षणीं तें शक्य नव्हतें. तेव्हां कॉंग्रेसमध्येंच नवरंग ओतावा, नवप्राण ओतावा असें त्यांना वाटलें आणि म्हणून दिल्लीला त्यांनीं आचार्य नरेंद्रदेव यांना अध्यक्ष करा असें सुचविलें. सत्य कथा लोकांना माहीत असेल वा नसेल. आचार्यजींचें नांव सुचविल्यावर जयप्रकाशांविषयीं उल्लेख निघतांच मौन असल्यामुळें त्यांनीं लिहून दाखविलें, "दोघे मला सारखेच प्यारे आहेत."

वर्किंग कमिटींत अशा गोष्टींचें कांहीं टांचण नसतें. महात्माजींनीं सुचविलें. पंडितजींनीं पाठिंबा दिला. विरोध कोण करणार ? दोन मिनिटें सारें शान्त होतें. परंतु महाराष्ट्रांतील महान् सेवक श्री. शंकरराव देवांनीं विरोध करण्याचें थोर नैतिक धैर्य दाखविलें. ते म्हणाले, " समाजवादी पक्ष हा अल्पसंख्य पक्ष

आहे. त्या पक्षाचा अध्यक्ष निवडणें हें लोकशाहीला धरून नाहीं. " एकानें विरोध दाखविण्याचें धैर्य दाखविल्यावर दुसऱ्यांनींहि दाखविलें. सरदार स्तब्ध होते. त्यांचें कार्य दुसऱ्यांनीं धीर दाखवून पार पाडलें. शेवटीं मंडळी उठली. सरदारजींच्या गटानें राजेन्द्रबाबूंना गळ घातली. ते शेवटीं होय म्हणाले. ते गांधीजींकडे गेले व म्हणाले " सारे म्हणतात तर कसें नाकारूं? आशीर्वाद द्या. " अशा रीतीनें महात्माजींची क्रान्तिकारक इच्छा चाकोरींतून जाणाऱ्या लोकांनीं हाणून पाडली. त्यांना लोकशाही आठवली. आजवर पद्धत होती कीं गांधीजी बहुतेक ज्याचें नांव सुचवीत वा ज्याच्या नांवाला संमति देत तो अध्यक्ष निवडला जाई. तेथें पक्षोपपक्षांच्या बलांचा प्रश्न नसे. आणि लोकशाहीचें व्यापक स्वरूप काय? तुमचे कॉंग्रेसचे सभासद म्हणजे का राष्ट्र? कोटयवधि इतर जनता आहे. त्यांना जयप्रकाश अध्यक्ष झाले असते तर नवीन तेज मिळालें असतें. आपल्या आशा-आकांक्षांचें प्रतीक कॉंग्रेसच्या अध्यक्षपदीं आहे असें पाहून त्यांचे डोळे निवाले असते, ते नाचले असते. कोट्यावधि जनतेची नाडी ओळखून, जनतेची बेदिली ऐकून त्या व्यापक लोकशाहीच्या दृष्टीनें गांधीजी सांगत होते. परंतु ती दृष्टि अधिकारारूढ चाकोरींतून जाणाऱ्या लोकांना मानवली नाहीं. महात्माजी काय करणार? ते अलीकडे पुष्कळदां म्हणत, " मी अनेक गोष्टी सांगतों. माझें कोण ऐकतो? "

महात्माजी असे दिव्यदृष्टि पुरुष होते. अखंड पुढें पाहणारे, पुढें जाणारे. ज्या समाजवादी पक्षाच्या हातीं सूत्रें द्यावीं असें ते म्हणाले, त्या पक्षावर आज महात्माजींचा महान् आवाज शान्त होतांच चारी दिशांतून आगीचा वर्षाव होत आहे. तुम्ही नि कम्युनिस्ट एकच, तुम्हांला सत्ता हवी आहे, असे आडवाटेनें कां येतां, महात्माजींचें नांव मध्यें कां आणतां, अशा नाना गाली देण्यांत येत आहेत. श्री. जयप्रकाशसारखा निर्मळ, दिलदार, धाडसी, त्यागी, विश्वास टाकणारा, ध्येयार्थी नि गरिबांचें स्वराज्य आणण्यासाठीं तडफडणारा दुसरा कोण दाखवणार? त्यांना सत्तेची अभिलाषा नाहीं. पक्षांतहि ते म्हणत असतात मला साधा सभासद असूं दे. कशाला मला मुख्य चिटणीस वगैरे करतां. ते कमालीचे निरहंकारी आहेत. दिल्लीला त्यांनीं पत्रक काढलें म्हणून त्यांच्यावर कोण गहजब. आगगाडींतून येणाऱ्या नानासाहेब गोऱ्यांच्या तिकिटांचा नंबर सी. आय. डी. विचारतो. समाजवाद्यांच्या पाठीमागें तुमचे हेर डोळ्यांत

तेल घालून आहेत. आणि गोडसे विमानांनीं जातो येतो, त्याची कांहीं दखल? थातुरमातुर करून उत्तर देण्याची ही गोष्ट नाहीं. संघ वगैरे पेक्षां यांना समाजवादी शत्रु वाटतात! अरेरे! आणि त्या समाजवादी पक्षाच्या प्रमुखाला अध्यक्ष करा म्हणून गांधीजी म्हणत होते. असो. महात्माजी तर गेले. ती अखंड क्रांतिकारी शक्ति गेली. तो वर्धमान महात्मा गेला. आतां कॉंग्रेस म्हणजे सरदारशाही जमाना होणार यांत शंका नाहीं. समाजवाद्यांना कदाचित् काढूनहि टाकण्यांत येईल. सरदार तसें सूचक अर्थानें बोललेहि. त्यांना काढून टाकतां यावें म्हणून ही हल्लींची समाजवाद्यांवरील तुफान स्वारी. म्हणून कम्युनिस्ट नि तुम्ही एकच आहांत असा फॅसिस्टी खोटा प्रचार. शंभर वर्तमानपत्रें शंभरदां एकच गोष्ट सांगूं लागलीं म्हणजे जनतेला तें खरें वाटूं लागतें, आणि समाजवादी पक्ष फॅसिस्ट ठरवल्यावर मग त्याला घालवून देण्याचा मार्गहि सोपा होतो.

महात्माजी म्हणत जवाहर माझा वारसदार आहे. परंतु जवाहर नामधारी राजे आहेत. सत्ताधारी सरदार आहेत. तेव्हां महात्माजींचा खरा वारसदार आज समाजवादी पक्षच ठरतो. आणि त्यालाच ते शेवटीं आशीर्वाद देत होते. तो देतां देतां ते गेले. आपण त्यांचें कार्य पुरें करूं. महात्माजींनीं आपल्या स्वराज्याच्या कल्पनेंत म्हटल्याप्रमाणें आर्थिक विषमता दूर करणें, सामाजिक विषमता दूर करणें, धार्मिक विषमता दूर करणें, आणि कोणत्याही स्वरूपांतील लोकशाही आली तरी तेथें अहिंसेचें सार्वभौम बंधन पत्करून सर्वांना आपापल्या विचारांचा प्रसार करायला स्वातंत्र्य असणें, असें लोकशाही समाजवादी रचनेचें महात्माजींचें ध्येय होतें. तें पुरें करणें हें समाजवादी पक्षाचें काम आहे. नवयुग निर्मू पाहणाऱ्या, चाकोरींतून बाहेर पडूं पाहणाऱ्या सर्वांनाच जड जरठ बुद्धीच्या नि सत्तेच्या आसनांवर बसल्यामुळें तेथेंच बसून राहयचें आलस्य ज्यांच्या अंगीं आलें आहे, नवीनांना जागा करून देऊं असें म्हणण्याची उदारता ज्यांना नसते, अशांकडून नेहमींच शिव्याशाप, अपमान सारें सहन करावें लागतें. या साऱ्या सरदारचमूच्या कलकलाटांतून श्री. जयप्रकाश राजहंसाप्रमाणें धीरगंभीर राहून आपला पक्ष लोकशाही समाजवादी रचनेकडे नेत राहतील. ते संयमानें परंतु वेगानें त्या ध्येयाकडे झेंप घेतील. त्यांना अखंड क्रांतिकारी महात्माजींचा नि जनता जनार्दनाचा आशीर्वादच मिळत राहील.

आणि म्हणून जनतेनें सदैव याच प्रामाणिक पक्षाला संपूर्ण पाठिंबा द्यावा अशी माझी अंतःकरणपूर्वक प्रार्थना आहे. समाजवादी पक्षाचा जय म्हणजे सत्याचा, श्री. दरिद्री नारायणाचा जय !



## दुसऱ्याचें मरण दिसतें, परंतु स्वतःचें ?

एक इराणी तत्त्वज्ञ होता. एके दिवशीं तो बोडकाच विचारमग्न स्थितींत बाहेर पडला. समोरून आपला मित्र येतांना त्याला दिसला. बोडक्यानें त्याला नमस्कार कसा करायचा असा त्याला विचार पडला. रस्त्यांतून एक मनुष्य मोठ्या वेगानें जात होता. या तत्त्वज्ञानें त्याची टोपी अलगत उचलून घेतली. लगबगीनें जाणाऱ्या त्या माणसाच्या लक्षांत तें न येतां तो निघून गेला. तत्त्वज्ञानें ती टोपी डोक्यांत घातली आणि समोरून येणाऱ्या मित्राला अभिवादन केलें. बोलणें चालणें झालें. पुन्हां जो तो आपल्या मार्गानें चालूं लागला. परंतु, मग या तत्त्वज्ञान्याच्या मनांत विचार आला कीं या टोपीचा मालक कसा धुंडाळायचा. त्याचें नांव गांव पत्ता माहीत नाहीं. शेवटीं शहराच्या वेशींत रोज येऊन बसायचें असें त्यानें ठरविलें. कोणी त्याला विचारलें, " रोज तुम्ही येथें कां येऊन बसतां ? " तो म्हणाला, " मी एकाची टोपी घेतली आहे. परंतु तो कोठें राहतो तें मला माहीत नाहीं. परंतु मेल्यावर त्याला या वेशींतून जावें लागणारच. त्याचें प्रेत आलें म्हणजे ही टोपी त्याच्या प्रेताजवळ ठेवून मी ऋणमुक्त होईन. " प्रश्न करणारा म्हणाला, " आणि त्याच्या आधीं तुम्हींच मेलांत तर कसें व्हायचें ? " तत्त्वज्ञ जरा विचार करून म्हणाला, " खरेंच कीं. मी माझें मरण विसरूनच गेलों होतों. "

जगांत जो तो स्वतःचें मरण विसरतो. कॉलेजमध्यें तर्कशास्त्राचा प्राध्यापक तर्क शिकवतांना म्हणतो:

" सारीं माणसें मर्त्य आहेत.

सॉक्रेटिस माणूस आहे.

तेव्हां तोहि मर्त्य आहे. ”

सॉक्रेटिस मरणाचा पेला पिऊन अमर झाला. प्राध्यापक शिकवतांनाहि त्या अमर सॉक्रेटिसावर मरण लादतो. असें नाहीं म्हणत कीं मी माणूस आहें म्हणून मी मर्त्य आहें. जगाची ही अशीच रीत आहे.

श्री. एस्. के. पाटील यांनीं जी मुलाखत दिली, तींत पुष्कळ गोष्टी आहेत. वंचने किं दरिद्रता या न्यायानें भावी योजना आहेत. कागदावर मांडायला नि शब्दांत बोलायला काय जातें? आम्ही लखनौ कॉंग्रेसमध्यें मुस्लिम जनता-संबंध–ठराव केला. जमीनदारी नष्ट करायचें ठरलें असतें तर युक्तप्रांत, बिहार, बंगालमधील कोटयावधि मुस्लिम कुळें कॉंग्रेसचीं झालीं असतीं. परंतु आमचा जनता–संबंध संक्रांतीला तिळगुळ देणें, आणि हिंदूंनीं क्वचित् ईद मुबारक म्हणणें इतकाच राहिला. परंतु जाऊं दे. पाटलांनीं परवां रंगविलेल्या सुवर्णयुगाकडे मला जायचें नाहीं. त्यांनीं एक इच्छा प्रकट केली कीं कम्युनिस्ट समाजवाद्यांना खाऊन टाकतील. जे समाजवादी कॉंग्रेसची सेवा करीत आले, लढ्यांत लढले ज्यांनीं थोरामोठयांची कधीं निंदा केली नाहीं, अनेकांच्या शिव्या खात जे कॉंग्रेसमध्यें राहिले, त्यांना कम्युनिस्टांनीं खावें ही पाटलांची दुष्ट इच्छा! ठीक बाबा.

परंतु मी हें किती वर्षें पाहतों आहे. कॉंग्रेसवाल्यांच्या डोळयांत जास्तींत जास्त कोणी खुपत असेल तर तो समाजवादी. मोठा भाऊ धाकट्या भावाचें निसंतान करूं पहातो. त्याचें वाटोळें करूं बघतो. तसा हा प्रकार आहे. जळगांवचे एक कट्टर कॉंग्रेसवाले मागें स्वच्छ म्हणत, “ येथें कम्युनिस्टांचें युनियन चालेल, परंतु समाजवाद्यांचें आम्हीं चालूं देणार नाहीं. ” आणि अलीकडे सेवादल कॉंग्रेसच्याच थोर ध्येयाची अधिक निष्ठेनें सेवा करतां यावी म्हणून स्वतंत्र झालें तेव्हां कांहीं कॉंग्रेस कार्यकर्ते तरुणांस म्हणत, “ संघांत गेलांत तरी चालेल, परंतु राष्ट्रसेवादलांत नका जाऊं. ” कारण राष्ट्रसेवादलाशीं समाजवाद्यांचा संबंध आहे. कॉंग्रेसवाले समाजवाद्यांचा इतका द्वेष करतात परंतु त्यांत त्यांचेंच मरण आहे.

समन्वयवादाचें गांधीजींचें ध्येय मांडण्यांत येत आहे. परंतु महात्माजींना उभ्या हयातींत विश्वस्त म्हणून वागणारा एकहि मालक भेटला नाहीं. माझ्याजवळची संपत्ति कामगारांची आहे, ते मागतील तेव्हां दिली पाहिजे, असें

कोण मानणार ? ४२ च्या लढ्यांत सारे मालक सरकारचे बगलबच्चे होऊन अफाट नफा कमवीत होते. या बाबतींत महात्माजी निराशच झाले असावेत. ते लिहितात:

"I am disappointed with these pillars of Society. I shall now move the masses and pillars shall collapse".

"वरच्या वर्गाच्या बाबतींत मी निराश झालों आहे. मी आतां बहुजन समाजाला जागें करतों, उठवतों, म्हणजे हे समाजाचे आधारस्तंभ कोसळून पडतील." असें महात्माजी कां लिहिते झाले ? तरीहि गोंडस स्वप्नें खेळवायचीं असतील तर खुशाल खेळवा.

कामगारांना थोडी अधिक मजुरी, नीट चाळी, अशा गोष्टी तर हव्यातच. परंतु कामगाराला एवढ्यानें खरा आनंद नाहीं. मी जेथें काम करतों तेथला फायदा राष्ट्राच्या कामासाठीं जात आहे असें त्याला वाटेल तेव्हांच तो आनंदेल. मालकाजवळचा त्याला समन्वय नको आहे. त्याला कारखान्याचा, त्यांतील फायद्याचा राष्ट्राच्या नवनिर्मितीसाठीं समन्वय हवा आहे. म्हणून शेतकरी, कामकरी यांच्या सत्तेची तो घोषणा करतो. म्हणजे बाकी-च्यांना गोळ्या घाला असें तो नाहीं म्हणत. बाकीच्यांनीहि करतां येईल तें करावें. लोकशाही मार्गानें निवडणुकींत समाजवादी कार्यक्रम ठेवून, निवडून येऊन, समाजवादी लोकशाही समाजवादी आणूं इच्छितात. गोळ्या घाल-णाऱ्या हुकुमशाहीचा त्यांना तिटकारा आहे. ती त्यांच्या ध्येयांत बसत नाहीं. ती कम्युनिस्टांच्या असेल.

तुमचा समन्वयवाद अशक्य आहे. प्रयोग करा. परंतु आशा नाहीं. आणि लोकशाही मार्गानें, निर्मळ प्रचारानें, रशियाकडे डोळे न ठेवणारा, दहशतवाद, हुकुमशाही न मानणारा असा समाजवादी पक्ष किसान कामगारांत काम करीत राहिला तर तो तुम्हांला नको आहे. आजच रावळगांव, मनमाड येथून समाजवाद्यांना कायद्यानें हांकलून दिलें आहे. आणि आतां राष्ट्रीय मजदूर संघाचा कोणीतरी टेकोजी तेथें सत्तेच्या जोरावर बसवण्यांत येईल ! महात्माजींचें नांव उच्चारणाऱ्यांची ही अशी लोकशाही ! प्रामाणिक समाज-वादी–लोकशाहीचे पुरस्कर्ते–ते तुम्हांला नको असतील तर पुढें काय होईल ?

या समाजवाद्यांच्या मार्गांत ते नष्ट व्हावेत म्हणून तुम्हां अडचणी आणीतच आहांत. आणि तरीहि ते टिकाव धरून राहिले तर कम्युनिस्ट त्यांना खातील अशी श्री. एस. के. पाटील यांची शुभ भविष्यवाणी आहे.

परंतु ही अशुभ वाणी आहे. कम्युनिस्टांनीं समजा समाजवाद्यांना गिळंकृत केलें, तर शेतकरी, कामगार, सारी श्रमणारी जनता यांना कोण आपलें म्हणून मग वाटेल ? तुमचा समन्वयवाद कितपत त्यांना रुचतो, आणि कितपत फलद्रूप होतो तें प्रभुला माहीत. परंतु चार दिडक्या अधिक मिळविणें एवढेंच कामगारांचें ध्येय नाहीं. सारा नफा राष्ट्राचा व्हायला हवा. तो दरिद्र नारायणाच्या सर्वांगीण विकासार्थ वापरायला हवा. समन्वयवादानें हें शक्य नाहीं. तेव्हां असंतोष राहणारच. लोकशाही मार्गानें, निर्मळ प्रचारतंत्रानें, काम करणारे नि रशियनधार्जिणे नसणारे ते समाजवादी समजा मेले, भाक्षिले गेले. असें झालें तर सारी श्रमणारी जनता शेवटीं मग कम्युनिस्टांकडेच वळेल. ४२ च्या चळवळीच्या वेळेस देशद्रोह केलेल्या कम्युनिस्टांच्या कचाट्यांतून श्रमणाऱ्या जनतेस मुक्त करून त्यांना निराळ्या निर्मळ संघटनेंत समाजवादी पक्ष आणीत होता. ती जनता पुनः समाजवादी डोळ्यांसमोर नसल्यामुळें, लाल भाईच्या हातोड्याकोयत्याकडेच वळेल. आणि पुढें काय ?

रशिया लांब नाहीं. हिंदुस्थानच्या सरहद्दीजवळच तो आहे. देशांत रेल्वे, गोद्या, कारखाने येथें लालभाईचें प्रभुत्व. उद्यां काय होईल तें पाटलांनीं विचारांत घ्यावें. गांधीजी म्हणाले होते, "I see Red Ruin everywhere" त्याप्रमाणें लाल नाश सर्वत्र दिसूं लागावयाचा. रशियाशीं संबंध ठेवणारे हे कम्युनिस्ट लालभाई आहेत. हिंदुस्थानच गिळंकृत केला जायचा ! समाजवादी गिळंकृत केले जातील असें गोड स्वप्न पाटलांना दिसत आहे. परंतु तुमची सरदारी कँग्रेस, तुम्ही सारे, एवढेंच नव्हे तर आपला सारा देशच लालसत्तेच्या भक्ष्यस्थानीं पडेल !

यासाठीं समाजवाद्यांना पाण्यांत पाहूं नका. त्यांत तुमचेंही मरण आहे. म्हणा कीं आम्हीं आमच्या प्रयोगाचा प्रचार करूं, तुम्ही तुमच्या समाजवादी प्रयोगाचा प्रचार करा. जनतेला पटेल तो ती घेईल. आपण दोघे लोकशाहीनें चालत जात आहोंत. त्यामुळें परस्पर गोडी राहीलच. गंगा यमुनांचे प्रवाह एकत्र मिळाले तरी ठीक. अलग राहिले तरी ठीक. परंतु दोघे पवित्र नि सद्हेतूचे आहेत असें

महान् संस्था–जिचा समाजवादी पक्षाशीं प्रेमाचा संबंध आहे, तींहि या थोर ध्येयांचा–जातीय ऐक्य, अस्पृश्यतानिवारण, नवसमाज–दर्शन–केवढा प्रचार करीत आहे! त्यांना स्फूर्ति समाजवादीच देत आहेत. महाराष्ट्रांतील नि मुंबई-तील राष्ट्रसेवादलाचें कार्य अति थोर आहे. सारांश, ज्यांना कुत्रा म्हणतां, तेच महात्माजींच्या ध्येयाची उपासना करीत आहेत. तुम्ही बाजूला पडत आहांत. परंतु हा कुत्रा त्या ध्येयांजवळ उभा आहे.



# नाशिकला भरणारें अखिल भारतीय समाजवादी अधिवेशन

( लेखांक १ )

नाशिकला मार्चच्या १९, २०, २१ या तारखांस अखिल भारतीय समाजवादी पक्षाचें सहावें अधिवशन भरणार आहे. नाशिकलाच १९३४ मध्यें तुरुंगांत समाजवादी पक्ष जन्माला आला. त्याच नाशिक शहरांत चौदा वर्षांनंतर अत्यन्त महत्त्वाचे निर्णय घेण्यासाठीं हें समाजवादी अधिवेशन भरत आहे. हा पंधरा वर्षांचा काळ हिंदी इतिहासांत अत्यन्त महत्त्वाचा आहे.

समाजवादी पक्षाच्या आधींच हिंदुस्थानांत कम्युनिस्ट पक्ष स्थापन झाला होता. त्यांनीं कामगारांत संघटना सुरू केल्या होत्या. कम्युनिस्टांच्या आधीं गांधीजींच्या नेतृत्वाखालीं अमदाबादला कामगार संघटना सुरू झाली होती. परंतु ती शान्तिमय होती. श्रमणाऱ्यांच्या हातीं राज्यसत्ता यावी हें तिचें ध्येय नव्हतें. मजुरी वाढावी, चाळी असाव्या, चांगली वागणूक मिळावी, म्हणून ती संघटना होती. कामगारांनीं आपण होऊन सहकारी जीवनाची वाढ करावी, सहकारी जीवन वाढवावें, स्वतःचे स्टोअर्स काढावे, स्वतःचा दवाखाना करावा, स्वतःची सहकारी बँक काढावी, अशा विधायक स्वरूपावर भर देणारी ती संघटना. संप हा त्यांचा अखेरचा रामबाण असे. येतां जातां संप हें त्यांचें ध्येय नसे. याच्या उलट कम्युनिस्टी खाक्या होता. रशियांत क्रांति झाली होती. हिंदुस्थानांतहि कामगारांचीं सोव्हियेटस् स्थापून क्रांति करूं, कामगारांची हुकमत स्थापूं असें कम्युनिस्ट म्हणत. मिरतच्या खटल्यानें त्यांच्याभोंवती तेजोवलयहि उत्पन्न झालें. परंतु १९३० सालच्या कॉंग्रेसच्या स्वातंत्र्यसंग्रामांत कम्युनिस्ट सामील झाले नाहींत. मिठाचा सत्याग्रह सुरू होण्याच्या आधीं रेल्वे

संप सुरू झाला होता. कांहीं उतावळ्या कम्युनिस्टांनीं कामगारराज्य स्थापन झाल्याच्या ताराही केल्या. गांधीजींनी हा लढा सत्याग्रहाशीं जोडून घेण्याचें नाकारलें. आणि कम्युनिस्टहि काँग्रेसचा लढा म्हणजे भांडवलदारांचा असें म्हणून अलिप्त राहिले. ३० सालचा, पुढें ३२ सालचा, असे लढे झाले. या लढ्यांत आपण सामील झालों नाहीं ही चूक केली असें कम्युनिस्ट पुढारी मागून म्हणाले. कम्युनिस्ट एकतर काँग्रेसपासून दूर राहणारे किंवा तिच्यांत शिरलेच तर तिला ताब्यांत घेण्यासाठीं किंवा तिला नष्ट करण्यासाठीं टपून बसणारे. तेव्हां ३०, ३२ सालच्या लढ्यांत भाग घेणाऱ्या कांहीं तरुणांना वाटलें कीं आपण काँग्रेसमध्यें राहूनच, काँग्रेसशीं प्रामाणिक राहूनच एक निराळा पक्ष काढावा. तोच हा समाजवादी पक्ष. १९३५ मध्यें लखनौ काँग्रेसचे पंडित जवाहरलाल नेहरू अध्यक्ष होते. त्यानीं समाजवादी विचारसरणीचा प्रचार केला. परंतु ते समाजवादी पक्षांत नव्हते. कम्युनिस्ट पक्ष बेकायदा होता. तो समाजवादी पक्षांत अनेक ठिकाणीं समाजवादी नांवानें घुसला आणि समाजवादी पक्ष आहे तरी कुठें असें क्षणभर वाटलें. समाजवादी पक्षानें आपली पुन्हां नीट घडी बसविली. परंतु त्यांची नेहमीं ओढाताण होत असे. कांहीं समाजवादी कम्युनिस्ट झाले, कांहीं पुढें रॉयिस्ट झाले, समाजवादी निष्ठा ठेऊन फार थोडे राहिले. समाजवादी पक्ष काँग्रेसच्या थोर पुढाऱ्यांची कधीं अप्रतिष्ठा करीत नसे. गांधीजींविषयीं त्यांना अपार आदर असे. परंतु सरदार वल्लभभाई मात्र प्रथमपासूनच या पक्षावर दांतओंठ खात आले आहेत. गेल्या तेरा-चौदा वर्षांत सरदारांनीं समाजवादी पक्षाला कधीं भलें म्हटल्याचें आठवत नाहीं. जयप्रकाशांनीं बिहारी किसानांत अपार काम केलें. यू. पी. मध्येंहि समाजवादी पक्ष कामगारांत दृढमूल झाला. परंतु सर्व हिंदुस्थानभर असें त्याचें प्रभावी जाळें अद्याप नव्हतें. पुढें १९३७ नंतर काँग्रेसचीं मंत्रिमंडळें आलीं. मला आश्चर्य एक वाटतें कीं काँग्रेसचे लोक एकवेळ कम्युनिस्ट सहन करीत परंतु समाजवाद्यांना पाण्यांत बघत. अजूनहि ही भावना आहे. जयप्रकाश अति दिलदार आणि विश्वास टाकणारे. कम्युनिस्टांनीं समाजवादी नांवानें घुसून समाजवादी पक्षाचे एकदां तीन तेरा केले होते. तरी पुन्हां त्रिपुरी काँग्रेसच्या वेळेस कम्युनिस्टांशीं सहकार्य करावयास जयप्रकाश तयार झाले होते. कम्युनिस्ट नेहमीं रशियाच्या तंत्रानें वागतात. ही मोठी अडचण असे. त्रिपुरीला कम्युनिस्ट म्हणाले, "आम्हीं स्वतंत्र राहूं,

इंटरनॅशनलशीं संबंध ठेवणार नाहीं. या होऊं एक. तुम्हीं जनरल सेक्रेटरी व्हा." जयप्रकाशांना क्षणभर विश्वास वाटला. परंतु जयप्रकाशांच्या एका स्नेह्यानें एक कसोटी सांगितली. उद्यां रशियाचें धोरण समजा चूक वाटलें तर आपण निषेधाचा ठराव करायला हवा. तुम्हीं त्यांत सहभागी व्हाल ना ? असा प्रश्न कम्युनिस्टांस विचारण्यांत आला. त्यांनीं या गोष्टीला नकार दिला. त्यांच्या मनांतलें रशियन धार्जिणें रूप दिसून आलें. तडजोड झाली नाहीं. पुढें जागतिक युद्ध सुरू झालें. कम्युनिस्ट, सोशालिस्ट दोघे लढ्याची भाषा बोलत होते. जयप्रकाश पुण्याच्या सभांतून म्हणाले, " मी देशभर गर्जना करीत हिंडेन कीं ब्रिटिशांना मदत करतां कामा नये. आपण आपला लढा पुकारला पाहिजे. " कम्युनिस्ट, सोशलिस्ट, इतरहि गिरफदार झाले. पुढें कॉंग्रेसची राष्ट्रीय सरकारची मागणी नाकारल्यामुळें आणि युद्धविरोधी प्रचारास परवानगी न मिळाल्यामुळें गांधी-जींनीं वैयक्तिक लढा पुकारला. भराभरा परिस्थिति बदलत होती. रशियावर जर्मनीनें हल्ला चढविला. कम्युनिस्टांचें युद्धविरोधी धोरण जाऊन युद्धमदतीचें धोरण आलें. इकडे जपान भराभरा विजयी होत पूर्वेच्या दारांत आला. हिंदुस्थानचें काय होणार ? गांधीजींनीं चलेज़ाव मंत्र उच्चारला. जे इंग्रजांना चलेजाव म्हणतात ते जपान्यांचें थोडेंच स्वागत करतील ? म्हणून जपानला हा 'चलेजाव' लढा शह होता. महान् लढा पेटला. जे समाजवादी बाहेर होते ते भूमिगत झाले. मोठमोठे गांधी–वादीहि त्यांना मिळाले. सोळा महिने गांधी-वादी, समाजवादी एका धोरणानें वागत होते. प्रतिसरकारें स्थापन झालीं. कोठें कोठें ब्रिटिश सत्ता संपली. जयप्रकाश तुरुंगांतून निसटले. आझाद दस्त्यांची संघटना त्यांनीं आरंभिली. तों तिकडे महात्माजींचा उपवास सुरू झाला. भेटीला जाणाऱ्यांजवळ मोडतोडीविषयीं त्यानीं नापसंती दर्शविली. सोळा महिने सहकार्य देणारे गांधीवादी पुढें दूर राहिले. कांहीं थोडे समाजवाद्यांबरोबर शेवटपर्यंत राहिले. पुढें लढा थांबल्यासारखा झाला. नेताजींचा तिकडे महान् प्रयोग चालला होता. चलो दिल्ली करीत आझाद सेना येत होती. परंतु अणुबॉम्ब आला. जपान शरण आलें. नेताजींचें स्वप्न संपलें. तेहि देवाघरीं गेले. दोस्त विजयी झाले. पुढें कॉंग्रेस नेते सुटले. वाटाघाटी चालल्या. निवडणुका झाल्या. सारे बंधमुक्त झाले.

४२ च्या लढ्यांत समाजवाद्यांनीं राष्ट्रभर इतरांच्या सहकार्यानें सरकारी

म्हणा. तुमचा समन्वयवाद, आमचा लोकशाही समाजवाद. जाऊं या जनतेंत. परंतु अशा समंजसपणाच्या ऐवजीं समाजवादी पक्षाच्या मरणाची वाट पहात असाल आणि त्यासाठीं सारखीं कारस्थानें करीत असाल तर तुमचें आणि या महान 'राष्ट्राचें' हि त्यांत मरण आहे. पाटील, ज़रा खोल विचार करावा !



## धर्मराज नि त्याचा कुत्रा

समाजवादी पक्ष १९३४ मध्यें स्थापला गेला. त्याची स्थापना झाल्यापासूनच सरदारजींच्या डोळ्यांत तो सलत आहे. त्यांनीं या पक्षाला शिव्या देण्यापलीकडे कधीं कांहीं केलें नाहीं. ते एकदां श्री. राजेंद्रबाबूंना म्हणाले, "तुमच्या बिहारमध्यें समाजवाद्यांचा धिंगाणा चालू आहे. मी तेथें असतों तर कधींच चिरडून टाकलें असतें त्यांना." प्रतिपक्षीयांस केव्हां एकदां चिरडीन असें सरदारांस होत असतें. सरदारांच्या रक्तांत थोडें हुकुमशाही रक्त आहे. माझें ऐकलेंच पाहिजे असें त्यांना वाटतें. पुष्कळ वर्षांपूर्वी सांगलीच्या एका सभेंत ते म्हणाले होते, लोक मला हिटलर म्हणतात. हिटलर होऊन मला देशाचें कल्याण करतां येत असेल तर मला कोणी हिटलर म्हटलें तरी वाईट वाटणार नाहीं." परंतु मला नम्रपणें म्हणावेंसें वाटतें कीं हिटलरी पद्धतीनें माझें केलेलें कल्याण मला नको. आणि हें कल्याण कीं अकल्याण आधीं ठरवायचें कोणी? हिटलरनें आपण होऊनच ना? सरदार विलीनीकरणाचें मोठें काम करून जर्मन संस्थानें एकत्र करून नवजर्मनी निर्मिणाऱ्या बिस्मार्कचें काम करीत आहेत. बिस्मार्कहि लोखंडी वृत्तीचा होता. त्याचें धोरण (Blood and Iron Policy) म्हणजे शस्त्रास्त्रांच्या खणखणाटाचें. ऐकतां कीं नाहीं कीं टाकूं चिरडून असें सारेच हुकुमशहा गर्जत असतात. हिट्लर, बिस्मार्क यांच्यांतील गुणविशेष थोडेबहुत सरदारांच्या रक्तांत आहेत. मोठ्या मनुष्याचा, त्यांच्यामधील गुणदोषांसहित स्वीकार करावा लागत असतो. कधीं कधीं त्यांत दुसऱ्यांचा कोंडमारा असतो, मरण असतें, ही गोष्ट निराळी.

१९३७ च्या डिसेंबरमध्यें हरिपुरा येथें कॉंग्रेसचें अधिवेशन होतें. विषय-

नियामक मंडळाची बैठक सुरू होती. त्यांत सरदारजींनीं ती आपली ऐतिहासिक शिवी समाजवादीयांस प्रथम दिली. "कुत्तेके माफक" असे शब्द त्यांनीं उच्चारले. प्रेमानें उच्चारले. कारण माझें ज्यांच्यावर प्रेम असतें त्यांना मी अधिक कडक बोलतों, असें ते म्हणतात. समाजवादीयांस त्यांच्या प्रेमाचा अनुभव अजून यायचा आहे. क्रोधाचा नि तिरस्काराचा मात्र सदैव येत आहे.

४२ चा महान् संग्राम झाला. सारे लोक सुटले. राजकारण नव्यानें रंगू लागलें. त्या ४२ च्या लढ्यांत समाजवाद्यांनीं बहाद्दुरी केली. परंतु त्याचें कौतुक करणें दूरच राहिलें. पुन्हां सरदारजींची तीच शिवी "कुत्तेके माफक." राष्ट्राची गाडी हे अडवतात, कुत्र्याप्रमाणें मध्यें येतात, असें ते म्हणाले.

परंतु सरदारजींची ही शिवी मला फार आवडते. कारण धनी रागावला तरीहि त्याचें कल्याण कुत्रा करीत राहतो. आपला ठेवा चोरीस जाणार आहे याची जाणीव धन्याला नसली तरी त्याच्या कुत्र्याला असते आणि तो सावध राहतो. माणसापेक्षांहि कुत्र्याच्या इमानदारीच्या शेंकडों कथा आहेत. श्री छत्रपति शिवाजी महाराजांच्या कुत्र्याची समाधि हेंच सांगत आहे. श्री छत्रपती शाहूंच्या चितेंत उडी टाकणाऱ्या कुत्र्याची समाधि माहुलीस आहे. कुत्र्यांची कीर्ति भारतवर्षभर आहे. आणि दत्तात्रेयाजवळ सदैव कुत्राच असतो. प्रामाणिकपणा नि सेवा यांचें प्रतीक म्हणजे कुत्रा.

आपला आत्मा मरणानंतर चार कुत्रेच घेऊन जातात असें वेदकालीन मंत्र म्हणतात. परंतु मला सर्वांत कोठला कुत्रा दिसत असेल तर तो धर्मराजाचा. धर्मराज हिमालयाची यात्रा करून स्वर्गाकडे जायला निघतात. महान् यात्रा सुरू होते. सदेह स्वर्गास जाण्याची यात्रा. पांची पाडव निघतात. सती द्रौपदी निघते. बरोबर धर्मराजांचा कुत्राहि येतो. परंतु या यात्रेंत शेवटपर्यंत कोण टिकतें? सती द्रौपदी वाटेंत मरून पडते. नकुळ, सहसहदेवहि गळतात. गदाधारी भीम, गांडीवधारी अर्जुन. तेहि गतप्राण होतात. धर्मराज धीरोदात्तपणें पुढें जात असतात. तो कुत्रा टिकतो. तो गळत नाहीं, मस्त नाहीं. स्वर्गाच्या दारांत धर्मराज उभे राहिले तेव्हां त्यांच्याजवळ तो कुत्रा होता. इंद्र म्हणाला, "आंत या, परंतु तो कुत्रा नको." धर्मराज म्हणाले, "कुत्रा नको असेल तर मीही आंत येत नाहीं." शेवटीं कुत्र्यासह धर्मानें स्वर्गात प्रवेश केला. सुंदर गोष्ट.

कुत्र्याची पुण्याई, सचोटी, प्रामाणिकपणा, कसोटीस उतरली. समाजवादी पक्ष याप्रमाणेंच गांधीजींचा कुत्रा आहे. गांधीजींच्या ध्येयांची तो काळजी घेतो. आज गांधीजींच्या प्रभावळींतील माणसें हुकुमशाही होत आहेत. लोकशाही वृत्तीचा अस्त होत आहे. गांधीजी म्हणत:

" I am the greatest democrat. "

" मी सर्वांत मोठा लोकशाही वृत्तीचा आहें. "

परंतु आमचें सरकार रावळगांव, मनमाड इत्यादि ठिकाणीं शान्तपणें काम करणाऱ्या समाजवाद्यांना कायद्यानें हांकलून देतें! गांधीजींची लोकशाही कोठें गेली रे बाबा? कॅाँग्रेसच्या हुकमतीखालीं असणाऱ्या संस्थाच तेवढ्या काम करीत रहाव्या असें जर कॅाँग्रेस श्रेष्ठी आणि कॅाँग्रेस सरकारें म्हणतील आणि तसें करतील तर ती हुकुमशाही होईल. कॅाँग्रेस सरकार हें मग फॅसिस्ट ठरेल. समाजवादी पक्ष लोकशाहीचा भक्त आहे. फॅसिझम, हुकुमशाही यांचा तो कट्टा द्वेष्टा आहे. महात्माजींच्या लोकशाहीच्या ध्येयाचा सांभाळ समाजवादी करीत आहेत. त्यांच्या संघटनांत लोकशाही पद्धत आहे. त्यांच्या पुरस्कारानें चाललेली मजदूर सभा ही लोकशाही पद्धतीनें चालते.

महात्माजींचीं जीं इतर ध्येयें, धार्मिक विषमता, सामाजिक विषमता दूर करणें, यांचीहि कदर, या ध्येयांचीहि प्रखरता जितकी समावाद्यांजवळ आहे तितकी अन्यत्र कोठें आहे? जातीय कत्तलीच्या वेळेस मोठे मोठेहि जरा तत्वच्युत होऊं लागले. कांहीं कॅाँग्रेसवाले तर म्हणूं लागले, " पाकिस्तान झालें. आतां मुसलमानांचें येथें काय? " वाहवारे गांधीनिष्ठ कॅाँग्रेसवाले! येथें अजून ३॥–४ कोटि मुसलमान बांधव आहेत. ते तुमचे आहेत. ख्रिश्चन, मुसलमान, शीख, पारशी—सर्वांचें एक महान् राष्ट्र निर्मावयाचें आहे. आज आपण राष्ट्र म्हणून खरोखर नाहींच आहोंत. प्रांतभेद, जातिभेद, धर्मभेद यांचा सर्वत्र बुजबुजाट आहे. या चिखलांतून नवराष्ट्रनिर्मितीचें सुंदर कमळ फुलवायचें आहे. तें काम कोण करणार?

मुंबईजवळ कुर्ल्यांत किती जातीय तेढ. परंतु मुंबईचा कोणी कॅाँग्रेसवाला तेथें जाईल तर शपथ. तेथें सभा घ्यावी असें सरदारांना नाहीं वाटलें. परंतु त्या आगींत श्री. जयप्रकाश गेले. श्री. अशोक गेले. श्री. अच्युतराव गेले. महात्माजींच्या ध्येयांचे ते पुजारी आहेत म्हणून गेले. आणि राष्ट्रसेवादलासारखी

दडपशाहीस संघटित तोंड दिलें. जनतेनें त्यांना भक्तिप्रेम दिलें. परंतु कृपलानी मुंबईच्या अखिल भारतीय समितींत म्हणाले, " तो लढा चालवणाऱ्यांविषयीं जितकें कमी बोलावें तितकें चांगलें. " ठीक बाबा. समाजवाद्यांनीं काँग्रेसच्या नांवानें मोडतोडी केल्या, दुधाच्या दुकानांत बसून दारू पाजली, असे उद्गार अनेक काँग्रेसश्रेष्ठी काढीत. परंतु १६ महिने या समाजवाद्यांबरोबर दिवाकर, सुचेता कृपलानी, स्वामी आनंद अशीं माणसेंहि होतीं. अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांच्यासारखीं तर शेवटपर्यंत होतीं. किती जणांचीं नांवें सांगूं? बाहेर आगगाड्या पडत आहेत हें ऐकून तुरुंगांत शंभर टक्के गांधीवादीहि नाचले. गांधीवादी लोकांनीं भुसावळच्या रेल्वेशीं संबंध असणाऱ्यांना रेल्वे नष्ट करा असें सुचविलेलें मला माहीत आहे. परंतु अजूनहि शिव्याशाप फक्त समाजवादी लोकांनाच देण्यांत येतात. समाजवादी लोकांनीं प्राण पवित्र मानिले. प्राणहानि केली नाहीं. असो. काँग्रेसश्रेष्ठांनीं झिडकारलें तरी किसान, कामगार, विद्यार्थी, यांनीं समाजवादी पक्षास भक्तिप्रेम दिलें. कम्युनिस्टांनीं दगा दिला होता. देशासाठीं मरणाऱ्यांना त्यांनीं देशद्रोही म्हटलें होतें. एक दिवसहि संप त्यांनीं करूं दिला नाहीं. आणि तेच कम्युनिस्ट आतां नऊ ऑगष्ट साजरा करतात! सारा दंभ. समाजवादी पक्ष कामगारांत संघटना करायला उभा राहिला. आज कामगार संघटनेंत त्यानें मानाचें स्थान मिळविलें आहे. परंतु त्यांच्या आड येत असेल तर काँग्रेसच.

देशाची फाळणी होऊन देश स्वतंत्र झाला. कत्तली, निर्वासितांचे लोंढे, अपार आपत्ति आल्या. गांधीजी प्राण पदोपदीं हातीं घेऊन राष्ट्राचा आत्मा सांभाळीत होते. तिकडे काँग्रेसाविषयीं अप्रीति उत्पन्न होत होती. कांहीं काँग्रेस-वाले जातीय होऊं लागले. सरदारांसारखे रा. स्व. संघास शाबासकी देऊं लागले. यामुळें नरेन्द्रदेव चिडले. किसान कामगारांतहि असंतोष पेटत होता. काँग्रेसचें धोरण भांडवली दिसूं लागलें. षण्मुखं वगैरे मंत्री होऊन भांडवलदारांस सांभाळूं लागले. गांधीजी म्हणाले, " काँग्रेस समाजवादी पक्षाच्या हातीं द्या. नरेन्द्रदेवांस अध्यक्ष करा. " परंतु महाराष्ट्रीय देवांनीं विरोध केला. मग इतरांनीं. गांधीजी प्रार्थनेच्या प्रवचनांत म्हणत, " आज माझें कोण ऐकतो? ". ते मीराबेनजवळ म्हणाले, 'मी मृतवत् आहें.' प्रभूनें अखेर त्यांना नेलें. जातीय संघटनेनें राष्ट्रपित्याचा प्राण घेतला. समाजवादी पक्षाचें टपाल पहायला, गुप्त पोलीस टपलेले. परंतु इतरांचीं

खुनी कारस्थानें प्रान्तिक वा मध्यवर्ती गृहमंत्र्यांस दिसलीं नाहींत. जयप्रकाशांनीं या गोष्टींवर टीका केली. त्यामुळें त्यांच्यावर सारे चवताळले. यांना गृहमंत्रिपदाची हांव आहे असें म्हणण्यापर्यंत कांहींची मजल गेली. फार दिवस हे समाजवादी कॉंग्रेसमध्यें राहूं शकणार नाहींत असें सरदार बोलले. समाजवादी पक्ष कॉंग्रेस सोडणार अशा सारख्या कंड्या उठत. आपण कॉंग्रेस सोडायची कीं नाहीं याचा विचार समाजवादी पक्ष करीत आहे. ते पटकन् निर्णय घेत नाहींत म्हणून त्यांच्यावर टीकाहि होई. परंतु यांतच समाजवादी पक्षाचा मोठेपणा आहे. अर्जुनाच्याच मनांत युद्ध कसें करूं असा विचार आला. कारण तो महामना होता. इतरांच्या मनांत तसा विचार आला नाहीं म्हणून का ते अर्जुनाहून मोठे ? अर्जुन मनानें मोठा होता. कालपर्यंत ज्यांना प्रणाम केला त्यांना बाण कसे मारूं ? समाजवादी पक्ष म्हणून पुनः पुनः विचार करीत आहे. कॉंग्रेस एका क्षणांत सोडतां येईल. परंतु तें आंतडें तोडण्याप्रमाणें आहे. तें सुखाचें नाहीं. कॉंग्रेसमधून समाजवादी पक्ष बाहेर पडला तर कॉंग्रेसची आंतरराष्ट्रीयदृष्ट्या थोडी तरी प्रतिष्ठा कमीच होणार. पंडित जवाहरलालांची थोडी चमत्कारिक स्थिति होणार. परंतु हीं सर्व दुःखें गिळून कांहीं तरी निर्णय घेण्याची आज पाळी आली आहे. आणि त्यासाठीं नाशिकला हें अखिल भारतीय समाजवादी अधिवेशन भरत आहे. या संबंधींचे आणखी विचार उद्यांचे अंकीं.



## नाशिकला भरणारें अखिल भारतीय समाजवादी अधिवेशन

( लेखांक २ )

समाजवादी पक्षासमोर आज महत्त्वाची समस्या आहे. काँग्रेसमध्यें रहायचें कीं दूर व्हायचें. तुम्हीं काँग्रेसमधून जात कां नाहीं असें कित्येक वर्षांपासून त्यांना विचारण्यांत येत आहे. जोंपर्यंत ब्रिटिश सत्ता होती, साम्राज्यशाही लढा द्यावयाचा होता, तोंपर्यंत एकजूट राखणें अवश्य होतें. सर्व शिव्याशाप सहन करीत समाजवादी पक्ष राष्ट्रीय एकजुटीसाठीं म्हणून काँग्रेसमध्यें होता. ब्रिटिश गेल्यावर काँग्रेस बरखास्त होईल असें पुढाऱ्यांच्या ४२ मधील उद्गारांवरून वाटत होतें. परंतु काँग्रेस बरखास्त झाली नाहीं. काँग्रेस या नांवांतील जादु, वैभव, मोठेपणा अधिकारारूढ पक्ष काय म्हणून सोडील? महात्माजींनीं इच्छा दर्शविली कीं आतां समाजवादी अध्यक्ष करा. १९२९ मध्यें जवाहरलाल हे समाजवादी मताचे अध्यक्ष झाले. आतां १९४८ मध्यें समाजवादी पक्षाचा होणें जरूर होतें. कारण शेतकरी कामगार यांना आपला कोणी तरी तेथें दिसला पाहिजे होता. गांधीजी राष्ट्राची नाडी ओळखतात म्हणून सारे म्हणतात. परंतु नाडी ओळखणाऱ्यानें नाडी ओळखून जें सांगितलें तें करायला मात्र सरदार गट तयार झाला नाहीं. आज काँग्रेस आणि सरकार एकरूप आहेत. काँग्रेस बरखास्त करावी तर सरकारला आधार कोणाचा? देशांत पोकळी निर्माण होईल. तेव्हां काँग्रेस या संस्थेद्वाराच सरकार राष्ट्राशीं संबंध ठेवणार. काँग्रेसमध्यें जवाहरलाल असले तरी समाजवादाविरुद्धच बाकीचे सारे आहेत. आपण सर्वोदय तत्त्वज्ञानाचे उपासक असें ही मंडळी म्हणत असते. परंतु सर्वोदय म्हणजे काय? सर्वोदय म्हणजे का श्री. बिर्लाशेटजींचा उदय, श्री. दालमियांचा उदय? जे आज कोट्याधीश आहेत, ज्यांच्याजवळ ठायीं

ठायीं बंगले आहेत, सारे सुखविलास आहेत, त्यांचाहि का अजून उदय करायचा आहे? त्यांच्या आत्म्यांचा उदय व्हायला हवा आहे आणि त्यांची संपत्ति राष्ट्राची होईल तेव्हांच तो उदय होईल. उदय करायचा आहे तो दरिद्र नारायणाचा. जो अंधारांत आहे त्याला प्रकाशांत आणायचें आहे; ज्याला घरदार नाहीं त्याला घरदार द्यायचें आहे; ज्याला अन्नवस्त्र नाहीं त्याला अन्नवस्त्र द्यायचें आहे; ज्याला शिक्षण नाहीं, ज्ञानविज्ञान नाहीं, कलेचा आनंद नाहीं, विश्रान्ति नाहीं, दवा नाहीं, हवा नाहीं, त्यांना हें सारें मिळेल असें करायचें आहे. ज्यांच्या जीवनांतून आशेचा अस्त झाला आहे, त्यांचा उदय करायचा आहे. समाजवादी असें नाहीं म्हणत कीं, भांडवलदारांना, जमीनदारांना गोळ्या घाला. श्री. मुरारजीभाई रत्नागिरी जिल्ह्यांत निगडी येथें गेले असतांना रागानें म्हणाले "आम्हांला कोणाला गोळ्या घालायच्या नाहींत. आम्हांला सारे हवेत." सारे हवेत म्हणजे पिळणूक करणारे आहेत तसे हवेत का? समता म्हणजे ज्याला अधिक जरूर त्याला अधिक देणें. ज्याच्याजवळ आधींच भरपूर आहे त्याला का आणखी द्यावयाचें आहे? पू. विनोबाजी पवनारला एका शेतकरी बंधूजवळ बोलतांना म्हणाले, "सर्पाला निर्विष केल्यावर मारण्याची काय जरूरी? जमीनदार, भांडवलदार यांना शोषण करतां येणार नाहीं, अन्याय करतां येणार नाहीं, असें केलें म्हणजे झालें ना?" सर्वोदय म्हणणारे सरदारपंथी लोक याप्रमाणें भांडवलशाहीला, जमीनदारीला निर्विष करूं पाहतात का? कॉंग्रेसनें जी आर्थिक धोरणाची पत्रिका प्रकाशिली, ती वाचूनच भांडवलदार ओरडूं लागले. परंतु पांढऱ्यावरचें हें काळें अजून कृतींत यायचें आहे. तें कधीं येणार हरि जाणे. वचने किं दरिद्रता?

सरदारपंथी गट आस्ते कदम जाणार; समाजवादी त्वरेनें चला म्हणणार. मरणोन्मुखाला आतां वाट पहायला लावूं नका. जनतेचा आतां अंत पाहूं नका. पंचायती राज्य हे शब्द गोड वाटतात. खेड्यांतील जमीन थोड्यांच्या हातांत जोंवर आहे तोंवर पंचायती कोणतें सुख आणणार? सारी शेती सामुदायिक करा किंवा गांवांत जो जो श्रमानें करायला तयार आहे त्याला खंडानें देत जा. जमीन वाटेल तेवढी एकाच्या मालकीची असणें पाप आहे. कां अजून ती वांटून देत नाहीं? एकदम सामुदायिक, सहकारी प्रयोग करण्याऐवजीं प्रत्येक

श्रमणाऱ्याला वाटूं दे कीं माझ्या मालकीची थोडी तरी जमीन आहे.

अमळनेरला १९३८–३९ मध्यें एक शेतकरी माता मला भेटायला आली. तिला लहान मुलगा होता. ती विधवा होती. तिच्या शेताचा सावकार लिलांव करणार होता. मी तिला म्हटलें "मी काय करूं? परंतु ज्या स्वराज्यासाठीं आम्हीं झगडत आहों तें आलें म्हणजे तुझ्या मुलाला पुढें जमीन देऊं. चिंता नको करूं." त्या मातेचे डोळे आशेनें चमकले. ती म्हणाली, "मी दहा वीस वर्षें थांबेन. परंतु माझ्या मुलाला पुढें जमीन मिळूं दे. तो खपेल, खाईल. मी नसलें, देवाघरीं गेलें, तरी ही भूमाता त्याला द्या. ती त्याला घांस देईल." १९४२ च्या लढ्यानंतर सुटल्यावर भुसावळजवळच्या खंडाळे गांवीं मी गेलों होतों. तेथील लोकांना म्हटलें, "स्वराज्य तुमच्यासाठीं आणायचें असून तुम्ही लढ्यांत कां नाहीं आलांत? शेती वांटून देऊं. प्रत्येकाला पांच सात बिघे जमीन देऊं. तें खरें स्वराज्य. एकाजवळ वाटेल तितकी जमीन नाहीं राहाणार." सभा संपल्यावर एक शेतमजूर माझ्याजवळ येऊन म्हणाला, "गुरुजी, खरेंच का आम्हाला जमीन मिळेल?" मी म्हटलें, "हो. मी खोटें कशाला सांगूं? गांधीजींनी लुई फिशरजवळ ४२ सालींच म्हटलें होतें कीं, 'चलेजाव लढा सुरू झाला तर शेतकऱ्यांनीं आपल्या जमीनींचा ताबा घ्यावा.' क्रान्तीच्या काळांत आपणच ताबा घ्यायचा असतो. आज आतां शान्ति आहे. उद्यां निवडणुका होतील. कॉंग्रेस तुम्हांला जमीन देईल." त्या शेतमजुराच्या, त्या सालदाराच्या तोंडावरचा आशेचा आनंद मी कधीं विसरणार नाहीं. कुणबी, वारली, कातकरी, मावची, हरिजन, या सर्वांना जमीन कां नाहीं देत? महाराष्ट्र शब्दाची व्युत्पत्ति सांगतांना ज्ञान-कोशकार लिहितातः—'महार + राष्ट्र = महारांचें राष्ट्र तें महाराष्ट्र'! अशी व्युत्पत्ति आहे. त्याच अक्षरांपुढें तेंच अक्षर आलें तर एक जातें. सुकें × केळें = सुकेळें त्याप्रमाणें महार + राष्ट्र = महाराष्ट्र. सारी जमीन महारांची आहे. कोंकणांत होळीच्या वेळेस होम करतात तो महारवाड्यांत करतात. तेथें सारा गांव जमतो. महारांचा मान असतो. परंतु हा क्षणिक मान काय कामाचा? साऱ्या जमिनी इतरांच्या ताब्यांत गेल्या. या सर्वांना केव्हां देणार जमीन, बोला. परवां लोहिया म्हणाले, "मी आधीं जमीनदारी नष्ट करीन. मग नुकसानभरपाईची चर्चा." श्रमणाऱ्या जनतेला किती दिवस श्रमवणार? आतां वायदे नकोत. ताबडतोब कायदे करा. जमिनी वांटा, मागून सहकारी शेती, सामुदायिक शेती,

यांचे प्रयोग पटवा आणि तसें करायला प्रेरणा द्या. अनेक गोष्टी पुढें करतां येतील. परंतु तीव्रता हवी.

समाजवादी पक्ष तीव्रतेनें उभा आहे. कॉंग्रेसनें तर ठराव केला कीं सर्व कामगार संघटना राष्ट्रीय मजदूर संघामार्फतच व्हाव्यात. कॉंग्रेसजनांनीं अन्य संघटनांत जातां कामा नये. समाजवादी पक्ष तर स्वतंत्र संघटना करणार. कारण ते समाजवादी आहेत या सबबीवर त्यांना रा. मजदूर संघानेंच मागें हांकलून दिलें. स्वतंत्र कामगार संघटना करायची कीं शिस्तीचा प्रश्न आलाच. तसेंच ठायीं ठायींच्या कॉंग्रेस संघटना श्रमणाऱ्यांचे प्रतिनिधि घ्यायला तयार नसतात. अशा-वेळेस करायचें काय ? किती दिवस हें गुळमुळीत धोरण बघायचें ? कॉंग्रेस-पासून स्वतंत्र होण्याशिवाय कोणता मार्ग ? प्रामाणिकपणानें सारी शक्ति तरी आपल्या ध्येयासाठीं मग लावतां येईल.

समाजवादाशिवाय तरणोपाय नाहीं असें सारेच म्हणतात. सर्वोदयवालेहि कारखाने पुढें राष्ट्रीय करूं इत्यादि गोष्टी बोलतातच. डॉ. बाबासाहेब आंबेडकर मागें एकदां म्हणाले होते कीं "समाजवादाशिवाय तरणोपाय नाहीं. महारा-ष्ट्राला तरी नाहींच नाहीं." समाजवादी पक्षाला ते अजून कां मिळत नाहींत तें मला माहित नाही. त्यांना दलित जनतेला आधीं पुढें आणायचें आहे. नोकरी चाकरींत शक्यतों दवडायचें आहे. म्हणून सत्ताधारी ब्रिटिशांशींहि ते मिळून वागत. आज शे. का. फे. चे मुंबई कार्पोरेशन मधील सभासद कॉंग्रेस पक्षालाच पाठिंबा देणार! कारण सत्ताधारी पक्षाबरोबर राहिल्यानें पुढें जातां येतें. तें कांहीं असो. परंतु समाजवादाशिवाय गत्यंतर नसेल तर आज ना उद्यां या सर्वांना एकत्र यावें लागेल. महाराष्ट्रांत बहुजन समाजवाद म्हणूनहि निघाला आहे. समाजवाद हा श्रमणाऱ्यांसाठीं असतो. तो एखाद्या जातीचा नसतो. भाई एस. एम्. जोशी ब्राह्मणाचें का वर्चस्व आणूं पहातात ? ही का क्षुद्रता त्यांच्याजवळ आहे ? गेलीं वीस वर्षें हे तरुण ध्येयासाठीं शिव्या-शाप खात धडपडत आहेत ते का ब्राह्मण जातीचा मंत्री व्हावा म्हणून ? माझी महाराष्ट्रांतील बहुजनसमाजवादी पक्षाच्या पुढाऱ्यांस अंतःकरणपूर्वक प्रार्थना कीं समाजवादी पक्षांत या. तुम्ही चिटणीस व्हा. जयप्रकाश खरे समाजवादी आणि एस. एम्. गोरे, अच्युतराव, शिरुभाऊ हे का खोटे ? केवळ त्यांचीं आडनांवें ब्राह्मण पडलीं म्हणून ? अरेरे, केवढी ही संकुचितता ! हरिजनांनीं,

बहुजन समाजवादी मंडळींनीं, सर्वांनीं समाजवादी पक्षांत येऊन तो प्रबळ करावा. गरिबांचें राज्य लौकर आणण्यासाठीं प्रामाणिक ध्येयार्थी एकजूट करावी. आपणच खरे कॉंग्रेसचे भक्त असा सार्थ अभिमान धरावा. कारण कॉंग्रेस म्हणजे गरिबांची मान उंच करणें, भेद नष्ट करणें, सामाजिक, आर्थिक विषमता नष्ट करणें. अर्थात् हें अहिंसेनें व्हायला हवें. समाजवादी पक्ष हें अहिंसेनेंच करूं इच्छितो. ४२ सालीं मोडतोड केली म्हणून कांहीं आतां करायची नाहीं. आणि त्यावेळच्या मोडतोडींत अस्सल गांधीवादीहि होते. खापर केवळ समाजवादी पक्षाच्या माथ्यावर फोडणें अन्याय आहे हें प्रभूला स्मरून मी सांगतों. परंतु आज तो सवाल नाहीं. देश स्वतंत्र झाला आहे. आतां लोकशाही मार्गानेंच जायचें आहे. समाजवादी तरी जाऊं इच्छितात अशी माझी श्रद्धा आहे. स्वर्गीय महादेव भाईनीं लिहिलें होतें, " समाजवादी कार्यक्रम जनतेसमोर ठेवून बहुमतानें निवडून गेलेत आणि तदनुरूप कायदे करूं लागलेत तर त्यांत वावगें नाहीं. " समाजवादी पक्ष अशा मार्गानेंच जाऊं इच्छितो. इंग्लंडमधील समाजवादी याच लोकशाही मार्गानें गेले. सत्तर वर्षें इंग्लंडमध्यें समाजवादाचा प्रचार होतां होतां आतां त्यांचें सरकार दृढपणें सत्तारूढ झालें आहे. आपणांसहि सत्ता हातीं यायला वेळ लागेल. वर्तमानपत्रें, पैसा, प्रचार साधनें, सत्ता वगैरे गोष्टी आपल्या हातीं नसल्यामुळें आपणांस वेळ लागेल. परंतु वेळ लागला तरी अहिंसक लोकशाहीच्या मार्गानेंच जायला हवें. आमचा लोकशाहीवर विश्वास आहे असें मध्यंतरी अशोक मेहता यांनीं पत्रकांत म्हटलें होतें. आचार्य भागवत उरणला म्हणाले, " समाजवादी पक्षानें लोकशाही मार्गानें आणि विकेन्द्रीकरण डोळ्यांसमोर ठेवून जावें. " समाजवादी पक्ष हें ध्येय स्वतःसमोर व जनतेसमोर ठेवून वागेल अशी आशा आहे.

अखिल भारतीय समाजवादी पक्षाच्या कार्यकारिणीची बैठक मुंबईला मंगळवार तारीख १६ मार्चपासून सुरू होणार आहे. दोन दिवस चालून सतरा तारखेस कार्यकारिणी सायंकाळीं नाशिकला जाईल नि तेथें अठरा तारखेस अखेरची बैठक होईल. अधिवेशनांत कोणते ठराव करायचे, मांडायचे, धोरण काय, यासंबंधीं कार्यकारिणी गंभीरपणें चर्चा करीलच. शेवटीं अधिवेशनांत जे ठराव पास होतील तें अखेरचें धोरण ठरेल. असें तर वाटत आहे कीं समाजवादी पक्ष कॉंग्रेसपासून बहुधा दूर जाईल.

अति दुःखदायक ती घटना आहे. परंतु कर्तव्य हें कठोरच असतें. मी मागें जनवाणीच्या खास अंकांतील लेखांत लिहिलें होतें कीं या जन्मीं कॉंग्रेसच्या विरुद्ध बोलायला लागावें यापेक्षां मरावें वाटतें. नवीन जन्म घेऊन समाजवादाचें कार्य करावें. परंतु शेवटीं मरणें म्हणजे तरी काय ? देह टाकणें म्हणजेच का मरणें ? आपण क्षणाक्षणाला मरत आहोंत. जें योग्य नसेल तें टाकून द्यायला आपण सिद्ध झालें पाहिजे. आसक्ति कशाचीच नको.।

मला अनेक ठिकाणाहून पत्रें आलीं आहेत कीं, "गुरुजी, तुम्हीं कॉंग्रेसला माता म्हणत असा. मग आतां मातेला सोडून दूर कसें जातां ?" या माझ्या सर्व मित्रांना नम्रपणें मी सांगतों कीं माझी ध्येयभूत कॉंग्रेस माझ्या हृदयांत आहे. कॉंग्रेस म्हणजे शेवटीं कांहीं ध्येयें. तीं ध्येयें आजच्या कॉंग्रेसमध्यें मला दिसत नसतील तर माझ्या मनोमय कॉंग्रेसचा मी पुजारी होणें हेंच माझें कर्तव्य. कधीं कधीं ध्येयासाठीं मातेचाहि त्याग करावा लागतो. कारण मातेची सेवाहि मातेहून थोर अशा ध्येयासाठींच असते. कैकेयी रामावर प्रेम करी, तोंवर भरत कैकेयी मातेला भक्तिप्रेम देत होता. परंतु माता रामालाच घालवून द्यायला उभी राहिली तेव्हां भरतानें मातेचाहि त्याग केला.

"देवाच्या सख्यत्वासाठीं। पडाव्या जिवलगांशीं तुटी। प्राण अर्पावा शेवटीं" असें समर्थ सांगतात. माझी कॉंग्रेस माता रामाला दूर लोटीत असेल तर ? मुंबई शहरांत रात्रंदिवस घरकाम करणाऱ्याला 'रामा' म्हणतात. ज्याला आराम नाहीं तो राम. त्या कष्टमूर्ति श्रमी जनतेला, शेतकऱ्यांना, कामगारांना, जंगलांतील बंधूंना, आम्ही त्वरित कांहीं तरी भरपूर देणार नसूं तर काय उपयोग ? मी समाजवादी पक्षाचा सभासद नाहीं. समाजवादी म्हणून माझा उल्लेख केला जातो. माझी समाजवादी पक्षास सहानुभूति आहे, पाठिंबा आहे. कॉंग्रेस म्हणजे केवळ जवाहरलाल नाहींत. कॉंग्रेसची गति कोठें आहे, पावलें झपाट्यानें कोठें पडत आहेत, तें पाहिलें पाहिजे. आज कॉंग्रेसमध्यें सरदारपक्षाचें वजन आहे. जवाहरलालजी आज महान् त्याग करीत आहेत. ते समाजवादी पक्षाचे असे कधीं नव्हते. पक्षांत जाणें म्हणजे जरा संकुचित होणें, अभिनिवेश अंगीं येणें. पू. विनोबाजी तुरुंगांतून सुटून आल्यावर महात्माजींना म्हणाले, "मी सर्व संस्थांच्या पदाधिकारित्वाचे राजीनामे देतों. मी कार्य करीन. परंतु मोकळा राहून. कारण सत्य हें मोकळे-

पणानेंच पूजितां येतें. सत्याची संघटना करूं जाल, तें पक्षांत बसवूं बघाल तर थोडी तरी सत्यता कमी होते. " विज्ञान शिकवितांना सांगतात कीं प्रकाश-किरण माध्यमांतून पलीकडे जातांना जरा तरी वक्र होतातच. सत्य एखाद्या संस्थे-मार्फत जाऊं लागलें म्हणजे थोडें तरी वक्र होतें. जवाहरलाल मतानें समाजवादी असूनहि त्या पक्षाचे ते सभासद नाहींत. आणि कोणतीहि संस्था म्हटली कीं तेथें ध्येयें आचरणांत आणतांना थोडी तरी वक्रता येतेच. ध्येयवादाचा तितका सरळपणा तेथें रहात नाहीं. मी समाजवादी पक्षाचा नसलों तरी माझी ओढ त्या पक्षाकडे आहे. कारण आज काँग्रेस सरदारजींची आहे. जवाहरलालजी स्वतःच्या ध्येयांना मुरड घालून एकजुटीसाठीं काँग्रेसमध्यें आहेत. महान् संस्था, जिच्याद्वारा ते झगडत आले, जिच्या स्वातंत्र्ययुद्धांत ते महान् भागीदार होते, तिच्याशीं त्यांना जेवढी आध्यात्मिक, आंतरिक एकता वाटत असेल ! तितकी ४२ सालांतील लढ्यांत भाग घेणाऱ्या तरुणांस वाटणार नाहीं. आज महात्मा-जीहि नाहींत. तेव्हां जवाहरलालांना धीरानें तेथें राहणें भाग आहे. महात्माजी आंतरराष्ट्रीय कीर्तीचे होते. त्यांच्या बोलण्याचा जगावर परिणाम होई. ते गेल्यानें ज्यांच्या शब्दाला नैतिक मोल आहे असे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे जवाहरलालच फक्त आहेत. ते काँग्रेस नाहीं सोडूं शकणार. परंतु त्याचबरोबर देशाच्या रचनेंत, योजनांत, ध्येयवादित्वाचा समाजवादी सुगंध जरी त्यांनीं ओतला, तरी त्या रचना, त्या योजना संपूर्णपणें जनतेच्या आजच्या गरजा भागवणाऱ्या असतीलच असें नाहीं. जवाहरलाल ती गति देऊं बघतील परंतु ब्रेक फार आहेत. आणि त्यामुळें गति फारच मंद होईल अशी साधार भीति वाटते. अति गति ज्याप्रमाणें धोक्याची त्याप्रमाणें आस्ते कदम धोरणहि धोक्याचें असतें.

आज हिंदुस्थानला तारणारा समाजवादी पक्ष आहे असें मला वाटतें. काँग्रेसला सरदारी रंग चढणार. कम्युनिस्टांचा रशियन रंग. समाजवादी पक्ष हा श्रमजीवींसाठीं आहे. परंतु परराष्ट्रावर तो लोंबकळून नाहीं. कम्युनिस्टांजवळ लोकशाही वृत्ति, अहिंसक वृत्ति, प्रचारांतील प्रांजळपणा, निर्मळपणा इत्यादि गोष्टी नाहींत. समाजवादी पक्ष काँग्रेसमधील भांडवलशाही रंग टाळतो तद्वत् कम्युनिस्टी पद्धतींतील हुकुमशाही आणि साधनांची अशुद्धताहि टाळतो. काँग्रेस संपच नको म्हणणार. कम्युनिस्ट येतां जातां संप करा म्हणणार. समाज-वादी अगदीं अशक्यच झालें तर करायला पाहिजे असें म्हणणार. आजच्या

भाई एस. एम. जोशी संप होऊं नये, तडजोड व्हावी, म्हणून उपवास करीत आहेत. येतां जातां यांना संप हवा असें म्हणणारे एस. एम्. यांच्या उपवासानें तरी जरा निराळ्या रीतीनें बोलतील, बघतील अशी आशा राखूं या. जळगांवीं प्रेस कामगारांचें युनियन समाजवादी आहे म्हणून त्यांना लवादहि मिळूं नये अशासाठीं तेथील कांहीं थोरांनीं खटपटी केल्या. असो. समाजवादी पक्षानें किती तरी वेळां संप होऊं दिले नाहींत. परंतु त्यालाहि कांहीं मर्यादा आहे. म्हणून मी म्हणतों कीं आजची सरदारी रंगाची कॉंग्रेस आणि रशियनरंगी कम्युनिस्ट यांच्या मधला मार्ग म्हणजे समाजवादी पक्ष हा होय. हा पक्ष मार्क्सवादही जाणतो, त्याप्रमाणेंच भारतीय परंपराहि जाणतो.

जयप्रकाशानीं श्री. अरविंदांनां, श्री. कृष्णमूर्तींना, श्री. रामन् महर्षींना हांक मारली म्हणून कांहीं वृत्तपत्रकारांनीं टिंगल केली. परंतु त्यांच्या लक्षांत येत नाहीं कीं, मनुष्य अन्यायाविरुद्ध उभा राहतो तेव्हांहि त्याची नैतिक शक्ति, नैतिक बुद्धिच त्याला बंड करायला लावीत असते. या माणसाला सर्व सुखें आहेत. याला कां नाहीं ? मानव येथून तेथून समान. सुख दुःख सर्वांना आहे. अशी नैतिक प्रेरणाच बंड करायला प्रवृत्त करते. जो मनुष्य जास्तींत जास्त दुसऱ्यांशीं एकरूप होतो तोच बंड करतो. थोर आगरकर, महर्षि अण्णासाहेब कर्वे स्त्रियांच्या कैवारानें बंड करून उठले, कां ? कारण स्त्रियांच्या गुलामगिरीनें ते दुःखी झाले. महात्मा ज्योतिबा बंड करून उभे राहिले. कां ? जनतेच्या दुःखाशीं ते अधिक एकरूप झाले. आध्यात्मिकता ती हीच. आपला आत्मा देहाला ओलांडून लाखोंच्या सुखदुःखाशीं एकरूप होतो, तेव्हांच नवीन मार्ग दिसतो, नवीन क्रांति येते, नवीन संदेश येतो, मानवजात एक पाऊल पुढें जाते, एक पायरी वर चढते. म्हणून ठोकळेबाज क्रांतिकारकांनीं श्री. जयप्रकाशांची टिंगल करूं नये. "मार्क्स समजून घेण्याकडे" ( Towards the understanding of Marx) या थोर पुस्तकांत तो ग्रंथकार अखेरीस म्हणतो, " मानवाच्या आवश्यक गरजा भागल्या म्हणजे ही सारी मानवजात आणखी थोर क्षेत्रांत संचार करील. तेथील सत्यें शोधील." तेव्हां भाकरीची जरूर असली, आधीं असली तरी तेवढ्यावरच मानव जगत नाहीं. त्याला थोर भुका आहेत. क्रान्तिकारी मानवेन्द्रनाथ राय अतां मानव्यावर आले आहेत. संतांच्या भूमिकेवर जणूं आले आहेत आणि म्हणत आहेत कीं सारे आधीं चांगले व्हा.

म्हणून मी म्हणतों कीं भारतीय समाजवादी पक्ष मार्क्सवादावर पोसलेला आहे तसा तो भारतीय परंपरेवरहि पोसलेला आहे. भारतीय संस्कृति सहिष्णु आहे; लोकशाही प्रवृत्तीची, विचारांना वाव देणारी अशी ती आहे. अहिंसक रीतीनें प्रचार करा म्हणजे झालें. मग वेदान्त सांगा किंवा चार्वाकाचा केवळ भौतिकवाद सांगा.

पूर्व नि पश्चिम यांचा संगम म्हणजे भारतीय समाजवादी पक्ष. क्रान्तिकारक लेनिन आणि क्रान्तिकारक महात्माजी यांचा मधुर मेळ म्हणजे हा हिंदी समाजवादी पक्ष. हुकुमशाही आणि भांडवली लोकशाही यांच्यामधील मार्ग म्हणजे लोकशाही समाजवाद किंवा समाजवादी लोकशाही हा होईल. आणि हा मार्ग घेणारा हिंदुस्थान जगाच्या संस्कृतींत मग भर घालील. जगाच्या प्रयोगांतील चांगलें घेऊन आणि स्वतःच्या भारतीय परंपरेंतीलहि चांगलें घेऊन जगाच्या इतिहासांत भारतीय समाजवादी पक्ष नवीन पान उघडील अशी मला आशा वाटते. म्हणून मी पक्षसभासद नसलों तरी माझा जीव या पक्षाकडे ओढतो. काँग्रेस सरकारनें या पक्षाकडे मतभेद असले तरी सहानुभूतीनें बघावें. कम्युनिस्ट आणि सोशलिस्ट एकच असें अप्रबुद्धपणें म्हणूं नये. केवळ प्रचारी थाटानें, सत्तेची राजकारणें करण्यासाठीं म्हणून, निवडणुका जिंकण्यासाठीं म्हणून तसें म्हणणें निराळें. तें सत्य नव्हे. समाजवादी पक्षाला संघटना, प्रचार करायला, लोकशाही मार्गानें जायला सर्वत्र मोकळीक असावी. रावळगांवीं कित्येक महिने सतत असलेली सभाबंदी दूर करावी. समाजवादी गुंड नाहींत. कारण स्वतंत्र भारतांत ते लोकशाहीनें, अहिंसक रीतीनें जाऊं इच्छितात. गंगा यमुना, दोघांचा रंग निराळा. गंगा शुभ्र, यमुना काळीसांवळी; परंतु दोन्ही पवित्र. आणि माझा कृष्ण भगवान् काळ्यासांवळ्या यमुनेंतच अधिक रमला, तेथेंच डुंबला; त्या यमुनेच्या तीरावरच त्यानें वेणु वाजविली, सर्वांना एकत्र खेळविलें, बसविलें, जेवविलें, इंद्राविरुद्ध बंड केलें.

काँग्रेस गंगेप्रमाणें निर्मळ असेल तर हा श्रीजयप्रकाशजींचा समाजवादी पक्ष यमुनेप्रमाणें आहे. कृष्णभगवानाच्या पायाला स्पर्श व्हावा म्हणून यमुना उचंबळली. कृष्ण म्हणजे काय ? कृष्ण शब्दाचाहि कृषीशीं संबंध आहे का ? कृष्ण म्हणजे शेतकरी. कृष्ण म्हणजे गुरें चारणारा, घोडे हांकणारा, उष्टीं काढणारा, श्रमणाऱ्या सर्वांची मान उंच करणारा. समाजवादी पक्षाची यमुना अशा

कृष्णाच्या चरणासाठीं उचंबळणारी आहे. ती पवित्र आहे, गंभीर आहे. आणि म्हणूनच लोककल्याणकारी आहे अशी मला श्रद्धा आहे. आणखी थोडें पुढील अंकीं लिहीन.



## नाशिकला भरणारें अखिल भारतीय समाजवादी अधिवेशन

( लेखांक ४ )

आज काँग्रेसपासून अलग व्हावयाचें कीं नाहीं हें नाशिकला ठरेल. समतोलपणानें विचार करून समाजवादी आपलें धोरण ठरवतील. समाजवादी नवतरुणांनीं जुन्या थोर समाजवादी कार्यकर्त्यांचें म्हणणें ऐकावें. अधीरपणा नसावा. "अधीर माणसें खोटीं" असें समर्थांनीं म्हटलें आहे. परंतु शेवटीं असेंच दिसलें कीं, भारतांतील गरीब जनतेचे संसार सुखाचे करण्यासाठीं, त्यांना जीवनांत विकासाची संधि मिळावी म्हणून समाजवादी पक्षानें मोकळेपणानें स्वतंत्र संघटना करावी, प्रचार करावा, सेवा करावी, उद्यां वेळ आलीच तर शक्य तेथें सर्वत्र निवडणुकी लढवाव्या आर्थिक कार्यक्रम जनतेसमोर ठेवावा, लोकशाही मार्गानें जनतेचा संसार सुखाचा करण्यासाठीं लौकर समाजवाद आणण्यासाठीं शक्य त्या सर्व निर्मळ नि अहिंसक मार्गांनीं जावें, तर तेंहि करायला कर्तव्य म्हणून उभें रहावें. काँग्रेसमध्यें राहूनच बहुमत करून घ्यावें वगैरे गोष्टींना अर्थ नाहीं. आजचा सत्ताधारी गट इतका दृढमूल आहे, तो पुन्हां इतक्या अडचणी निर्माण करतो कीं तें शक्य होत नाहीं. त्यांच्या हातीं सत्ता आहे, संपत्ति आहे; त्यामुळें ते नाना युक्त्या प्रयुक्त्या करूं शकतात. तेव्हां अलग झाल्याशिवाय नीट कार्य करतां येणारच नाहीं असें वाटलें, अलग न होणें म्हणजे स्वतःचा कोंडमारा करून घेणें, स्वतःची कर्मशक्ति, ध्येयोत्कटता वायां दवडणें असेंच वाटत असेल तर स्वतंत्र होणें हेंच योग्य ठरेल. कारण आत्म्याचा कोंडमारा कधींही होतां कामा नये. तें सर्वांत महान् पाप होय.

कधीं कधीं अलग झाल्यानेंच मोकळेपणाचे संबंध राहतात. उगीच आमच्या

मार्गात हे अडथळे आणितात असें कोणासहि मग वाटावयास नको. श्री वल्लभभाईना हीं कुत्रीं उगीच गाडीच्या आड येतात असें मग वाटणार नाहीं. ज्यानें त्यानें सेवा करावी, संघटना करावी, विश्वास, प्रेम जनतेचें मिळवून घ्यावें. कॉंग्रेस सरकारापासून एक मात्र अपेक्षा आहे कीं जर महात्माजींचे अनुयायी म्हणवून घेत असाल तर निष्कारण कोणाची कुचंबणा करूं नका. जोंपर्यंत निर्मळ साधनांनीं, अहिंसक रीतीनें, लोकशाहीचा पुरस्कार करीत समाजवादी पक्ष जात आहे तोंपर्यंत केवळ सत्तेच्या जोरावर त्यांना हांकलूं नका. राष्ट्रीय मजदूर संघाचेच कार्यकर्ते सर्वत्र जावेत, तीच संघटना वाढावी म्हणून समाजवादी कार्यकर्ते आकसानें गुंड नका ठरवूं. त्यांनीं येऊं नये म्हणून महिनेच्या महिने १४४ कलम नका लावूं. एस. एम्. सारखे दिलदार कार्यकर्ते उपवास करीत असतांना खडकीच्या कारखान्यांतील ब्रिटिश अधिकाऱ्यांची बाजू नका घेऊं. महात्माजींची थोर शिकवण, सारे अहिंसक प्रचार करीत आहेत तोंपर्यंत सर्वांना स्वातंत्र्य देण्याची शिकवण सरकारनें विसरतां कामा नये. आणि न्यायीपणा तेव्हांच न्याय्य ठरण्याची शक्यता जेव्हां गरिबांच्या बाजूनें, श्रमणाऱ्यांच्या बाजूनें तुमच्या सहानुभूतीचा कांटा अधिक झुकता असेल. मी काल म्हटल्याप्रमाणें गंगायमुनांचे प्रवाह असे अलगपणें सेवा करोत, जनतेच्या रुक्ष संसारांत ओलावा आणोत. कदाचित् दोन्ही प्रवाह पुढें एकत्र पुन्हां मिळतीलहि. अरे आपण एकाच ध्येयासाठीं धडपडत होतों. आपणांस वाटलें कीं आपलें कांहीं निराळें आहे. पुन्हां एकत्र आलों. चला आतां मिळूं. मूकपणें सेवा करणाऱ्यांची, कोणत्याच पक्षाचा टिळा न लावतां व्यापक सहानुभूतीनें सर्वत्र प्रेम, सहिष्णुता, उदारता निर्मूं पहाणाऱ्यांची तिसरी गुप्त सरस्वती—तीहि या दोन्ही प्रवाहांना मिळेल. ती दोघांमध्यें सलोखा ठेवीतच राहील. आणि महान् त्रिवेणी संगम पुढें कदाचित् जनतेच्या सर्वांगीण सुखसागराला शतमुखांनीं उचंबळत जाऊन मिळेल. पुढचें कोणी सांगावें ? आज पृथक्पणेंच सेवा उभयतांस नीट करतां येईल असें वाटत असेल तर आनंदानें प्रयोग करा. कॉंग्रेसमध्यें अधिकारारूढ असणाऱ्या वडीलधाऱ्या मंडळींनीं या समाजवादी बंधूंना म्हणावें, " जा, तुमच्या ध्येयाप्रमाणें काम करा. दोघांच्या समोर जनता आहे, गांधीजी आहेत. आमचा तुम्हांस आशीर्वाद आहे. तुमची आम्ही कुचंबणा करीत नाहीं. जा. स्वतंत्र प्रयोग करा. आमचा तुम्हांस आशिर्वाद आहे. जनतेचा तुम्ही सेवेनें

विश्वास मिळविलात तर आम्ही तुमचें कौतुक करूं. जर नीट नाहीं जमत असें वाटलें तर परतहि या. मातेचें घर सदैव मोकळें आहे." अशा रीतीनें कॉंग्रेसनें आशीर्वाद द्यावा. समाजवादी पक्षानेंहि म्हणावें, "आम्हांला हळूहळू रेंगाळत जाणें नाहीं आवडत. आम्ही जातों पुढें. प्रणाम, माते प्रणाम. दुरून कृपा-दृष्टि ठेव. आम्हांला धडपडूं दे, कर्तृत्व दाखवूं दे. आम्हीं तुझीं लेंकरें. उज्वल इतिहास आम्हांला घडवूं दे. तुझी परंपरा अधिक नेटानें, निर्भयतेनें सार्थ करीत पुढें जाऊं दे. प्रेम गुलाम करणारें नसावें, मोकळीक देणारें असावें. आम्ही आज मोकळे होतों. सत्याचें, अहिंसेचें, प्रामाणिकपणाचें, संयमाचें, सहिष्णुतेचें बंधन आम्ही पाळूं. आम्ही खालीं मान घालावी लागेल असें कांहीं करणार नाहीं. सदसद्विवेकबुद्धीला स्मरून वागूं. नम्रपणें परंतु निर्भयपणें वागूं. प्रेमानें परंतु प्रसंगीं अनासक्त अशा कर्तव्यजन्य कठोरपणानेंहि वागूं. परंतु मन मोकळें ठेवूं. कोठलीहि क्षुद्रता, संकुचितता, आम्ही ठेवणार नाहीं. दिलदारी सोडणार नाहीं. प्रणाम, माते, प्रणाम. दूर गेलों तरी तुझींच आध्यात्मिक बाळें आम्हीं आहोंत."

मी समाजवादी पक्षास प्रेमानें यमुनेची उपमा दिली. परंतु यमुना निर्मळ करण्यासाठीं कृष्णाला तिच्या डोहांतील कालिया दूर करावा लागला. कालिया म्हणजे विषारी अहंकार. समाजवादी पक्ष सेवेनें मोठा होवो. अहंकाराचा फुंज जवळ नसो. कॉंग्रेसमधील लोकांनीं कांहीं म्हटलें तरी वडील मंडळी बोलताहेत, ठीक, उद्यां आशीर्वादहि देतील असें म्हणून जावें. आपण कोणाला तुच्छ मानूं नये. सार्वजनिक जीवनांत थोडाफार अहंकार, थोडाफार राग ठेवल्याशिवाय गत्यंतरच नसतें. कधीं कधीं आपली असीम श्रद्धाच दुसऱ्यांस अहंकाररूप वाटते. तो प्रश्न निराळा. परंतु थोडा अहंकार, थोडा राग शोभून दिसतो.

"क्रोधो हि निर्मलधियां रमणीय एव" ज्यांचीं अंतःकरणें निर्मळ आहेत त्यांचा रागहि गोड असतो. परंतु दुसऱ्यांस केवळ तुच्छ मानणारा अहंकार न शिवो. एवढें पथ्य पाळलें म्हणजे ही यमुना भगवंतास आवडणारी होईल.

प्रकृति नीट राहावी म्हणून पथ्यें पाळावीं लागतात. समाजवादी पक्षानेंहि अधिक कार्यक्षम होण्यासाठीं कांहीं पथ्यें कसोशीनें पाळलीं पाहिजेत. वाटेल त्यानें उठून पत्रक काढूं नये, बुद्धीचे फवारे उडवूं नये. जो तो बुद्धीच सांगतो. असें करूं नये. डॉ. लोहिया यांनीं परवां हिंदुस्थानच्या परराष्ट्रीय धोरणा-

संबंधीं कांहीं उद्गार काढले ! तुम्हीं आधीं पक्षांतील प्रमुखांशीं बोला, विचार-विनिमय करा. जगांत आज अमेरिकन आघाडी आणि रशियन आघाडी— दोन आघाड्या आहेत. आम्हीं अमुक एका पक्षाला मिळालेंच पाहिजे असें नाहीं. शक्य तों जगांतील या सत्तेच्या राजकारणापासून दूर राहणें हिताचें आहे. भोंवऱ्यांत ओढलेच गेलों तर पाहूं. परतु आजच कां कोठें गुंता ? तीस कोटींच्या राष्ट्राचें एक नैतिक वजन आहे. आम्हीं कदाचित् जगाचें हित अयस्थ राहूनच करूं. पंडितजींसारखा निर्मळ ध्येयवादी पुरुष तेथें उभा आहे. जो कधींहि क्षुद्रता करणार नाहीं, हात मलिन होऊं देणार नाहीं, उदात्तता सोडणार नाहीं, ध्येयवादित्व उचलून धरील, असा महापुरुष परराष्ट्रीय राज-कारण बघत आहे. सत्तेच्या राजकारणाच्या चिखलांत आज कशाला पडा ? साध्या साध्या गोष्टी करून पंडितजी सहानुभाव निर्माण करीत आहेत. गांधीजींची पवित्र रक्षा इतर कोठें दिली नाहीं, तरी ब्रह्मदेशाला दिली. थिबा राजाचें सिंहा-सन परत देववीत आहेत. तें केवळ सिंहासन परत देणें नाहीं. ब्रह्मी जनतेच्या हृदयसिंहासनावर परस्पर सद्भाव बसविणें आहे. आशियांतील राष्ट्रांत पंडितजी एक उदात्त ध्येयवादित्व निर्मितील. म्हणून डॉ. लोहियांसारख्यांनीं असें एकदम स्फूर्तीनें कांहीं बोलूं नये. त्यामुळें सर्वांची चमत्कारिक स्थिति होते. आपण जें बोलूं, जें करूं, त्याचा पक्षावर बरा वाईट परिणाम होत असतो. हें लहाना-पासून मोठ्यांपर्यंत सर्वांनीं नीट ध्यानांत घेऊन वागलें पाहिजे. आपण एकटे नाहीं. आपण कार्यकारिणींत भेटूं, विचार प्रगटवूं, इतर सहकारी मित्रांजवळ बोलूं, चर्चूं. एकदम वर्तमानपत्राकडे धांव कशाला ? आणि अशा नाजूक महत्त्वाच्या प्रश्नांवर ?

समाजवादी पक्षानें विधायक दृष्टीहि सोडूं नये. कामगारांची संघटना करून त्यांचे प्रश्न हातीं घ्या. लवादाकडे जा. संपहि आली वेळ तर करा. परंतु याबरो-बरच कामगारांत साक्षरता आणणें, कामगार विद्यालयें स्थापून त्यांना सज्ञान कार्यकर्ते करणें, त्यांच्यांत सहकारी चळवळी करणें, त्यांची बँक काढणें, स्टोअर काढणें, त्यांचें हॉस्पिटल, त्यांच्या चाळी बांधण्याची योजना, स्वच्छता-पथकें, सांस्कृतिक आनंद या सर्व गोष्टींकडे शक्तीप्रमाणें लक्ष द्यावें. अहंमदा-बादच्या कामगारांनीं राष्ट्रीय स्मारकनिधीसाठीं आठ लाख रुपये जमविले. मुंबई-च्या, तसेंच इतर ठिकाणच्या समाजवादी पक्षाकडे ओढा असणाऱ्या कामगा-

रांनाहि असें करतां आलें असतें. गांधी सहकारी बँक, गांधी चाळ, गांधी हॉस्पिटल, असें करतां आलें असतें. केवळ संप, रोज उठून कांहीं तरी कुरबुर नसावी. अर्थात् मालकांच्या अन्यायाविरुद्ध, बारीकसारीक शेंकडों कारवायां-विरुद्ध आपली तयारी हवीच. परंतु समाजवादी पक्षांतील कांहींनीं विधायक सेवे-कडे लक्ष द्यावें. फिरते दवाखाने, फिरतीं वाचनालयें, स्वच्छता पथकें, साक्षरता, कितीतरी करतां येईल. अर्थात् माणसें हवींत, साधनें हवींत. परंतु मुख्य म्हणजे ही दृष्टि हवी. ही दृष्टि आली म्हणजे लहान मोठी विधायक सृष्टि उद्यां उभारतां येईल.

समाजवादी पक्षाच्या सर्व कार्यकर्त्यांत परस्पर विश्वास हवा. तेथें पुन्हां गट नकोत. संग्राहक मोठी दृष्टि असावी. एकमेकांचे गुण बघावे, त्यांचें कौतुक करावें. एकमेकांविषयीं आपसांत कुरबुरी नसाव्यात. गैरसमज असतील तर भेटून दूर करावेत. आधींच चार माणसें मिळत नसतात. त्यांत पुन्हां त्यानें ह्याचें तोंड बघायचें नाहीं, यानें त्याचें नाहीं, असें केलें तर कसें व्हायचें ? आपण एक ध्येयार्थी भ्रातृसंघ आहोंत असें वाटलें पाहिजे. कोणी आला तर त्याची काळजी घेताहेत, कोणी आजारी पडला तर सारे त्याची चौकशी करीत आहेत, दुसऱ्या जिल्ह्यांतून कोणी आला तर आपलेपणानें त्याच्याजवळ बोलत आहेत, असें व्हायला हवें. दोन शब्द टनभर थीसीसपेक्षां, चर्चापेक्षां अधिक मोलाचे असतात, हृदयें जोडतात, पक्षाचें ते शब्द आंतरिक बळ वाढवतात.

कोठेंतरी केन्द्रीय ज्ञानशाळा असावी. तेथें सर्व आंकडे, सारी माहिती, कायद्यांचें ज्ञान, जगांतील इतर देशांतील कामगारविषयक वा अन्य कायदे, कोठें कसे निकाल दिले गेले, महागाईचीं कोष्टकें, जीवनराहणींतील बदल, सारें अद्यावत् हवें. अशी संदर्भसंस्था असावी. तेथें अभ्यास व्हावा. चारपांच कार्यक्षम माणसें तेथें तयार व्हावींत. तेथून छोटीं छोटीं सोपीं पत्रकें जनतेंत जावींत, जनतेंतील कार्यकर्त्यांस मिळावींत. अशीं पुष्कळ कामें आहेत.

समाजवादी पक्षाविषयीं मला आपलेपणा वाटतो, आशा वाटते. मी जें लिहिलें त्यांत शास्त्रीय समाजवाद नसेल. परंतु जें कांहीं माझ्या मनांत येतें तें मी लिहिलें आहे. तें कदाचित् कोणाला मोंगळ वाटेल. परंतु मला तें सारें स्वच्छ, स्पष्ट दिसत आहे. उद्यांच्या अंकांत मी याविषयींचा शेवटचा लेख लिहीन. कार्य अपार आहे. यथाशक्ति, यथारुचि, यथाप्रवृत्ति सर्वांनीं त्यांतून उचलावें; परंतु

जें उचललें असेल त्यांत सारी शक्ति ओतावी, आत्मा ओतावा. आपण किती करतों, किती केलें, हा शेवटीं प्रश्न नसून जें केलें त्यांत संपूर्ण शक्ति ओतली होती कीं नाहीं, तेथें कुचराई नव्हती ना केली एवढें पाहिलें म्हणजे झालें.



# नाशिकला भरणारें अखिल भारतीय समाजवादी अधिवेशन

( लेखांक ५ )

आज बुधवार सतरा मार्च. आणखी दोन दिवसांनीं म्हणजे १९ मार्च-पासून तों २१ मार्च अखेरपावेतों नाशिक येथें हुतात्मा कोतवाल नगरांत अखिल भारतीय .समाजवादी पक्षाचें सहावें अधिवेशन सुरू होईल. अत्यन्त आणीबाणीच्या वेळीं हें अधिवेशन भरत आहे. महत्त्वाचे प्रश्न डोळ्यां-समोर आहेत, महत्त्वाचे निर्णय घ्यावे लागणार आहेत. १५ ऑगस्टला द्विखंड होऊन देश स्वतंत्र झाल्यापासून सारख्या भांबावून टाकणाऱ्या घडामोडी देशांत होत आहेत. कत्तली, दंगली, निर्वासितांचे प्रश्न, काश्मीरांतील युद्ध, यांनीं आपण मेटाकुटीस आलोंच आहोंत. या सर्व भीषण परिस्थितींत स्थित–प्रज्ञा-प्रमाणें उभे राहून महात्माजी प्रकाश आणूं पहात होते. परंतु त्या महान् कार्यांत त्यांचीच प्राणज्योत मालवली. क्षणभर सारेंच सुन्न वाटलें. महात्माजींनीं समाजवादी पक्षांतील आचार्य नरेंद्रदेव वा जयप्रकाश यांना कॉंग्रेसचे अध्यक्ष करा म्हणून सुच-विलें. महापुरुषाचा सल्ला झिडकारण्यांत आला. फक्त पंडित नेहरू आणि मौलाना आझाद यांनीं त्याला संमति दिली होती. महात्माजींची दुसरी इच्छा ही होती कीं कॉंग्रेस ही सेवकांची संस्था व्हावी. परंतु तीहि दूर राहून आतां कॉंग्रेस एकपक्षी संस्था होणार. कॉंग्रेस नांवांतील प्रभावाचा एक पक्ष फायदा घेणार. कॉंग्रेसच्या स्वातंत्र्यलढ्यांत लाखोंनीं भाग घेतला. जे कॉंग्रेसच्या गांवचेहि नसतील, असेहि त्यांत होते. लहान मुलें होतीं. अनेक मतांचे, पक्षांचे लोक हाल अपेष्टा भोगायला लढ्यांत आले परंतु तें सर्व श्रेय आज कॉंग्रेस नांव फक्त स्वतःला लाऊन एक पक्षच बळकावणार. दिल्लीच्या मंत्रिमंडळांतहि घडामोडी होणार असें कळतें. अशा गंभीर प्रसंगीं समाजवादी पक्षाचें हें सहावें अखिल भारतीय अधिवेशन भरत आहे.

सौ. अरुणाबाईंनीं म्हटल्याप्रमाणें नवीन घटनेप्रमाणें समाजवादी पक्षाचें विसर्जन केल्याशिवाय काँग्रेसमध्यें त्यांना आतां राहतांच येत नाहीं. समाजवादी पक्षास काँग्रेसमध्यें संपूर्णपणें विलीन व्हा नाहींतर चालते व्हा असें अनेक वर्षांपासून कांहींचें सांगणें असे. महात्माजींच्या महान् प्रयाणानंतर लौकरच ही गोष्ट होऊन तसें व्हावें असें म्हणणाऱ्यांस आनंद होईल. महात्माजी सर्वांना शक्य तों एकत्र सांभाळीत होते. आतां तशी शक्ति कोणांतच नसल्यामुळें आपापले पंथ अवलंबिणें हाच मार्ग दिसतो. समाजवादी पक्षास काँग्रेसपासून दूर जाण्याचा दुःखदायक परंतु अपरिहार्य असा निर्णय घेणें प्राप्त आहे.

समाजवादी पक्षानें स्वतंत्र व्हायचें ठरविलेंच तर आपलें ध्येय निश्चित करावें. देशी नि विदेशी धोरण स्पष्ट करावें. अनेक प्रश्नांसंबंधीं कांहीं तरी स्पष्ट कल्पना त्यांनीं समाजवादी कार्यकर्त्यांसमोर ठेवली पाहिजे. किती तरी असे प्रश्न डोळ्यांसमोर उभे राहतात. परराष्ट्रीय राजकारणांत आज दोन तट जगांत दिसतात. एकीकडे अमेरिका. पश्चिम युरोपियन राष्ट्रें तर दुसरीकडे रशिया नि त्यानें व्यापलेले देश. अशा परिस्थितींत हिंदनें काय करावें ? डॉ. लोहिया सुचवितात त्याप्रमाणें कोठल्या तरी गटांत सामील झालेंच पाहिजे का ? कीं शक्य तों सत्तेच्या जागतिक राजकारणांत न शिरतां उंच भूमिकेवर राहून हिंदनें प्रचार करीत रहावें ? समाजवादी पक्षानें या बाबतींत कांहीं तरी ठरावायला हवें. तसेंच देशांत वागतांना समाजवादी लोकशाही मार्गानेंच जाणार ना ? देश स्वतंत्र झाल्यामुळें आतां शेतकरी, कामगार, मध्यमवर्ग यांच्यांत संघटना नि प्रचार अहिंसक मार्गानेंच करणार ना ? देशांत कांहीं वर्षें तरी औद्योगिक शान्ति राहावी असें देशाच्या अडचणी समजणारे सारेच म्हणतात. परंतु कारखान्यांतील नफ्यांत कामगारांचा वांटा, कारखान्यांतून व्यवस्था समित्या, कामगारांच्या इतर सोयी, किमान वेतन इत्यादि गोष्टी जोंपर्यंत ठरत नाहींत, तोंवर समाजवादी तरी काय करणार ? मुंबईस मागें मिल मालकांनीं नफ्यांत कामगारांना हिस्सा देणें साफ नाकारलें. बोनसहि कृपेनें देतों म्हटलें. अशा परिस्थितींत काय करायचें ? काँग्रेसची ध्येयनिष्ठा केवळ पंडितजींवरून का अजमावयाची ? मुंबई कॉर्पोरेशनमध्यें काँग्रेस पक्ष सत्तारूढ आहे. परवां बेस्ट कंपनीच्या व्यवस्थेंत प्रतिनिधि कोण निवडले गेले ? बेस्ट कामगारांची सेवा करणारे, त्यांच्या युनियनचे प्राण कॉर्पोरेटर जी. जी. मेहता नाहीं निवडले गेले,

तर एक मुस्लिम लीगवाले कॉर्पोरेटर त्यासाठीं निवडले जातात! समाजवादी जी. जी. मेहता, बेस्ट कामगारांचे प्राण जी. जी., यांच्यापेक्षां जे जातीय दृष्टीनें वागत आले तेच शेवटीं मुंबईतील कॉंग्रेस पक्षास जवळचे वाटावे ना? कामगारांस कॉंग्रेसविषयीं काय वाटेल? ही बेस्ट संस्था आपली आहे आणि आपण तिचें काम मनापासून करावें असें कामगारांस, नोकरचाकरांस वाटेल का? देशांत औद्योगिक शांति असावी, संप होऊं नयेत असें कागदी म्हणणें निराळें. कामगारांविषयींचा सर्व कॉंग्रेस संस्थेचा दृष्टिकोणच बदलेल तेव्हांच हें होईल. श्री. एस्. के. पाटिली दृष्टिकोण ठेवून भागणार नाहीं. औद्योगिक शांतीचा करार तुम्हीहि मान्य केला होता असें समाजवाद्यांस सांगण्यांत येतें; जनतेसहि तसें भासवण्यांत येतें. कांहीं शर्ती ठरल्या तरच समाजवादी पक्ष त्या करारास मान्यता देणार होता. परंतु सरदार वल्लभभाई म्हणाले, "तुम्ही का आम्हाला धोरण शिकवणार, हुकूम सोडणार?" धोरण शिकविण्याचा, हुकूम सोडण्याचा हा सवाल नाहीं. ज्यांच्या पासून औद्योगिक शांति अपेक्षितां, त्यांचें त्या बाबतींतलें म्हणणें ऐका. औद्योगिक शान्ति कांहीं विशिष्ट परिस्थितींतच शक्य असते. कांहीं गोष्टी होत असतील तरच शान्त रहा सांगायला धीर होतो. महा-युद्धाच्या भीषण काळींहि, जीवनमरणाच्या काळींहि इंग्लंड अमेरिकेंत संप झाले होते. समाजवादी पक्षानें असें असें झालें तरच औद्योगिक शांति शक्य होईल असें स्पष्ट सांगावें. तिसरी गोष्ट राष्ट्रीकरणाची. जमीनदारी तर नष्ट व्हायला हवी. वतनदारी, मिरासदारी आतां कोणाचीच नको. अमुक एकरांपेक्षां अधिक जमीन कोणाजवळहि असतां कामा नये असें ठरवा. ज्यांना ज्यांना जमीन नाहीं त्यांना द्या. आधीं पडित जमिनी, आणि नंतर ज्यांच्याजवळ अधिक आहेत, त्यांच्या काढून घेऊन द्या. त्या व्यक्तिगत द्यायच्या कीं सामु-दायिक सहकारी तत्त्वावर द्यावयाच्या तेंहि ठरवा. परंतु माझें तर मत कीं आधीं व्यक्तिगत द्या. मला जमीन मिळाली असें सर्वांस वाटूं दे मग सामुदायिक सहकारी प्रयोग करून प्रचारानें पटवा. जमिनीच्या बाबतींत त्याचप्रमाणें कारखान्यांच्याहि बाबतींत. कोणत्या मर्यादेपर्यंत कारखाने राष्ट्रीय करणार? आज ब्रह्मदेशांत इकमध्यें शें दिडशें कामगार ज्यांत आहेत असे कारखानेहि राष्ट्रीय करण्याचें ठरत आहे. आपल्याकडे कोणतें धोरण असावें? लहान कारखा-

ऱ्यांनीं कामगारहितविषयक जरूर त्या सर्व गोष्टी केल्या तर त्यांना वैयक्तिक मोकळीक ठेवावी का ? या सर्व बाबतींत मार्गदर्शन हवें आहे.

समाजवादी पक्षानें यंत्रोद्योग आणि ग्रामोद्योग यांचा मेळ घालतां येईल का याचा विचार करावा. जसें श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांनीं सुचविलें आहे कीं देशांतील गिरण्यांतील कापड परदेशीं पाठवावें; देशाला लागणारा कपडा लाखों गांवीं पसरलेल्या विणकरांकडून, त्यांच्या सहकारी संस्था निर्मून निर्मावा. त्याला लागणारें सूत सुधारलेल्या चरक्यांमार्फत गांवोगांवीं कांतून, तसेंच वर्धाशिक्षण पद्धतीच्या लाखों शाळांतून पुरवावें. असें समाजवादी पक्षास वाटतें का ? स्वस्त वीज निर्मून तालुक्या-तालुक्याच्या विणकर संघास पुरवतां येईल. टेक्निकल शाळा हजारों स्थापायला हव्यात. लाखों खेड्या-पाड्यांतून राहणाऱ्या कोट्यावधि जनतेच्या कल्याणाचे हे प्रश्न आहेत. यावर समाजवादी पक्षानें प्रकाश टाकावा.

एकेक गांव स्वावलंबी, स्वाश्रयी होईल का ? कीं गांवांचे गट करावे ? गांवांतील शेतीवाडी जोंवर सर्वांची नाहीं तोंवर केवळ पंचायतीनें काय होणार? ग्रामपंचायती करा. परंतु आधीं शेती वांटून द्या. ती महत्त्वाची वस्तु आहे. विकेन्द्रीकरण नि केन्द्रीकरण या संबंधींचीहि मतें समाजवादी पक्षानें उद्घोषावीं. तो तो तालुका घटक असावा कीं जिल्हा ? तालुका वा जिल्हा कांहीं आवश्यक बाबतींत तर स्वावलंबी असावेत. अन्न आणि वस्त्र या आवश्यक गरजा आहेत. त्या त्या गटांत त्या त्या घटकांत पुऱ्या व्हाव्यात. समाजवादी पक्षाचें यासंबंधीं काय धोरण ?

अखंड हिंदी राज्याचें सर्वांचें ध्येय असणारच आहे. परंतु भाषावार प्रान्त-रचना आतां थोपवितां येणार नाहीं. असें करतांना द्वेषमत्सर वाढूं नयेत म्हणून खबरदारी घ्यावी. सीमेवरच्या प्रदेशांत भानगडी येतील. परंतु प्रेमानें जुळतें मिळतें घ्यावें. शेवटीं परिणामी आपण सारे एक ही भावना प्रभावी असूं दे. अशा वेळेस जो मिळतें घेईल, हट्ट सोडील, तोच मोठा. हा गांव कन्नड हद्दींत जावा कीं महाराष्ट्र हद्दींत ? विकोपास जाऊं देऊं नका भांडण म्हणजे झालें. अशा वेळेस निकरावर गोष्टी न येवोत. प्रांतांचें त्याप्रमाणेंच मुंबईसारख्या शहरांचेंहि भवि-तव्य काय असावें ? मुंबई महाराष्ट्राला जोडणारें आहे. साऱ्या जिल्ह्यांतून लाखों लोक येथें येतात. सामोपचारानें प्रश्न सुटत नसेल तर जनमत घ्या आणि

सोडवा. मुंबईचें भांडवल कोणाचेंहि असो. सारें भांडवल शेवटीं श्रमांतून निर्माण होतें. तेव्हां तें श्रमणाऱ्यांचे आहे. इंग्रजांनीं हिंदुस्थानांत भांडवल गुंतविलें होतें म्हणून का हा देश त्यांचा ? तेव्हां भांडवल कोणा व्यक्तीचें हा प्रश्न उभा करणें म्हणजे अज्ञान होय.

मी या मुंबईच्या प्रश्नांत खोलआज शिरत नाहीं. परंतु मुंबई शहराला जें उत्पन्न असणार, जकातीचें, आयाती निर्यातीवरचें, प्राप्तीवरील कराचें तें मध्य सरकारलाच जाणार. बाकीचें उरलेलें म्युनिसिपालटीस जाणार. प्रांताला ज्याचें उत्पन्न राहातें असें मुंबईत फारसें काय आहे ? तेव्हां सर्व बाजूंनीं विचार व्हावा. समाजवादी पक्षानें भाषावार प्रान्तरचना, मुंबईसारख्या शहराचें भवितव्य, यासंबंधीं केव्हां तरी निश्चित धोरण आंखणें जरूर आहे. संस्थानांचा प्रश्न, नागरिकस्वातंत्र्य, निर्वासितांचा प्रश्न, असे दुसरेहि अनेक प्रश्न आहेत. उद्यां नाशिकला सर्वच प्रश्नांवर रोशनी टाकावी असें नाहीं. परंतु महत्त्वाच्या प्रश्नांसंबंधी तरी भूमिका स्पष्ट असावी.

मला समाजवादी पक्षाविषयीं अपार वाटतें. मी पक्ष सभासद नाहीं. मी सर्वांपासून सदैव दूरच रहात आलों. कधीं कधीं मला एकाकी वाटतें. परंतु दुरून जी ऊब घेतां येईल, जो प्रकाश घेतां येईल त्यावर मी समाधान मानतों. जे जें उदार आहे, उदात्त आहे, दीनवाणी मान उंच करणारें आहे, जेथें प्रान्तभेद, धर्मभेद, जातिभेद यांचा चिखल नाहीं, जेथें क्षुद्रता नाहीं, जेथें कांहीं तरी विशाल आहे, मानवतेची जेथें दृष्टि आहे, तेथें तेथें माझा माथा लवतो. संकुचित वातावरणांत, जातीय वातावरणांत मी गुदमरतों. कारस्थानें, कारवाया, सत्तेच्यीं राजकारणें यांचा मला वीट आहे. जेथें सेवेची भावना आहे, सर्वांचे संसार सुखाचे, विकासाचे व्हावेत म्हणून उत्कटता आहे, हें सारें अहिंसक प्रचारानें, लोकशाही मार्गानें व्हावें म्हणून श्रद्धा आहे, तेथें माझें मन लोभावतें. समाजवादी पक्षाविषयीं मला श्रद्धा वाटते. महाराष्ट्रांत काम करणें कठिण आहे. येथें जुने इतिहास, जुनीं बखबटें, जुने द्वेषमत्सर, यांचा अजून शाप आहे. परंतु समाजवादी पक्षानें सर्वांना थोर भूमिकेवर हांक मारावी. बहुजनसमाजवादी पक्षासहि हांक मारावी. मध्यम वर्गीयांस हांक मारावी. उदात्त ध्येयवाद न सोडतां जेवढा अविरोध निर्माण करतां येईल तेवढा करावा. शेवटीं नाहीं सारे आले, नाहीं संशय फेडतां आले तर गुरुदेव रवीन्द्रनाथांनीं सांगितल्याप्रमाणें

आपण आपल्या ध्येयानुसार एकटेंहि निघावें. ध्येयभगवान् आपल्याबरोबर आहे ही अभंग श्रद्धा हृदयांत असली पाहिजे.

भाई कोतवाल हुतात्मे झाले. ते समाजवादी पक्षांत होते. त्यांनीं असें कधीं म्हटलें नाहीं कीं एस्. एम्. येथें ब्राह्मण आहेत, अमुक येथें अमुक जातीचा आहे. समाजवादाचा श्रीगणेशा म्हणजे जातपात विसरणें, मानवतेच्या भूमिकेवर येणें. त्या ध्येयवादी हुतात्म्याच्या नांवानें वसविलेल्या भव्य नगरांत हें अधिवेशन भरत आहे. महाराष्ट्रांतील अनेक तरुण समाजवादी कार्यकर्ते तेथें नारायणराव गोरे यांच्या धैर्यशाली नि कर्तबगार नेतृत्वाखालीं रात्रंदिवस श्रमत आहेत. डॉ. उमत्तराव पाटील, माधव लिमये, निळु निमये, रावसाहेब ओक, बाळू खरे, बागाईतकर, श्रीरंग वेररकर, राजा बेदरकर, सौ. कुसुम कुळकर्णी, मांडगवणे, विठ्ठल पटवर्धन, वसंत उपाध्ये, अण्णासाहेब वैशंपायन, बा. न. राजहंस, प. स. भागवत, तुकाराम पवार, पंढरीनाथ पवार, शां. म. कामेत, कन्सारा, रामतेलंग, सौ. शांति नायक, कु. कुमुम कुळकर्णी, काबरा, शिवाजी नाईक, हरून अन्सारी, एक का दोन शेंकडों नवीन पिढीचे नऊ ऑगस्टवाले तरुण तेथें अधिवेशन यशस्वी व्हावें म्हणून राबत आहेत. महाराष्ट्र कष्टमूर्ति आहे. त्याच्याजवळ पैसा नसला तरी उत्कट ध्येयनिष्ठा असते. नाशिकचें अधिवेशन महाराष्ट्रभर नवप्रकाश नेवो. जातीयता नष्ट करून महान् समाजवाद निर्माण करायला ध्येयनिष्ठा देवो. महाराष्ट्रांतून शेतकऱ्यांचे कामगारांचे जथे तेथें येतील. मुंबईहून कामगार नि शेंकडों हजारों लोक जातील. सेवादलें येतील, तरुण येतील. नाशिक गजबजेल. सभा होतील, कलापथकांचे कार्यक्रम होतील. एक नवीन दृष्टि, नवीन वारें, महाराष्ट्रभर येवो. जातीयतेची, संकुचितपणाची लाट मागें पडून विशाल भावनेची, शुद्ध समाजवादी दृष्टीची भव्यदिव्य प्रचंड लाट महाराष्ट्रभर पसरो. तिचा ओलावा मिळून नवीन विचारांचें भरपूर पीक येवो. महाराष्ट्र महान् ध्येयांना मिठी मारायला, तीं कृतींत आणायला सर्व शक्तीनें नम्रपणें परंतु निर्भयपणें उभा राहो. आणि अखिल भारतीय दृष्टीचा, मानव्याच्या दृष्टीचा तर कधींच कोणास विसर पडतां कामा नये. अधिक काय लिहूं ?

उपजलां भावो। तुझ्या कृपे सिद्धी जावो

मी भारत-भाग्य-विधात्याला प्रार्थितों कीं समाजवादी पक्षाच्या मनांतील निर्मळ थोर ध्येयें तुझ्या कृपेनें सिद्धीस जावोत. शेवटीं आपले अखंड प्रयत्न आणि प्रभूची कृपा हींच माझ्या डोळ्यांसमोर असणार !



## समतोल नि स्पष्ट मार्गदर्शन

नाशिकला कालपासून अखिल भारतीय समाजवादी पक्षाचें सहावें अधिवेशन उत्साहानें सुरू झालें. उत्साह असला तरीहि एक प्रकारची गंभीर खिन्नताहि तेथें होती. अधिवेशन आणीबाणीच्या परिस्थितींत भरत आहे. सर्वांना भासणारी एक मोठी दुःखदायक उणीव म्हणजे आज महात्माजी आपणांत नाहींत. अध्यक्षांच्या भाषणांत नि सरचिटणिसांच्या अहवालांत याची वेदनामय जाणीव आहे. महात्माजी निघून गेलेले; राष्ट्रीय सभेची नवीन घटना; त्यामुळें पक्षविसर्जन किंवा कॉंग्रेसपासून अलग होणें, असे महत्वाचे गंभीर प्रश्न सोडवायचे होते. आणि ते त्या प्रकारें सोडवले जात आहेत.

बॅ. पुरुषोत्तमदास हे अध्यक्ष आहेत. त्यांचे भाषण अत्यंत स्पष्ट नि सुंदर आहे. परिस्थितीचें नीट आकलन त्यांत आहे. भावि मार्गदर्शन आहे. धोके, जबाबदारी यांची जाणीव करून देण्यांत आलेली आहे.

नागरिक स्वातंत्र्य आज धोक्यांत आहे ही गोष्ट आरंभींच अध्यक्षांनी मांडली आहे. इंग्लंडमध्यें मोठा मंत्री का असेना. त्याची मोटार रस्त्यांतील पोलीस अडवूं शकतो. परंतु आमच्याकडे काय आहे ? मागें मद्रासच्या हिंदूनें या बाबतींत अग्रलेख लिहिला होता. इंग्लंडमध्यें आज मजूर मंत्रिमंडळ आहे. अधिकारारूढ पक्षाच्या सभासदावर तेथें खटला होतो. साधा कायदा जरी मोडला तरी. परंतु आपणांस या गोष्टी शिकायच्या आहेत.

देशांत एकपक्षी सत्ता जणूं आज स्थापन होत आहे. विधायक टीकाहि आजच्या मंत्र्यांना सहन होत नाहीं. जनतेवर त्यांचा विश्वास नाहीं. नोकरशाहीवर अधिक विश्वास. खरी लोकशाही तेव्हांच येईल, जेव्हां लोकांना अधिक मोकळेपणा वाटेल. लोकसत्तेंत विरोधी पक्षाला फार महत्त्व आहे. आज तो विरोधी

पक्ष समाजवादी पक्षच होऊं शकतो. आज काँग्रेस सत्तारूढ आहे. दिल्लीला वल्लभभाई गृहमंत्री आहेत. त्या खात्याकडून फर्मान निघतें कीं "कोणाहि समाजवाद्याला आकाशवाणीवर व्याख्यानास वगैरे बोलावतां कामा नये." सरकारनेंच फक्त या प्रचार साधनांचा उपयोग करायचा का? मग एकतंत्री हुकुमशाहीच ती होईल. आज असा धोका आहे. अशावेळीं समाजवादी पक्षानें दृढ निर्धारानें उभें राहून या गोष्टींना आळा घातला पाहिजे.

अध्यक्ष नि सर चिटणीस जयप्रकाश दोघांनीं एक गोष्ट स्पष्ट केली आहे कीं काँग्रेसला विरोध म्हणजे राष्ट्रद्रोह नव्हे. इंग्रजांशीं लढा होता, काँग्रेस सर्व पक्षांची निष्ठा घेऊन लढत होती. तेव्हांची गोष्ट निराळी. आज काँग्रेस म्हणजे एक पक्ष आहे. जनतेला या गोष्टीची जाणीव करून द्यायला हवी. समाजवादी आज बाहेर पडूनच राष्ट्रसेवा अधिक करतील. विरोधी पक्ष म्हणूनच ते लोकशाही, नागरिक-स्वातंत्र्य सांभाळतील. पक्ष ठेवून आंत राहतांच येत नाहीं. अलग होणें हाच मार्ग.

परंतु अलग होणें म्हणजे अधिक जबाबदारी घेणें. दोघांनीं स्पष्ट केलें आहे कीं काँग्रेसशीं अधिक जवळचे आपणच आहोंत. दोघांची धर्मजात यांच्या पलीकडचीं दृष्टि आहे. काँग्रेसमध्यें आपले थोर मित्र आहेत. प्रेमस्नेह राहीलच. काँग्रेसला विरोध म्हणजे कांहीं धोरणांना विरोध. परंतु राष्ट्र-रक्षणासाठीं सारे एक. नेहरू सरकारचे हात बळकट करणें हेंच आपलेंहि काम.

विरोधी पक्ष उद्यां सत्ता घेणाराहि होईल. जनतेनें निवडून दिलें तर समाजवादी पक्ष सरकार बनवील. बॅ. पुरुषोत्तमदास म्हणतात, "निवडणुकी, विधिमंडळें म्हणजे कांहींना क्रान्तिहीन मिळमिळांत काम वाटतें. परंतु ही वृत्ति टाकायला हवी. विधिमंडळांतील कामहि क्रान्तिकारी असूं शकतें. आणि विरोधी पक्षानें नेहमीं का विरोधच करायचा? आपण जनतेसमोर कार्यक्रम ठेवूं. बहुमतानें निवडून येण्याची खटपट करूं. जनतेनें विश्वास टाकला तर कारभार हातीं घेऊं." जयप्रकाश येथें एक सूचना देतात कीं, "जरी विधिमंडळांतील कार्य महत्त्वाचें असलें तरी सत्तेच्या, निवडणुकीच्या कामापेक्षां सेवेच्या कामाला अधिक महत्त्व असूं दे. आज काँग्रेसमध्यें सरकार करील त्याला पाठिंबा देणें एवढेंच राहिलें आहे. निवडणुका आणि मंत्र्यांना पाठिंबा हेंच जणुं कर्तव्य. म्हणून कांहीं काँग्रेसजनांना स्वतंत्रपणें संघ करावा असें वाटूं लागलें आहे.

समाजवादी पक्षानें हा धोका ओळखावा. विधिमंडळें, स्थानिक स्वराज्य संस्था, यांतील कामापेक्षां अधिक संघटनेच्या कार्याला सदैव महत्त्व दिलें जावें." जयप्रकाशांची ही सूचना मोलाची.

पक्षानें आपली संघटना वाढवली पाहिजे. भरपूर प्रचार हवा. जनतेशीं संबंध जोडायला हवेत. घटना या अनुरोधानें बनवायला हवी असें पुरुषोत्तम सुचवितात. "संघटनात्मक कामाबरोबर विधायक सेवेवरहि भर द्यावा. आपण या गोष्टीकडे लक्ष दिलें नाहीं ती चूक झाली." असें जयप्रकाश म्हणतात.

जयप्रकाश आणि पुरुषोत्तम दोघांनीं डाव्यांचें ऐक्य या प्रश्नावर स्वच्छ प्रकाश पाडला आहे. डावे म्हटले म्हणजे कम्युनिस्ट डोळ्यासमोर येतात. परंतु दोघांनीं निःसंदिग्ध शब्दांत सांगितलें आहे कीं, त्यांच्याशीं एकजूट अशक्य आहे. कम्युनिस्ट ज्यांच्यांत मिसळूं इच्छितात, त्यांना नष्ट तरी करूं किंवा गिळून तरी टाकूं या हेतूनेंच ते मिसळत असतात. आज अनेक राष्ट्रांत काय झालें आहे ?

रशियाचे हस्तक म्हणूनच कम्युनिस्ट सर्वत्र वागतात हें जगांत स्पष्ट दिसत आहे. रशियाविषयीं आपणांस वाटलें तरी त्या राष्ट्राचे एजंट येथें सर्वत्र असणें हें कोण सहन करील ? हिंदी कम्युनिस्ट परवांपर्यंत नेहरू सरकार बळकट करा म्हणत होते. परंतु आतां सूर बदलला. नेहरू सरकार उखडायला ते तयार आहेत. रेल्वे कामगारांच्या बाबतींत पूर्वीपेक्षां अधिक चांगल्या अटी मिळत असतांहि ते रेल्वे कामगारांना तडजोडीचा सल्ला देणार नाहींत. जयप्रकाशांना त्यासाठीं शिव्या मिळत आहेत. रशिया बोले, कम्युनिस्ट चाले. हें सत्य आहे. म्हणून हिंदी कम्युनिस्ट हे पंचमस्तंभी आहेत. सर्व श्रमजीवि जनतेनें यांच्यापासून दूरच राहिलें पाहिजे.

जयप्रकाश, पुरुषोत्तम, यांनीं नैतिक मूल्यांवरहि भर दिला आहे. प्रतिपक्षी म्हटला कीं कोणताहि विधिनिषेध न पाळतां त्याला हाणायचें हें धोरण राक्षसी आहे. आपला प्रचार लोकशाहीला, मानवतेला शोभेसा हवा. गांधीजींची ही थोर देणगी आहे. अन्नवस्त्रसंपन्न असे पशु कांहीं आपणांस निर्मायचे नाहींत. मानवांसमोर थोर आदर्श ठेवायला हवेत. खून, लुटालूट, इत्यादि गोष्टी इतरांच्या आहेत. कम्युनिस्ट या बाबतींत कोणतेंच बंधन पाळीत नाहींत. म्हणूनहि यांच्याशीं एकजूट अशक्य.

त्यांच्याजवळ खरी लोकशाही वृत्तित नाहीं. हें आज पूर्व युरोपांतील कम्युनिस्टी कारवायांवरून दिसून येत आहे. झेकोस्लोवेकियांत परराष्ट्रीय मंत्री आत्महत्या करतात. अध्यक्ष बेनिस यांना मोकळेपणानें वावरतां येत नाहीं. ही का लोकशाही ? पोलीस दंडुक्याचें तेथें राज्य आहे. कोणी विरुद्ध असेल तर पाडा खून, घाला गोळी, ही का लोकशाही ?

कम्युनिस्टांखेरीज इतरहि डावे गट आहेत. परंतु कम्युनिस्ट स्टॅलिनचे पुजारी तर दुसऱ्या गटांचीं आणखी कांहीं दैवतें आहेत. मार्ग स्वच्छ नाहींत. नैतिक मूल्यें मानणार कीं नाहीं, लोकशाहीवर श्रद्धा आहे कीं नाहीं, केवळ सत्तेचींच संधिसाधु राजकारणें करायचीं कीं काय, या सर्व गोष्टींचा विचार करूनच या इतर डाव्यांबरोबर जातां येईल कीं नाहीं तें ठरवायला हवें.

आज देशांत् भेदांचीं भुतें थैमान घालीत आहेत. भाषावार प्रान्तरचना करायची असली तरी अनेक गोष्टींचा गंभीर विचार करा असें पुरुषोत्तम सांगत आहेत. एकराष्ट्रीय दृष्टि ही प्राणयम आहे. ती आधीं ठेवून मग काय करायचें तें करा. त्याप्रमाणेंच जाति, धर्म, या गोष्टी आपण विसरून गेलें पाहिजे. ज्या विषारी वातावरणामुळें महात्माजी मारले गेले तें दूर करण्यासाठीं मानव्याच्या विचाराची प्रचंड लाट आणायला हवी.

देशांत जी यादवी माजली, तिला कॉंग्रेसचें धोरणच कारणीभूत आहे. स्वस्तांत स्वातंत्र्य घ्यायला गेलेत. पाकिस्तान दिलें कीं प्रश्न मिटेल वाटलें. म्हणून अखंडत्वाचा बळी दिलात. परंतु व्हायचें तें झालेंच. अपार किंमत द्यावी लागत आहे. ब्रिटिशांशीं आपण् लढा केला असता तर यादवी माजली असती अशी भीति वाटत होती. परंतु शेवटीं यादवी आलीच. दोन तुकडे पडले ते पडलेच. महात्माजींनीं मोठ्या कष्टानें या गोष्टींना संमति दिली. परंतु यादवी कत्तली पाहून ते दुःखी झाले. तरीहि महान् आशेनें पाकिस्तान हिंदुस्थान यांच्यांत बंधुभाव, एक आत्मा निर्मावा म्हणून तो महापुरुष प्राण हातांत घेऊन धडपडत होता. आणि दिल्लीच्या उपवासानंतर पाकिस्तानांत जाऊं म्हणत होते. परंतु देवानें स्वगृहींच त्यांना नेलें. समाजवादी पक्ष सांगत होता कीं लढा करा. लढ्याशिवाय मिळालें कीं नाहीं स्वातंत्र्य असें म्हणून त्यांना हिणवण्यांत येतें; परंतु हा लढ्याशिवायचा सौदा किती महाग पडला. महात्माजींनाहि त्यांत आपणांस गमवावें लागलें, याचा विचार करा.

काँग्रेसपासून समाजवादी पक्ष दूर जात असला तरी शत्रुभावनेनें नाहीं. विरोधी पक्ष हाहि सरकारचाच एक भाग मानला जातो. आपणांस हें शिकायचें आहे. काँग्रेसला ब्रेक म्हणजे समाजवादी पक्ष. पुरुषोत्तम म्हणतात, "गेल्या वर्ष दीड वर्षांतील गोष्टीमुळें मी गुदमरून गेलों आहें. सर्वत्र गळचेपी केली जात आहे." काँग्रेसमधील कांहीं थोर माणसें लोकशाहीला प्राणासमान मानणारीं असलीं तरी सर्वांनाच ती आवडते असें नाहीं. अशा वेळेस अलग होऊनच थोर सेवा करतां येईल. राष्ट्राच्या महत्त्वाच्या प्रश्नांत एकजूट करतां येईल. राष्ट्रीय अस्तित्वालाच धोका आला तर सारें विसरून एक होतां येईल. परंतु त्यासाठीं पक्ष विसर्जन नको. महायुद्धांत इंग्लंडमध्यें हुजूर पक्षाशीं मजूर पक्षानें राष्ट्रीय सरकार बनवण्यांत सहकार्य केलें. परंतु तुमच्या पक्षाचें विसर्जन करा अशी अट नव्हती चर्चिलनें घातली. पक्ष स्वतंत्र ठेवूनहि राष्ट्रीय ऐक्यासाठीं, आणीबाणीच्या परिस्थितींत एकत्र येतां येईल. समाजवादी पक्ष काँग्रेसला पूरकच आहे. काँग्रेसमधील सारेच स्वतःला एक प्रकारें समाजवादी म्हणवतात. समाजवादी पक्षाचा हा विजय आहे. समाजवादी पक्ष नवीन श्रद्धेनें, थोर दृष्टीनें काँग्रेसविषयीं आदरभक्ति ठेऊन तिच्यांतील थोर पुढाऱ्यांविषयीं सद्भाव ठेवून अलग होत आहे. त्याच्याकडून थोर अपेक्षा केल्या जात आहेत. त्या पूर्ण करायला त्याला शक्ति मिळो. शेतकरीकामगारांनीं सर्व प्रकारची क्षुद्रता, जातीयता विसरून या ध्येयवादी, प्रांजळ पक्षाभोंवतीं उभें रहावें. विद्यार्थ्यांनीं, तरुणांनीं, सुशिक्षितांनीं या पक्षाभोंवतीं उभें रहावें. आपण नवीन सृष्टि निर्मू. हुकुमशाही सृष्टि नको. खुनी सृष्टि नको. थोडा उशीर झाला तरी चालेल. परंतु उच्च भूमिकेवरून हिंदी राष्ट्राचें राजकारण चालो. समाजवादीपक्ष अशी थोर दृष्टि घेऊन महान् ऐतिहासिक कार्य करायला उभा आहे. सर्वांना तो हांक मारीत आहे. तमाम शेतकरी, कामगार, नवयुवक, मध्यमवर्गीय सुशिक्षित पक्षाच्या निर्मळ आणि भव्य ध्येयाला कृतींत आणण्यासाठीं त्या हांकेला ओ देऊन येतील अशी मला आशा आहे. सारा महाराष्ट्र समाजवादी होवो. लपंडाव नकोत. डावपेंच कारवाया नकोत. राजकारण निर्मळ ध्येयवादी ठेवूं या. महात्माजींचा हा महान् आदर्श समोर ठेवून समाजवादी पक्ष जाऊं म्हणत आहे. त्याला यश इच्छिण्यापलीकडे दुसरें मी काय म्हणूं? समाजवादी पक्षाचा विजय होवो.

## समाजवादी पक्ष म्हणजे सत्याग्रही पक्ष

नाशिकला अखिल भारतीय समाजवादी पक्षाचें सहावें अधिवेशन अत्यंत उत्साहानें पार पडलें. हें ऐतिहासिक अधिवेशन होतें. महत्त्वाचे प्रश्न सोडवायचे होते. निर्णय घ्यायचे होते. आणि ते निर्णय घेण्यांत आले. परिषद फार चांगली झाली. सभासदांमध्यें एक प्रकारचें बंधुभावाचें वातावरण होतें. कांहीं ठरावांवर, प्रश्नांवर जरी पुष्कळ चर्चा झाली तरी कटुता कोठेंच नव्हती. अधिवेशनांतील आचार्य नरेंद्र देव, अच्युतराव, जयप्रकाश, लोहिया इत्यादींचीं भाषणें फार सरस, उद्बोधक अशीं झालीं. एकंदर परिस्थितीचें पर्यवलोकन करणारीं अशीं नरेन्द्र देव व अच्युतराव यांचीं भाषणें तर अपूर्व होतीं.

अच्युतरावांनीं अशी एक दृष्टि मांडली कीं, समाजवादी पक्ष हाच यापुढें महात्माजींचा वारसदार सत्याग्रही पक्ष होऊं शकतो. राष्ट्रीय सभा आतां सत्ताधीश आहे. आजपर्यंत ब्रिटिशांशीं लढतांना राष्ट्रीय सभा सत्याग्रह करी. आतां ब्रिटिशांशीं लढण्याचा प्रश्न नाहीं. परकी सत्ता गेली. परंतु त्याचा अर्थ असा नाहीं कीं, देशांतील स्वातंत्र्य गरीब जनतेचें झालें. राष्ट्रीय सभा आज शासनसरकार बनली आहे. तिच्याकडून म्हणजेच आज कॉंग्रेसी सरकारांकडून जर अन्याय झाला, अहिंसात्मक असूनहि जर नागरिक स्वातंत्र्याची गळचेपी झाली, किसानकामगारांच्या न्याय्य हक्कांच्या बाबतींत जर दाद लागत नसेल तर अतःपर कोणता मार्ग ? कॉंग्रेससरकारविरुद्धहि अहिंसात्मक मार्गांनीं सत्याग्रह करणें हाच मार्ग ठरेल. महात्माजींनीं "स्वराज्याचा चौरस" या लेखांत पुष्कळ वर्षांपूर्वी लिहिलें होतें कीं, उद्यांच्या स्वराज्यांतील सरकारच्या विरुद्धहि अहिंसात्मक रीतीनें मला जर एखादी गोष्ट अन्याय्य वाटली तर प्रचार करण्याचें

स्वातंत्र्य हवें. त्या प्रचारानें कायदा मोडत असेल तर सत्याग्रही या नात्यानें जी सजा होईल ती मी भोगीन. अहिंसक रीतीनें आपल्या न्याय्य मागण्यांसाठीं झगडणें ही महात्माजींची शिकवण आहे. कोणतेंही सरकार अपूर्ण, सदोषच असणार. आणि उत्तरोत्तर वाढत्या आशा आकांक्षा राहणार, स्वातंत्र्याचा अर्थ वाढणार, नवे प्रश्न येणार, नवीं क्षितिजें दिसणार. सत्याग्रही व्यक्तीला उत्तरोत्तर उच्चतर, विशालतर सत्य दिसणार, त्यासाठीं तो अहिंसक रीतीनें शांतपणें लढणार. सत्याग्रहाचा मार्ग अतःपर हिंदुस्थानांत समाजवादी पक्षाकडे येणार. राष्ट्रीय सभा सरकार बनणार. कम्युनिस्ट वगैरेंचा सत्याग्रही तंत्रावर विश्वास नाहीं. परकी सत्ता गेल्यामुळें समाजवादी पक्ष अहिंसक मार्गानें आपले प्रश्न सोडवूं पाहणार, नैतिक साधनांनीं, निर्मळ साधनांनीं प्रश्न सोडवूं पाहणार. म्हणजेच समाजवादी पक्ष हा एका अर्थी सत्याग्रही कार्यकर्त्यांचा जथा होणार. शेतकरी, कामगार यांचे प्रश्न सोडवीत असतांना ज्या समस्या येतील, त्या जर वाटाघाटींनीं सुटल्या नाहींत तर सत्याग्रह, शांतीचा संप, उपवासहि, अशा मार्गानें समाजवादी जाणार. एकदां अहिंसक मार्ग, निर्मळ नैतिक साधनें, यांचा अवलंब केला कीं याच मार्गावर मनुष्य येतो. परकी सत्तेशीं अखेरचा सामना करतांना समाजवादी पक्ष हिंसा अहिंसेच्या फार खोल पाण्यांत गेला नव्हता. तरीसुद्धां प्राण पवित्र आहेत असें त्यावेळेसहि सांगितलें जाई. उद्यां परकी आक्रमण आलें तर समाजवादीहि शस्त्र हातीं घेऊन उभे राहतील, राष्ट्रासाठीं लढतील. ती अंतिम अहिंसा महात्माजी, विनोबाजी, अशांसारख्या विभूतिच पाळूं शकणार. परंतु तेवढी मर्यादा सोडून देशाच्या दैनंदिन जीवनांत जेव्हां जेव्हां प्रश्न उभे राहतील, तेव्हां समाजवादी पक्ष सत्याग्रही तंत्रानें, अहिंसक शांततेच्या मार्गानेंच ते सोडवूं पाहणार. पुण्यास खडकीला एस. एम्. जोशी संपावर एकदम जायला पडूं नये म्हणून उपवास करीत राहिले याचा अर्थ काय? याचा अर्थ हाच कीं समाजवादी पक्षच आतां महात्माजींचा वारसदार होऊन आजच्या शासनसंस्थेशीं दरिद्रनारायणाला न्याय मिळावा, नागरिक स्वातंत्र्य अबाधित रहावें, श्रमणाऱ्यांचें स्वराज्य यावें, अहिंसक प्रचार आहे तोंपर्यंत संघटनेस, सभांस, परवानगी असावी म्हणून शांततामय अहिंसात्मक रीतीनें झगडत राहील. अच्युतरावांच्या एकंदर मांडणीचा हा असा सूर होता.

माझ्या पंढरपूरच्या उपवासानंतर गांधीजींच्या तत्त्वज्ञानाचे नि राष्ट्रसभेचे एक थोर पुरस्कर्ते नागपूरचे श्री हरिभाऊ मोहनी मला म्हणाले होते " गांधीजींची सर्वांत थोर देणगी म्हणजे अहिंसक मार्गानें प्रश्न सोडविणें, स्वतः मरायची तयारी ठेवून प्रश्न सोडवूं पहाणें, ही आहे. या विचारसरणीच्या लोकांनीं एकत्र आलें पाहिजे. " श्री हरिभाऊंच्या विचारांतील प्रत्यक्षता अच्युतरावांच्या प्रतिपादनांत होती. कारण राष्ट्रीय सभा अधिकारारूढ असल्यावर जनतेसाठीं झगडणारें कोण ? राष्ट्रीय सभा आतां तर एक पक्ष म्हणून आहे. हा पक्षच सर्व राष्ट्राचें समाधान करूं शकेल असें नाहीं. अमदाबादच्या मजदूर महाजनचे कार्यकर्ते खंडुभाई यांनीं सुद्धां मध्य सरकारच्या षण्मुखी अंदाजपत्रकावर हें श्रीमंतांचें अंदाजपत्रक म्हणून शेरा मारला. तेव्हां कॉंग्रेस पक्षाचें सरकार असलें म्हणजे अन्याय होणारच नाहीं असें नाहीं. शेतकऱ्या-कामगारांचे प्रश्नहि निकडीनें हातीं घेतले जातीलच असें नाहीं. तेव्हां प्रश्न उत्पन्न होणारच. आणि सत्याग्रही मार्गानें ते सोडवण्याची जबाबदारी समाजवादी पक्षावरच येऊन पडणार. कारण तोच नैतिक भूमिकेवर उभा असलेला, आंतरराष्ट्रीय दृष्टि असूनहि राष्ट्रीय असणारा, कांग्रेसप्रणीत नि पुरस्कृत अशा राष्ट्रीय मजदूर संघापासून स्वतंत्र राहून किसान कामगारांत काम करणारा असा हा पक्ष आतां होणार.

जयप्रकाशजींचा अहवाल म्हणजे मी उपनिषद म्हटलें. किती सुंदर, उदात्त असें तें सारें लिहिणें आहे. नाशिकला जाहीर सभेंत बोलतांना ते म्हणाले " महात्माजींच्या जास्तींत जास्त जवळ जाणारे आम्हीच होतों. त्यांचे अलीकडचे लेख वाचा, प्रार्थनोत्तर प्रवचनें वाचा, मुलाखती वाचा. त्यांतील विचारांशीं जुळणारे आम्हीच होतों. महात्माजींनी कॉंग्रेसला सेवक संघाचें रूप द्यावें असें सुचविलें. एकाच गटानें कॉंग्रेस नांव बळकावून बसावें हें महात्माजींना मान्य नव्हतें. आचार्य कृपलानी मागें म्हणाले ' कॉंग्रेस नांव वापरून कोणी फायदा उठवूं नये. ' कानपूरलाच आम्ही तें नांव सोडलें. परंतु अधिकारारूढ एका गटाला, एका पक्षाला तरी तें नांव स्वतःपुरतें वापरायला काय अधिकार ? लाखोंनीं त्याग केला, कुरबानी केली, कॉंग्रेस वाढवली. आचार्य नरेन्द्रदेव १९१५ पासून कॉंग्रेसमध्यें आहेत. तेव्हां तें थोर नांव, कॉंग्रेसचें नांव कोणीच स्वतःलो न लावणें चांगलें. त्या नांवाला सत्तेच्या राजकारणांत ओढून कां

कलंकित करा? आम्ही तें नांव या विचारानें सोडलें. परंतु अधिकारारूढ पक्ष मात्र तें सोडायला तयार नाहीं. महात्माजींना हें नको होतें. मृत्यूपूर्वी त्यांनीं शेवटची दृष्टि दिली. परंतु अधिकारारूढ पक्षानें महात्माजींच्या लेखांतील कांहीं भाग अव्यवहार्य म्हणून सोडून दिला. स्वतःचा एक पक्षच फक्त राहील अशी नवी घटना केली. महात्माजींच्या नांवानें ती प्रचारिली जाते. महात्माजींच्या त्या विचारांचें हें विडंबन आहे. जयप्रकाश जें म्हणाले कीं, महात्माजींच्या विचारांशीं आम्हीच अधिक जवळचे होतों तें खरें आहे. म्हणून तर महात्माजी आचार्य नरेन्द्रदेव, जयप्रकाश, दोघे मला प्रिय आहेत, त्यांच्यापैकीं कोणालाहि राष्ट्रसभेचा अध्यक्ष करा म्हणून म्हणाले. महात्माजींची परंपरा, सत्याग्रही परंपरा, गरिबांचें राज्य आणण्याची परंपरा आतां समाजवादी पक्षावर आहे. आणि म्हणून नैतिक मूल्यांवर जयप्रकाशांनीं भर दिला. अच्युतरावांच्या विचारांत तोच ध्वनि होता. समाजवादी पक्षानें ही थोर दृष्टि समाजवादी कार्यकर्त्यांस दिली आहे. समाजवादी पक्ष लोकशाही मानतो; नैतिक मूल्यें मानतो; आंतरराष्ट्रीय असून तो राष्ट्रीय आहे; आणि म्हणून देशांतील आजच्या राजकीय परिस्थितींत अन्याय, पिळणूक, नागरिक स्वातंत्र्याची गळचेपी, यांच्याविरुद्ध सत्याग्रही मार्गानें लढणारा, शांततेच्या अहिंसक मार्गानें लढणारा, उपवास, शांतिमय संप यानें लढणारा, सत्याग्रही सैनिकांचा जथा म्हणजे समाजवादी पक्ष होय. असा अर्थ मला तरी दिसतो.

म्हणून लहानथोर समाजवादी कार्यकर्त्यांनीं या भूमिकेवरून कार्य करावें. जयप्रकाशांची मान खालीं होईल, पक्षाची मान खालीं होईल असें कोणतेंहि कृत्य करूं नये. शेतकऱ्यांचे, कुळांचे शांतिमय संप अपरिहार्यच झाले तर करावे. परंतु शेतें कापून नेणें, वा इतर अत्याचारी मार्ग नकोत. आपणांस उद्यां लोकशाहीच्या निवडणुकीच्या मार्गानें किंवा दरम्यान शांततेच्या सत्याग्रही मार्गानें, नैतिक नि अहिंसक भूमिकेवरून जावयाचें आहे ही गोष्ट डोळ्याआड होतां कामा नये.

समाजवादी पक्षास कम्युनिस्ट पाण्यांत पहातातच. परंतु कॉंग्रेस पक्षहि पाण्यांत पहात आहे. समाजवादी पक्ष कितीहि थोर भूमिका मांडीत असला तरी कॉंग्रेस पक्षानें विषारी प्रचारास सुरुवात केली आहे. नाशिकला अधिवेशनास जागाहि मिळूं नये म्हणून त्यांनीं शर्थ केली. फैजपूरला कॉंग्रेस भरूं नये म्हणून

सरकारनें अडचणी आणल्या होत्या. आज तीच काँग्रेस समाजवादी पक्षाचें अधिवेशन होऊं नये, त्यांना अडचणी याव्यात म्हणून खटपट करते. अरे इतके द्वेष मत्सर करून कोठें जाणार? मतभेद असले तरी समाजवादी पक्ष एक थोर पक्ष आहे. भरवा अधिवेशन, आम्हीहि मदत करूं, निदान अडचणी आणणार नाहीं, असें नाशिकचे काँग्रेसवाले म्हणते तर महात्माजींची थोडी तरी सत्य अहिंसेची थोर दृष्टि त्यांच्याजवळ आहे असें वाटलें असतें. परंतु अधिवेशनाच्या मार्गांत अपार अडचणी उभ्या करणाऱ्यांजवळ कोठली अहिंसा नि व्यापक सहानुभूति? अनेक पक्ष असूनहि खेळी मेळी, प्रांजलपणा राखतां येतो. परंतु आम्हांला अजून लोकशाहीचें शिक्षणच नाहीं. आमच्या विरुद्ध जातां, याद राखा, अशी ही आमची अजूनहि दृष्टि आहे.

नाशिकहून कर्तव्य दैनिकाला माहितीपत्रें पाठविलीं गेलीं. परंतु तीं कोठें पोस्टांत अडकलीं प्रभु जाणे. एक मिळालें तेंहि फाडून पुनः चिकटवलेलें. बाकीचीं तर वेळेवर मिळालींच नाहींत. कर्तव्य दैनिकासाठीं येणारीं बातमीपत्रेंहि जर सरकार अडवून धरील, तपासायला नेईल, चार दिशीं देईल किंवा देणारहि नाहीं, तर पत्र तरी चालवायचें कसें? ही का लोकशाही? एका शहरांतील एजन्टाला काँग्रेसजनांनीं कर्तव्याचे अंक बंद करण्यासाठीं लांचहि दिली असें कळतें. प्रभु करो नि तें खोटें ठरो. परंतु मागें १९३८–३९ मध्यें मला हे अनुभव आलेच होते. आज पुन्हां तेच येत आहेत. मला नम्रपणें काँग्रेसजनांना, काँग्रेस सरकारला सांगायचें आहे कीं ही लोकशाही नव्हे. नैतिक भूमिकेवरून आम्हीं जाणारे आहोंत. सत्य अहिंसादि तत्त्वें थोडींफार आमच्याजवळहि आहेत. सत्य अहिंसेला पदोपदीं दूर ठेवणाऱ्यांनीं, कारस्थानें, कारवाया करणाऱ्यांनीं, द्वेष मत्सरानें अंध झालेल्यांनीं आम्हांला येतां जातां सत्य अहिंसेचे उपदेश करणें ही सर्वांत मोठी शोकान्त घटना आहे. परंतु या सर्व अडचणी गृहीत धरूनच समाजवादी पक्षानें, त्यांच्याशीं सहमत असणाऱ्या लोकांनीं धडपड करीत राहिलें पाहिजे. एस्. एम्. जोशी हे खडकीच्या प्रसंगीं तार करायला गेले तर त्यांची तारहि पोस्टांत म्हणतात नाकारण्यांत आली! अरेरे! लोकशाहीची ही विटंबना आहे. ही हुकुमशाही आहे. एक प्रकारची ही फॅसिस्ट वृत्ति आहे. काँग्रेसचें नांव स्वतःपुरतें वापरणाऱ्या अधिकारारूढ पक्षानें असें करूं नये

असें मनांत वाटतें. प्रभु करो नि या देशांत तरी फॅसिस्ट वृत्ति आणखी न वाढोत. कॉंग्रेस सरकारांत तरी त्या न येवोत.

समाजवादी पक्ष स्वतंत्र झाला आहे. त्याच्याजवळ पैसा नाहीं. वृत्तपत्रें नाहींत. परंतु थोर श्रद्धा त्याच्याजवळ आहे. जयप्रकाशांसारखा थोर मार्गदर्शक त्यांना मिळाला आहे, जो स्फटिकासमान निर्मळ आहे, त्यागमूर्ति आहे, ध्येयवादी आहे, चारित्र्यसंपन्न आहे. त्यांचें मार्गदर्शन डोळ्यांसमोर ठेवून समाजवादी पक्ष कार्य करो.



## नवश्रद्धा

काँग्रेसचें अवतारकार्य संपलें आहे. तिच्यांतील विकासशक्ति संपुष्टांत आली आहे. काँग्रेस आतां निवडणुका नि सत्ता यांतच गुरफटणार. आपल्या हातांतील सत्ता जाऊं नये म्हणून ती सत्य अहिंसेची हिंसा करणार. विरोधी पक्षांविषयीं वाटेल तें विष ओकणार. आणि काँग्रेस विशेष कोणाविषयीं जर मनांत आज द्वेषमत्सर बाळगीत असेल तर समाजवादी पक्षाविषयीं होय. ज्या पक्षाच्या हातीं काँग्रेस द्यावी असें महात्माजी म्हणाले, त्या पक्षालाच काँग्रेस पाण्यांत पहात आहे. नाशिकला अधिवेशन होऊं नये म्हणून काँग्रेसच्या सत्य अहिंसेच्या पुजाऱ्यांनीं पराकाष्ठा केली. सातारा जिल्ह्यांतील शिराळा पेट्यांत समाजवादी कार्यकर्ते तेथील दुःखितांसाठीं जात असतां "खबरदार गांवांत याल तर, समाजवाद्यांस आम्हीं येऊं देणार नाहीं" असें काँग्रेस भक्तांनीं फर्माविलें. तरीहि कोणी नागरिकस्वातंत्र्याची श्रद्धा मनांत ठेवून गेले तर दारू पाजलेले हत्यारबंद गुंड त्यांच्यावर चोहोंबाजूनें म्हणतात आले. समाजवादी तरुण शांतपणें निघून गेले. किर्लोस्करवाडीचा कारखाना नष्ट होऊं नये म्हणून खवळलेल्या लोकांच्या लोंढ्यासमोर समाजवादी तरुणांनीं साष्टांग दंडवत घातलें. कारखाना जाळाल तर कामगारच उपाशी मरतील असें समजावलें. परंतु आज या समाजवादी तरुणांवरच नाना दुष्ट आरोप केले जात आहेत. सेवादलाच्या अनेक मुलांनीं सेवेचें, रक्षणाचें काम केलें. त्यांनाच अटक करण्यांत आलेली आहे. सातारा जिल्हा काँग्रेसनें जिल्ह्यांतील आपद्ग्रस्तांसाठीं समिति नेमली. तिच्यांत समाजवादी कार्यकर्तेहि घ्या म्हणून सांगितलें असतां "समाजवादी पक्षाचे राजीनामे द्या. मग बघूं." असें सांगण्यांत आलें. नाशिकला निर्णय घेण्याच्या आधींच्या या गोष्टी. आपण सामान्यतः महान् आपत्तींत सर्वांची

साहाय्यक समिति नेमतों. परंतु सातारा जिल्हा काँग्रेसला सारें श्रेय स्वतःला हवें असेल. मला हें कळल्यावर वाईट वाटलें. राष्ट्राचें हित आम्हींच जाणतों, आम्हींच करणार, बाकीचे सारे शत्रु, अशी काँग्रेसची अहंकारी, द्वेषमत्सरी वृत्ति आज झाली आहे.

सरदार वल्लभभाई समाजवादी कार्यकर्त्यांस हीं भुंकणारीं कुत्रीं म्हणून संबोधीत. सरदारांच्या वृत्तीला तें शोभतहि असे. आतां सरदारांचे विश्वस्त मंत्री श्री. मुरारजीभाई असेंब्लींत सत्य अहिंसेचे स्मरण ठेवून "समाजवादी म्हणजे कचरा" असें म्हणाले. ज्यांना मुरारजी कचरा म्हणतात, त्यांना सातारा जिल्ह्यांतील काँग्रेसवाले रोगजंतु समजून गांवांत येऊं देत नसतील तर तें योग्यच आहे. मनमाड, रावळगांव येथें राष्ट्रीय मजूर संघाचे लोक आणून बसविले. तोच प्रकार सातारा जिल्ह्यांतहि होत आहे. किर्लोस्करवाडीला समाजवादी गुंड ठरवले जात आहेत. जिल्ह्यांत त्यांच्यावरच नाना आरोप ठेवून त्यांना पकडण्यांत येईल असाहि रागरंग आहे. सारी सरकारी शक्ति समाजवादी संघटनेचा प्राण घेण्यासाठीं आज उपयोगांत आणिली जाईल. काँग्रेस कमिट्या आणि काँग्रेस सरकारें समाजवादी पक्षास आतां सळो कीं पळो करणार हें स्पष्ट आहे. काँग्रेसचा हा अधःपात आहे. समाजवादी पक्ष प्रांजळपणें दूर झाला. तो लोकशाहीनें जात आहे. साधनांच्या निर्मळपणावर भर देत आहे. येतां जातां संप हेंहि त्याचें धोरण नाहीं. लोकशाही मार्गानें समाजवादी रचना लौकर व्हावी असें तो म्हणतो, एवढाच त्याचा अपराध. काँग्रेसला "निर्वीर्यमुर्वीतलं" असें हवें आहे. काँग्रेसला हा अहंकार जडला आहे. अहंकारांच्या जवळच अधःपात असतो.

अधिकारारूढ काँग्रेस पक्ष अहिंसक मार्गानें, लोकशाही मार्गानें जाणाऱ्यांचेंहि नागरिक स्वातंत्र्य संपुष्टांत आणूं पहात आहे. जातीयवादी, कम्युनिस्ट, या सर्वांपेक्षां काँग्रेस समाजवादी पक्षावरच अधिक तुटून पडेल. ज्याप्रमाणें रशिया ट्रूमनपेक्षां ॲटली ब्लूमचा अधिक हेवा दावा करील कारण ते लोकशाही मार्गानें समाजवाद आणून रशियाच्या हुकूमशाही पद्धतीपेक्षां निराळा मार्ग जगाला दाखवितात म्हणून. त्याप्रमाणें समाजवादी पक्षावर कम्युनिस्टांच्या घातकी व परधार्जिण्या धोरणाचा आरोप तर करतां येत नाहीं. हा समाजवादी पक्ष नैतिक मूल्याचें समर्थन करीत आहे. अहिंसक आणि लोकशाही मार्गानें

जाऊं म्हणत आहे. जनतेला हा पक्ष अधिक आवडेल. मग आपलें कसें होणार? असें मनांत येऊन घाबरलेले कॉंग्रेसवाले समाजवादी पक्षाला चिरडूं पहात आहेत. परंतु सत्य चिरडलें जात नसतें. समाजवादी पक्षांतील ध्येयवादी नवतरुणांची कसोटी आहे. कम्युनिस्टांना जागतिक आश्रय, आधार असतात. समाजवादी पक्षास तसे आर्थिक वा अन्य आधार अजून नाहींत. वर्तमानपत्रें काढणें अशक्य. सेवकांची व्यवस्था लावणें कठीण. उपासमार, कष्ट, शिव्याशाप, अटक, प्रसंगीं गोळीबारांत मरण, हेंच समाजवादी पक्षाच्या नशिबीं आहे. कम्युनिस्ट आणि कॅांग्रेसवाले दोघांच्या जात्यांत समाजवादी भरडले जाण्याचा संभव आहे. परंतु समाजवादी अमर श्रद्धेनें कार्य करीत राहतील. आपली चूक होत नसतां जर कोणी शिव्याशाप दिले तर ते आशीर्वाद होतील. मुरारजीभाई, म्हणा, आम्हांला गुंड म्हणा, कचरा म्हणा, आणखीहि नवीन शिव्या शोधून ठेवा. तुमच्या हुकुमशाही वृत्तीला तें साजेसें आहे. ब्रिटिश सरकारचीच गादी तुम्हीं चालव-णार का? परसत्तेबरोबर त्वेषानें लढा तरी करतां येत असे. येथें तुम्हीं आम्हांला लाथा, दंडुके, अपमान द्यायला बेदिक्कतपणें तयार असलांत तरी आम्हीं निर्मळ साधनांचे उपासक आहोंत. तुम्ही कसेहि वागा. तुम्ही अधिकारी आहांत. तुम्हीं म्हणाल तें पवित्र, कराल तें पवित्र. आणि आम्हीं सत्याच्या, नीतीच्या, शांतीच्या मार्गानें गेलों तरी गुंड ठरणार. ठीक बाबा. आमची कसोटी घेणारे तुम्ही आहांत. घ्या नीट कसोटी. समावादी पक्ष कसोटीस उतरो. समाजवादी मित्रांनो, तुम्हीं शांतपणें सारें सहन करा. सत्याग्रही वारसदार आतां तुम्हांला व्हायचें आहे. ब्रिटिश सरकार कॅांग्रेसला पूर्वी गुंड म्हणत असे. आतां कॅांग्रेस सरकार समाजवादी पक्षास गुंड म्हणेल. म्हणो. तुम्ही उच्च भूमिका सोडूं नका. प्रक्षुब्ध होऊं नका. शान्तीनें, निर्भयपणें परंतु नम्रतेनें चला. वेळच आली तर नागरिकस्वातंत्र्यासाठीं उभे राहूं. मरूं. तुम्ही राष्ट्राला नवीन श्रद्धा देत आहांत. आज नवीन श्रद्धेची जरूर आहे. एकीकडे जातीय वादाचे विषारी फूत्कार फूं फूं करीत आहेत, तिकडे कम्युनिस्ट-ज्यांचा अहिंसेवर, निर्मळ साधनांवर विश्वास नाहीं-त्यांच्या रशियन वा[illegible]नुरूप उठणाऱ्या लीलालहरी उसळत आहेत. हे सत्य अहिंसेचे कालपर्यंतचे पुजारी कॅांग्रेसवाले सत्य अहिंसेचा खून करून हुकुमशाही जणूं चालवूं पहात आहेत. अशा प्रसंगीं राष्ट्राला नवीन आशा देणें हें समाजवादी पक्षाचें कार्य आहे. नाशिकला ही नवीन श्रद्धा

समाजवादी पक्षानें दिली आहे. महाराष्ट्रांतील तरुणांनीं या थोर ध्येयवादी पक्षाभों तीं आतां उभें रहावें. काँग्रेस ही सत्तालोलुपांची, मत्सरग्रस्तांची, संधिसाधूंची, दुसऱ्यास कितीहि तो निर्मळ मार्गानें जाणारा असला तरी तो काँग्रेसचा नाहीं म्हणून चिरडूं पहाणाऱ्यांची संस्था होत आहे. तिकडे आतां नका वळूं. भगिनी निवेदिका एका साधकाला म्हणाल्या, "त्या मठांत कशाला जातोस? तेथें विवेकानंदांची दृष्टि तुला आढळणार नाहीं. तेथें सारे जडजरठ वृत्तीचे लोक आहेत." त्याप्रमाणेंच महाराष्ट्रीय तरुणांना, उदार भावनांच्या तरुणांना, ध्येयाला मिठी मारूं पाहणाऱ्या आणि नैतिक मूल्यांना जीवनांत स्थान देणाऱ्या तरुणांना मी हांक मारीन आणि सांगेन, काँग्रेसच्या मठांत आतां नका जाऊं. महात्माजींची उत्तरोत्तर वर्धिष्णु, विकासशील, क्रांतिकारी दृष्टी तेथें दिसणार नाहीं. तेथें आतां ठोकळेबाज, हातची सत्ता सदैव राखूं पाहणारे, अशांचाच वरचष्मा आहे. किसान कामगारांनो, मध्यम वर्गीय तरुणांनो, बंधु-भगिनींनो, क्षुद्रता सोडा. आज स्वच्छ, स्पष्ट अशा विचारांची सर्वांत अधिक आवश्यकता आहे. आणि देशाला तारक असा संदेश देणारा, मार्ग दाखविणारा समाजवादी पक्षच आहे. तो नवीन मंगल श्रद्धा देत आहे. नवीन उपनिषद् देत आहे. हा पक्ष म्हणतो:

१ आपण नैतिक मूल्यें सांभाळूं. २ आपण लोकशाही मार्गानें जाऊं. ३ साधनांची शुद्धि राखूं. ४ अशक्यच झालं तर संप करूं. ५ जमीनदारी नष्ट व्हायला हवी. जमीन सर्वांची होवो वा वाटली जावो. ६ मोठे कारखाने राष्ट्राचे करा. ७ कामगारांना, शेतकऱ्यांना हें आपलें स्वराज्य असें वाटूं दे. ८ जातीयता नको. अखिल राष्ट्रीय दृष्टि घ्या. ९ जगांतील रशियन अमेरिकन राजकारणाच्या चिखलांत न जातां स्वतःचा तिसरा पक्ष उभा करा. १० तो उभारून प्रभाव पाडायचा असेल तर देशांत आधीं लोकशाही समाजवाद आणा. ११ जागतिक समाजवादी संघटना करा. १२ आशियांतील राष्ट्रांशीं स्नेह जोडा, संघ करा. १३ तीं तीं राष्ट्रें स्वतंत्र राहून समाजवादी होऊन परस्पर सहकार्य करतील, सांस्कृतिक देवाण घेवाण करतील असें करा. १४ विश्वशांति हें आपलें ध्येय. कोणावर आक्रमण नको. सारीं राष्ट्रें सुखी, समृद्ध नि परस्पर सहकार करणारीं होवोत.

महाराष्ट्रा ! अशी ही नवश्रद्धा, हें नवजीवन, हा नवसंदेश समाजवादी पक्ष देत आहे. समाजवाद हा आजचा युगधर्म आहे. परंतु पाश्चिमात्य समाजवादांत भारतीय थोर ध्येयें, नीतीची पूजा, सहानुभूति यांना हिंदी समाजवादी मिसळून तो समाजवाद अधिकच सत्यं शिवं सुंदराचा उपासक करीत आहेत. अशा पौर्वात्य पाश्चिमात्य मंगलाच्या मीलनांतून निर्मिलेला हा नव हिंदी समाजवाद जेथें विश्वभारती निर्माण झाली त्या भारतास शोभूनच दिसतो. भारतीय समाजवाद हिंदुस्तानलाच नव्हे तर जगालाहि कांहीं नवीन दृष्टि देईल. लो. टिळकांचें काम महात्माजींनीं पुढें नेलें. महात्माजींचें कार्य–सत्याग्रही क्रांतीचें कार्य–समाजवादी पुढें नेतील. सत्य अनन्त आहे. सत्याग्रही क्रान्ति ही जगाच्या अंतापर्यंत होतच राहणार.

हिंदी समाजवादी पक्षानें दिलेल्या नवश्रद्धेच्या उपासकांनो, जा; धीरानें, संयमानें, उच्च भूमिका न सोडतां पुढें जा; दरिद्रनारायणाला विसरूं नका; सत्य अहिंसेला विसरूं नका; जा, पुढें जा; तुमच्या मार्गांतील अनंत अडचणी तुमच्या श्रद्धेनें वितळतील; तुमचा ध्येय भगवान् जवळ येईल; जा, तुमचाच विजय आहे.



## अम्माचे अश्रु

तीस जानेवारीची ती कृष्ण सायंकाळ. भारतांत गेलीं बत्तीस वर्षे अविरत तळपणारा सत्याचा सूर्यनारायण अस्तास जाण्याची ती सायंकाळ. हा सूर्य आज अस्तास जाईल अशी कोणाला कल्पना नव्हती. प्रभूनें त्यांना अनेकदां वांचविलें आहे. तो त्यांना सांभाळील. भारतांत शान्ति, आनंद, प्रेम आणल्याशिवाय हा प्रेममूर्ति महात्मा, कारुण्यसिंधु महात्मा जाणार नाहीं असें वाटे. परंतु प्रभूच्या मनांत निराळेंच आलें. मानवी आशा विरुद्ध देवाची इच्छा. महात्माजींना न्यावें असें विश्वंभराला वाटलें. बाँब पाठवून त्यानें दार ठोठावलेंच होतें. आणि शेवटचा दूत आला. निरोप देऊन महात्माजींना घेऊन गेला. कोणाला कल्पना नव्हती. लोक येत जात होते. मुलें खेळत होतीं. आणि वज्राघातासमान ती वार्ता आली.'

मुंबई शहरांत बातमी क्षणांत पसरली. परंतु ती पहा एक मुसलमान माता. ती श्रमणारी आहे. ती डेऱ्यांतील, बुरख्यांतील खानदान नाही. ती कष्ट करणारी आहे. कामावरून येऊन लगबगीनें त्या दुकानांत आली आहे. थोडें सामान विकत घेत आहे. तों तिच्या कानांवर ती विषवार्ता पडली. महात्माजी गेले. गोळ्या झाडून खून. बापूजी गेले. अरेरे. असे शब्द तिच्या कानीं पडले. ती माता विद्ध झाली. जणुं हरणीला बाण लागावा. तिच्या हातांतील सामान गळून पडलें. तिनें वर हात केले. तिच्या डोळ्यांतून अश्रु आले. ती परमेश्वराला, अल्लाला उद्देशून म्हणाली, "आतां आम्हांला कोण ? आतां आम्हांला कोण सांभाळील, या अल्ला, या खुदा, क्या हुआ रे." ती अश्रु ढाळीत निघून गेली.

त्या मुस्लीम मातेला महात्माजींचें अस्तित्व म्हणजे आधार वाटत होता. भारतांतील चार कोटी मुसलमानांना आतां त्यांचाच आधार होता. हिंदु धर्मा-

तील एकाचा परधर्मीयांतील कोट्यावधि लेकरांना आधार वाटावा, विश्वास वाटावा, यांत हिंदु धर्माचा मोठेपणा आहे. अशामुळें हिंदुधर्म विश्वधर्म होतो. विवेकानंद अमेरिकेंत म्हणाले, " हिंदुधर्म हा विश्वधर्म आहे. " त्याचा अर्थ सर्वांना जानवीं नि शेंड्या देणें नव्हे. तर जगांतील सर्वांना माझें म्हणणें, माझ्याच आत्म्याचीं रूपें मानणें, त्यांना प्रेम देणें, भेदांत अभेदता पाहून अद्वैत अनुभवणें. याला म्हणतात हिंदु धर्माचा आत्मा, याला म्हणतात थोर भारतीय संस्कृति. हिंदु धर्माची, भारतीय संस्कृतीची चालती बोलती मूर्ति म्हणजे महात्माजी.

द्वेषाचीं उपनिषदें गाणाऱ्या महाराष्ट्री पांढरपेशांनो, तुम्ही उठल्या बसल्या हिंदुधर्म नि संस्कृति यांचा घोष करतां. परंतु त्यांचा आत्मा तुम्हांला कळला नाहीं. तुम्हीं साली चघळीत बसलांत. आंतील रस फेंकलांत. तुम्ही शिंपलेच मोलाचे समजून उराशीं धरलेत नि मोतीं फेंकलींत. हिंदुधर्माचा आत्मा संयमांत, सहिष्णुतेंत आहे. माझा आत्मा सर्वांशीं जोडीन या भावनेंत, या थोर अनुभवांत आहे. ऋषिमुनींनीं हें शिकविलें. संतांनीं हें उपदेशिलें. ज्ञानेश्वर म्हणतात, " साऱ्या जगाला आनंदानें फुलवूं. " तुकाराम म्हणतात, " अवघा संसार सुखाचा करूं. " संकुचितता म्हणजे हिंदुधर्म नव्हे. क्षुद्रता म्हणजे हिंदुधर्म नव्हे. आणि परम प्रतापी नि परम पवित्र श्रीशिवछत्रपति; त्यांच्या अवतारकार्याचा अर्थ तरी या हिंदुत्वानिष्ठांना कोठें कळला आहे ? श्री छत्रपतींनीं सूड बदले घेतले नाहींत. मुसलमानांनीं इतकीं मंदिरें पाडलीं, आपण इतक्या मशिदी पाडल्या पाहिजेत अशीं सूडवृत्तीचीं गणितें ते कधीं करीत बसले नाहींत. उलट त्यांनीं मशिदीस नेमणुका करून दिल्या. जुनीं इनामें चालू ठेवलीं. अफझुलखानाच्या भेटीस जातांना त्यांच्या शरीरसंरक्षकांत मुसलमानबंधुहि होता. संतांच्या शिकवणीचा, शिवछत्रपतींच्या थोर चरित्राचा अर्थच आम्हां उथळ दृष्टीच्या लोकांस कळला नाहीं. आणि म्हणून महात्माजींवर मारेकरी जाण्यांत त्याचें कटुतम पर्यवसान झालें. आतां तरी दृष्टि साफ करा. हिंदुधर्म नि संस्कृति यांचा आत्मा ओळखून तो हृदयाशीं धरा.

महात्माजी तो आत्मा तुम्हांला जन्मभर दाखवीत होते. आणि पडतांना पाडणाऱ्यास प्रणाम करून अखेरीसहि हिंदुधर्मातील अनंत प्रेमाची जाणीव त्यांनीं करून दिली. हिंदुधर्म म्हणजे " हें विश्वचि माझें घर " अशी थोर

भावना. मानवाचा हा मोठेपणा आहे कीं तो कोपऱ्यांत बसून आत्मा विश्वाशीं जोडूं शकतो. समर्थ लहानपणीं आईला कोंपऱ्यांत लपले असतां म्हणाले " आई, चिंता करितों विश्वाची." समर्थ तेथें अंधारांत बसून विश्वाची चिंता करीत होते. मानवाचा हा मोठेपणा आहे. या लहान देहांत राहून त्याचा आत्मा महान्, अति महान् होऊं शकतो. असें करीत जाणें म्हणजे हिंदुधर्म जीवनांत आणणें. महात्माजी हें करीत होते. गीता त्यांचा गुरू. परंतु सर्व धर्मांतून ते ओलावा घेत. कारण गीतेनेंच सांगितलें आहे कीं जेथें जेथें विभूतिमत्व दिसेल तेथें तेथें तें मान. अशा रीतीनें हिंदुधर्माचे उपासक महात्माजी विश्वाचे झाले. त्यांच्या जीवनांत जातीयता, प्रांतीयता, राष्ट्रीयता विरून गेली. ते गुजराथी असून भारती झाले; भारती असून अति भारती झाले, जगदात्मा बनले. आणि म्हणूनच त्यांचा महान् आत्मा निघून जातांच साऱ्या जगाला धक्का बसला. कारण त्यांचा जात्मा जगाशीं जोडलेला होता. सर्वांना वाटलें कीं आपलें कांहीं तरी गेलें. असें जगदात्मा होणें, या लहान देहांत राहून आत्मा चराचराशीं जोडणें, म्हणजे थोर हिंदुधर्म, म्हणजे ही भारतीय संस्कृति.

ती मुसलमान अम्मा अगतिक होऊन रडली. परंतु सारें चराचर रडलें असेल. महात्माजींचें चराचरावर प्रेम. वृक्षवेलींवर प्रेम. मीराबेननीं रात्रीं निंबाची फांदी तोडली तर महात्माजी त्या पानांकडे बोट करून म्हणाले " हीं झोंपली होतीं पानें. कशाला एवढी फांदी तोडून आणलीस ? " तृणपर्णांवरहि असें प्रेमळ सहानुभूतीचें प्रेम करणारा जगांत कोठें धुंडाळावा ? महात्माजी गेले म्हणून तुम्ही आम्ही रडलों. विश्व रडलें. झाडें माडें रडलीं. गायी रडल्या. पर्वत रडले. सागर गहिंवरले. विश्वाचा अणुरेणु रडला. कां ? कारण महात्माजींनीं आपला आत्मा ध्येयार्थी नि प्रयत्नशील जीवनानें विश्वाशीं जोडला होता. केवढें थोर भव्य जीवन, केवढा मानवी आदर्श ?

या पिढीचे तुम्ही आम्ही धन्य कीं अशा या पुण्यात्म्याला आपण डोळे भरून पाहिलें. त्यांची शांत गंभीर वाणी ऐकली, त्यांचें मुक्तहास्य पाहिलें, त्यांची स्वाक्षरी हंसत घेतली. परंतु आपणांवर आतां महान् जबाबदारी आहे. महाराष्ट्रा ऊठ. सारी क्षुद्रता, करंटेपणा सोडून ऊठ. तुझ्या उंच पर्वतांप्रमाणें उंच विचारांना मिठी मार. तुझ्या जवळच्या सागराप्रमाणें उदार

गंभीर भावना हृदयांत उचंबळव, महान् पातकाचें क्षालन करायचें असेल तर जीं ध्येयें महात्माजींनीं दिलीं, जीं संतांनीं दिलीं, ऋषिमुनींनीं दिलीं, शिव-छत्रपतींनीं दिलीं, विवेकानंदांनीं दिलीं, तीं जीवनांत आणायला अमर अदम्य उत्साहानें उभा राहा. सारी जातीयता नष्ट करून तीस कोटी बंधूंना जवळ घेऊन नवराष्ट्र उभें कर. किती कामें करायचीं आहेत. परंतु सर्वांच्या आधीं हे सारे माझे ही भावना आहे. आपल्या राहिलेल्या या भारतांतील सर्वांना येथें नको कोणाला भीती, नको दुःख त्रास. याला संस्कृति म्हणतात. महात्माजींनीं ती जीवनांत दिव्य भव्यपणें प्रकट केली. आणि म्हणून ते अम्माचे अश्रू. त्या मातेच्या अश्रूंतील महान् अर्थ ध्यानांत घेऊन आपण सारे निश्चयानें वागूं तर पापक्षालन होईल. प्रभु क्षमा करील.



# एक टपोरें मोती

जगांत सारें संमिश्र आहे. सर्वत्र छायाप्रकाशांचा खेळ आहे. वेदामध्यें परम तत्त्वाचें वर्णन करतांना एक ऋषि म्हणतो:

" यस्य छाया अमृतं यस्य मृत्युः "

अमृतत्व आणि मृत्यु दोन्ही त्या परम सत्याच्या छाया आहेत. दिवस आणि रात्र, सुख नि दुःख, सर्वत्र हें असें द्वंद्व आहे. अंवस आणि पुनव म्हणजे या जगाचें स्वरूप. काळया कुट्ट अंधारांतहि प्रकाश दिसतो. आणि प्रकाशाच्या जवळच अंधारहि उभा असतो. विकासाच्या जवळ विनाश, विनाशाच्या पोटांतून पुनः भव्य विकास, असा हा संसार आहे. सेनापतींच्या भाषेंत श्रीहरीची ही अशी अद्‌भुत लीला अनादि काळापासून सुरू आहे.

गेल्या दोन वर्षांच्या हिंदुमुस्लीम हत्याकांडांतहि प्रेमस्नेहाचीं, मानवतेचीं भव्य दर्शनें उभय धर्मीयांत आपणांस दिसून आलीं. मानवतेचें हृदय शाबूत आहे, मानवतेचा आत्मा नष्ट नाहीं झाला, असें अशा धरोदात्त उदाहरणांनीं आपल्या अनुभवास येतें. आणि मांगल्यावरची आस्तिक आशा अस्तास जात नाहीं.

सातारा, सांगली, कोल्हापूर भागांत जो वणवा भडकला, त्याच्या करुणगंभीर कथा आतां ऐकूं येत आहेत. मानव्याला खालीं मान घालावयास लावणाऱ्या अनेक घटना घटल्या. अनन्त रूपानें गोडसे तुम्हां आम्हां सर्वांच्या हृदयांत आहे. महाराष्ट्राच्या जीवनयमुनेंत द्वेषमत्सराचा कालिया कधींचा वास करीत आहे. या कालियाचें दमन कोण करणार? महाराष्ट्राची जीवनयमुना कोण शुद्ध करणार? कोण ऐक्याची मुरली वाजवणार? प्रभु जाणे.

परंतु या भीषण प्रकारांतहि अमर दैवी प्रकाशाचीं दर्शनें झालीं. आज

सेवादलांतील एका सैनिकाची उदात्त सत्यकथा माझ्याकडे आली आहे. ती कर्तव्याच्या वाचकांस जीवन कर्तव्याची जाणीव देवो.

३१ जानेवारीची ही घटना आहे. ३० तारखेस महात्माजींची हत्या झाली. गडहिंग्लज पेट्यांत बातमी पसरली. ३१ जानेवारीला चौदा पंधरा हजारांचा एक जमाव गडहिंग्लजहून हसरचंपू गांवाकडे निघाला. वाटोवाट जथा वाढत चालला. गडहिंग्लजचे संघकार्यकर्ते डॉ. गुणे यांच्या गळयांत चपलांच्या माळा घालून जमावाच्या अग्रभागीं चालवलें होतें. जमाव दुंडग्याजवळ आला. या गांवीं श्री. नाना बापट–एक संघ कार्यकर्ते होते. जमाव त्यांच्या पाठीस भाले, लाठ्या घेऊन लागला. नाना बापटांच्या प्राणावर प्रसंग आहे ही गोष्ट सेवादलांतील एक सैनिक श्री. सिद्दप्पा मायप्पा रानगे यांनीं पाहिली. बापटांचा सांभाळ करीत तो निघाला. जमाव दोघांच्या पाठीस लागला. सिद्दप्पा आजारी होता, तरी तो बापटांची ढाल होऊन त्यांच्याबरोबर पळत होता. गांधीजींची हत्या ऐकल्यापासून त्यानें अन्नग्रहण केलेलें नव्हतें. तो पळत होता. तो दोनतीनदां पडला. पुन्हां उठून बापटांस सांभाळीत होता. बापटांवर घाव घालणाऱ्यांचें हत्यार सिद्दप्पानें हिसकून घेतलें. त्याच्या बोटावर मार बसला आहे. त्याच्या छातीवर लाटीचे घाव बसले. परंतु सिद्दप्पानें बापटांचा सांभाळ शेवटपर्यंत केला. बापटांस घेऊन तो मुलाळ येथें गेला. तेथें इनामदार नांवाच्या संघकार्यकर्त्यानें जेवण दिलें. बापट आतां बेपत्ता आहेत. त्यांचा सांभाळ करणारा सिद्दप्पा अंथरुणावर आहे. त्याला रक्ताच्या गुळण्या झाल्या. तापहि आहे. डॉक्टर त्याची काळजी घेत आहेत. सेवादलाचा हा धीरोदात्त सैनिक लौकर नीट बरा होवो. त्यानें आपले प्राण धोक्यांत घालून दुसऱ्याचे प्राण वांचविले. ज्या संघांतील लोकांनीं अनेक ठिकाणीं सेवादल सैनिकांवर चेंबूर वगैरे ठिकाणीं आणि अन्यत्रहि पूर्वी लाठी चालविली, त्याच संघांतील एकाचे प्राण श्री. सिद्दप्पानें स्वतःचे प्राण संकटांत घालून वांचविले. थोर मानवतेची, महात्माजींनीं शिकवलेल्या ध्येयाची स्वतःच्या प्राणांनीं पूजा करायला सिद्दप्पा उभा राहिला. ज्या सेवादलाला सिद्दप्पासारखीं रत्नें लाभतात, तें सेवादल भारताला भूषण आहे, तें सेवादल नवभारताची महान् आशा आहे.

गेल्या दोन तीन वर्षांत सेवादलांतील अशीं उदाहरणें सांगण्यासारखीं आहेत. दंगलींत घुसून दुकानांची लुटालूट सेवादल सैनिकांनीं थांबविल्याचीं

उदाहरणें आहेत. कुलाबा जिल्ह्यांत कांहीं गांवीं शान्ति ठेवण्याचें कार्य सेवादलानें केलेलें आहे. आणि हें आजचें दक्षिणेकडील वणव्यांतलें सिद्दप्पाचें तेजस्वी उदाहरण तर शिरोधार्य आहे.

सेवादलांतील सैनिकांनो, अशीं कर्मे करणें यांत तुमची खरी बहादुरी आहे. हें महान् धैर्य आहे. या धैर्याचे पाठ महात्माजींनीं आयुष्यभर आपणांस दिले. ज्या सेवादलांत सिद्दप्पांसारखें टपोरे पाणीदार मोतीं आहेत तें सेवादल महात्माजींच्या ध्येयांचे वारसदार आहे. आम्हीं त्यांच्या ध्येयांचा सांभाळ करूं. नवीन राष्ट्र निर्मू. जातिभेद आम्हीं मानीत नाहीं. मानव तितुका एकच आहे हें आमचें ब्रीद.

प्रिय सिद्दप्पा आज अंथरुणावर आहे. त्यानें जें धैर्य, जी निष्ठा दाखविली ती स्पृहणीय आहे. त्यानें घालून दिलेला धडा जर आपण सारे सेवादल सैनिक नि कार्यकर्ते गिरवूं शकलों तर आपलें उद्दिष्ट साध्य होण्यास विशेष कालावधि लागणार नाहीं. परंतु धनगर जातीच्या या सिद्दप्पाजवळ, या सरळ सत्त्वशील मुलाजवळ जी ज्वलन्त ध्येयनिष्ठा, त्यागबुद्धि नि कर्तव्यतत्परता आहे, ती आपल्यांपैकीं फारच थोड्यांच्या अंगीं बाणलेली असते. सिद्दप्पाचें दिव्य उदाहरण तुम्हां आम्हां सर्वांसच आजच्या कठिण आणि अंधाऱ्या परिस्थितींत प्रेरक होवो, प्रकाश देणारें होवो. प्रिय सिद्दप्पास धन्यवाद. त्याला लौकर आराम वाटो.



## सत्याचा मार्ग कठिण असतो

मी उपवास करीत होतों. मी उपवास कां केला तें मी उपवास सोडल्यावर लिहिलें होतें. उपवासाचीं दोन कारणें होतीं. एक कारण एका महाराष्ट्रीयानें हें महान् पाप केलें म्हणून. आपण भारतीय आहोंत हें खरें असलें तरी महाराष्ट्रीयहि आहोंत. तुम्ही महाराष्ट्रीय असें इतर लोक म्हणतातच. आपल्या मनांत प्रान्तीयता नसली तरी ती संपूर्णतः नसतेच असें नाहीं. थोडी फार प्रान्तीयतेची जाणीव असतेच. दुसरें कारण म्हणजे महात्माजींच्या हत्येनंतर महाराष्ट्रांत जो प्रक्षोभ पेटला त्याला मी माझ्या उपवासानेंच अत्यंत अल्पांशानें आळा घालूं शकत होतों. माझे कोरडे शब्द कोणी ऐकले असते? आणि माझ्या मनांतली तरी सारी जातीयता संपूर्णतः नष्ट झाली होती का? लोकांना जातीयतेपासून दूर रहा असें सांगण्यापूर्वी मी आधीं त्या दोषापासून मुक्त नको का व्हायला? म्हणून महाराष्ट्रांत दौरा काढण्याऐवजीं मी उपवास करीत राहिलों. मी मनांत म्हणे कीं माझी जातीयता जळून जावो. मला केवळ एक मानव म्हणून जगूं दे.

मला उपवासांत शेंकडों पत्रें सहानुभूतीचीं आलीं. पू. विनोबाजींचें आशीर्वादरूप पत्र आलें त्यावेळेस माझे अश्रु धावून आले. परंतु एका निनांम मित्रानें माझी खूप कानउघाडणी केली आहे. त्याच्या पत्रांत पुष्कळ गोष्टी आहेत. त्यानें मला दांभिक म्हटलें आहे; उपवास म्हणजे स्टंट म्हटलें आहे. मी काय उत्तर देणार? मी एक धडपडणारा जीव आहें. माझ्यांत अनेक दोष आहेत. हा मित्र लिहितो, "संघाला शिव्या देतां आणि गांधीजींचे अनुयायी म्हणवितां. लायक आहांत का?" मी नम्रपणें म्हणतों, "मी लायक नाहीं." माझ्याकडूनहि चुका होतात. दुष्ट शब्द लिहिला वा उच्चारला गेला तर मागून मला वाईट वाटतें. मी

पुनः पुन्हां मनांत नवीन नवीन निश्चय करतों. काल्याच अग्रलेखांत मी म्हटलें आहे कीं माझी लेखणी नि वाणी अहिंसक असो. मी साधना करीत आहें. यश कधीं येईल तें येवो. पत्रलेखक पुढें म्हणतो, " तुमचा उपवास शुद्ध असता तर फळ मिळतें. वाढलें का सेवादल ? ज्यांनीं अज्ञात राहून देश-व्यापी संघसंघटना उभारली, त्यांना नांवें ठेवतां. तुम्ही दाखवा असें कर्तृत्व करून. तें तर तुम्हांस शक्य नाहीं. बेडकी किती फुगली तरी बैल का होईल—" अशा रीतीनें त्या पत्राचा शेवट आहे.

दुसरें एक पत्र सोलापूरचें सनाम होतें. ते गृहस्थ लिहितात, " सेनापती नि तुम्ही सर्व ब्राह्मणांसह जलसमाधि घ्या." त्यांचा प्रक्षोभ मी समजूं शकतों. स्वतः नीट वागणें एवढेंच माझ्या हातीं. जीवन असह्यच झालें तर पुढचा विचार. परंतु मी आशावादी आहें. १९३३ मध्यें मी श्री प्यारे-लालजींना म्हटलें, " माझ्यां जगण्यामुळें एकाद्या माणसासहि जोंपर्यंत आनंद होत आहे, तोंपर्यंत मी आनंदानें जगेन." असो. मला नम्रपणें एवढेंच सांगा-यचें आहे कीं माझा उपवास माझ्यांतील असली नसलेली जातीयता भस्म व्हावी म्हणून होता. माझ्याजवळ स्टंट नाहीं. दुसऱ्यास वाटला तर नाइलाज. उपवासांत स्वतःची जातीयता जावी म्हणून मी प्रार्थना करीत होतों. आणि मित्रांसहि जातीयतेच्या बरबटापासून मुक्त असणाऱ्या, निर्मळ सेवादलाचा प्रचार करा म्हणून विनवीत असें.

रा. स्व. संघाचें काम आज जवळ जवळ पंचवीस वर्षे चालू आहे. त्यांनीं कधीं राजकीय चळवळींत भाग घेतला नाहीं. त्यामुळें त्यांत जाणें सर्वांना सुरक्षिततेचें वाटे. सरकारी नोकरी चाकरी करणारी मंडळी आपलीं मुलेंबाळें संघांतच पाठवीत. शिवाय पांढरपेशा लोकांत संस्कृतीचा एक कृत्रिम अभि-मान असतो. ज्याप्रमाणें हिटलर म्हणे " आपण जर्मन लोक सर्व श्रेष्ठ. आपण जगावर राज्य करायला पात्र " तसेंच रा. स्व. संघाचेंहि असे. शिवाय त्यांचा मुख्य भर द्वेषावर असे. मुसलमान तेवढे वाईट, त्यांच्या दुष्कृत्यांच्या याद्या संग्रहीं ठेवणें—असा प्रचार असे. द्वेषमत्सराच्या पायावर उभारलेल्या संघटना भराभरा वाढतात. माणसांत पशुता आहे. याला चाऊं, त्याला खाऊं, ही वृत्ति आहे. जर्मनींत नाझी संघटनेंत परकीयांचा पराकाष्ठेचा द्वेष असे. " झेकांना फांशी द्या. झेक लोक नकोत." अशीं गाणीं शिकवीत. अशा

प्रकारें जे जे नकोत, ज्यांना ज्यांना उद्यां नष्ट करायचें आहे, त्यांच्याविषयीं पराकाष्ठेचा द्वेष तरुणांत पसरविण्यांत येई. द्वेषमत्सर अजून मानवाला आवडतात. संघाची पंचवीस तीस वर्षांची संघटना; आणि मुस्लिम द्वेषाचा पाया. यामुळें, आणि राजकारणापासून अलिप्त राहिल्यामुळें ब्रिटिशांचीहि कृपा लाभली. सरकारी नोकराचाकरांना सुरक्षितता वाटून पुनः धर्मसंस्कृतीचा अभिमान मिरवून कृतार्थतेचें समाधानहि मिळवितां येई. यामुळें ही संघटना वाढली.

काँग्रेसनें खंबीरपणें सेवादल संघटना कधीं हातीं घेतली नाहीं. कधीं हातीं घ्यावी तर लढे येतांच ती बेकायदा ठरावी असें होत असे. तरीहि शेवटीं १९४१ सालीं महाराष्ट्रांत राष्ट्रसेवादलाचा पाया घातला गेला. संघवाले काँग्रेसच्या सभा उधळूं लागले तेव्हां काँग्रेसचे डोळे उघडले. परंतु राष्ट्रसेवादल सुरू झालें नाहीं तों पुन्हां चलेजावचा भीषण लढा आला. सेवादलाचीं मुलें अनेक ठिकाणीं कामीं आलीं. त्या महान् लढ्यामुळें सेवादलाला चालना मिळाली आणि लढा संपला तेव्हां ठिकठिकाणीं मुलें आपण होऊन शाखा वेड्यावांकड्या चालवीत होतीं. १९४५ नंतर सेवादलास व्यवस्थित रूप देण्यांत आलें. शिक्षणशिबिरें सुरू झालीं. कार्यकर्ते तयार होऊं लागले. गेल्या दोन अडीच वर्षांतलें हें काम आहे. एवढ्या अवधींत महाराष्ट्रांत पाऊण लाख सेवादल सैनिक उभे राहिले. ही साधी गोष्ट नाहीं.

काँग्रेसमध्यें नाना मतें. ठायीं ठायींचे अधिकारी नाना वृत्तिप्रवृत्तींचे. म्हणून सेवादल स्वायत्त होतें. चरकासंघ, हरिजन सेवकसंघ, ग्रामोद्योग संघ, या स्वायत्त संस्था, परंतु निर्मळ राष्ट्रीयता वाढवणाऱ्या, त्याप्रमाणें सेवादल होतें. सत्तेचें राजकारण करणाऱ्यांस ही संस्था आपल्या हातीं हवी होती. सेवादलाच्या थोर कार्याबद्दल त्यांना विशेष वाटत नसे. हें हातांत कोणाच्या राहाणार याची चिंता. श्री एस्. के. पाटील थेरवड्यास म्हणत, मुंबईच्या सेवादलाला काँग्रेसच्या हुकमतीखालीं आणीन किंवा त्याचीं पाळेंमुळें खणीन. श्री शंकरराव देवांनीं सातारला सेवादलाचा महान् मेळावा पाहिला. ही शक्ति काँग्रेसच्या नियंत्रणाखालीं कशी येईल याची त्यांना चिंता लागली. आणि शेवटीं अनेक गोष्टी झाल्या. तो दुःखद इतिहास मी सांगत नाहीं. पुढें अखेर सेवादल स्वतंत्र झालें. त्यावेळेस राष्ट्रसेवादलाच्या वाढत्या शक्तीला खच्ची करणें पाप असें मला

वाटे. परंतु सत्तेचीं राजकारणें खेळणाऱ्यांना तितका सारासार विवेक नसतो. ते तात्पुरतें बघतात. दूरची दृष्टि त्यांना नसते. कांहीं काँग्रेसवाले राष्ट्रसेवादलाचा कोठें कोठें इतका द्वेष करीत कीं संघांत गेलांत तरीं चालेल, परंतु राष्ट्रसेवादलांत जाऊं नका असें म्हणत. अशा काँग्रेसवाल्यांच्या राष्ट्रीयतेची कींव येते. आणि पुन्हां गांधीजींचे अनुयायी म्हणून मिरवतात. काय करायचें ?

अशा कसोटीच्या प्रसंगांतून सेवादल श्रद्धेनें जात होतें. सेवादल नवराष्ट्र-निर्मितीचें काम करीत राहिलें. हिंदुमुसलमानांच्या लढ्यांत किंवा परवांच्या प्रक्षोभांत सर्वांच्या सांभाळासाठीं तें उभें राहिलें. आज हिंदुस्थानांत महात्मा-जींच्या ध्येयांना स्मरून जास्तींत जास्त कोण वागत असेल तर राष्ट्रसेवादल. समाजवादी पक्षाचा पक्ष म्हणून तें कधींहि प्रचार करीत नसतें. परंतु पुढें मागें समाजवाद तर यायचाच आहे. सारेच तसें म्हणत आहेत. उशीरा कीं लौकर एवढाच मतभेदाचा प्रश्न आहे. तो समाजवाद यावा, म्हणून अनुकूल वातावरण तयार करणें हें सेवादलाचें ध्येय. सेवादल म्हणजे सर्वांगिण जीवन-विकासाचें शिक्षण देणारी थोर संस्था. सहकार्य, जातिधर्मातीत दृष्टि, सेवेची वृत्ति, निर्भयता, स्वतःची सृजन शक्ति वाढविणें, चारित्र्य, सर्वांत मिसळणें, सामुदायिक जीवनाची हौस, इत्यादि गुणवर्धनावर सेवादल भर देतें. शिस्त, नियमितपणा, ज्ञानविज्ञानाचा हौस या गोष्टीहि असतात. उद्यांच्या हिंदुस्थानांत सर्वांचा विकास व्हावा, सर्वांना संधि मिळावी म्हणून झटा. प्रांतीयता विसरा. अनेक भाषा शिकून एकराष्ट्रीयत्व अनुभवा. सर्व धर्म नि संस्कृति येथें फुलवण्याचा प्राचीन प्रयोग पुढें न्या, असें सेवादल सांगतें. मारपिटीचें, हुकुमशाही वृत्तीचें शिक्षण तें देत नाहीं. लोकशाही मार्गानें जायचें असेल तर सहिष्णु बना असें सेवादल सांगतें. येथें द्वेष मत्सराचीं उपनिषदें नाहींत. प्रेम, सहानुभूति, मानवता, इत्यादि गोष्टींवर येथें भर असतो. साहाजिकच हा मार्ग तितका भव्य भडक दिसत नाहीं. द्वेषाचा रस्ता पटकन् मनुष्य घेतो. सत्याचा, सेवेचा, प्रेमाचा पंथ मनुष्य जरा उशीरानें घेतो. केवळ संघटना पटकन् वाढणें म्हणजे कृतार्थता नव्हे. मुस्लीम लीगची संघटना गेल्या चार पांच वर्षांतील. मग तिला आधीं प्रणाम करायला हवा. सारखा द्वेष पसरून ती संघटना उभी राहिली. मला पत्र लिहिणाऱ्या सज्जनास मला एवढेंच सांगायचें आहे कीं थोर ध्येयें उराशीं धरून संघटना पटकन् वाढत नाहींत. महात्माजी एकदां म्हणाले, " आपल्या श्रद्धेचा

दुसरा माणूस दहा वर्षांनीं मिळेल असें मनांत धरून काम करा." राष्ट्रसेवा-दलाचा मार्ग बिकट आहे. त्या मार्गानें झटपट रंगाऱ्याप्रमाणें प्रचंड संघटना एकदम दिसणार नाहींत. आम्हांला बैल व्हावयाचेंहि नाहीं. **समर्थांनीं शिवछत्रपतींस बैल न दाखवतां पाषाणांत रामकृपेनें जिवंत असणारी लहानशी बेडकीच दाखविली.** सेवादलसंघटना लहान असेल. परंतु ती रामकृपेनें प्राणमय राहील. आजूबाजूच्या संघटना कदाचित् मरतील, परंतु ही जिवंत राहील. प्रभुकृपेचा ओलावा तिला मिळत राहील.

उपवासांत हजारों सह्या माझ्याकडे आल्या व आम्ही जातीयता जीवनांत ठेवणार नाहीं असे त्यांचे संकल्प मला मिळाले. मग ते सेवादलांत असोत वा नसोत. मला आनंद मिळाला. आणि मी स्वतः थोडा निर्मळ झालों, हा आनंद तर आहेच आहे. असो. राष्ट्रांतून जातीयतेचें उच्चाटन करून आपण नवभारत निर्मू या. हें भगीरथ काम आहे. म्हणूनच करण्यासारखें आहे. हें भारत मातेचें काम आहे, देवाघरचें काम आहे. हें सत्याचें, प्रेमाचें, मानवतेचें काम आहे. मी लहानसा माणूस माझ्यापरी या ध्येयार्थ धडपडत असतों. मला त्यांत आनंद आहे. देशाचें नष्टचर्य संपो आणि सर्वांस आपण सारे हिंदी ही निश्चित जाणीव होवो. सर्वत्र "आपण सारे हिंदी, ऋणानुबंधी" हा मंत्र उच्चारला जावो. तीस कोटि लोक एका मुशींत घातले जाऊन शुद्धबुद्ध राष्ट्रीयता जन्मास येवो. राष्ट्रसेवादल म्हणजे या दृष्टीचा थोर आरंभ आहे. तें कृतार्थ होवो. प्रभूचा त्याला आशीर्वाद मिळो.



## भारताचा थोर वारसा

आपला देश स्वतंत्र झाला आहे. परकी सत्ता गेली. आतां आपण आपल्या भवितव्याचे विधाते. आपण सर्वांनीं लोकशाहीच्या मार्गानें जाण्याचें ठरविलें आहे. हुकुमशाही पद्धती आपणांस नको. कांग्रेसला हुकुमशाही नको आहे. समाजवादी पक्षासहि नको आहे. कम्युनिस्टांच्या मनांत काय आहे मला माहीत नाहीं. परंतु तेहि लोकशाहीच्या मार्गानें या देशांत जातील अशी मी आशा करतों. इंग्लंडमध्यें ज्याप्रमाणें नाना पक्ष आपापला कार्यक्रम घेऊन जनतेसमोर जातात, त्याचप्रमाणें आपल्या देशांतहि आतां होईल. ज्यानें त्यानें संघटना करावी, आपल्या ध्येयांचा प्रचार करावा. हें सारें करीत असतांना अहिंसात्मक प्रचाराचें सार्वभौम बंधन सर्वांनीं पाळावें. तरच आपल्या देशाला तरणोपाय आहे.

भारतीय संस्कृतीचा एक महान् विशेष आहे. येथें विचारास पूर्ण मोकळीक असे. नाना प्रकारचीं तत्त्वज्ञानें येथें प्रचारलीं जात. निरनिराळ्या परिषदांतून, विद्वत्सभांतून, राजांच्या दरबारांतून चर्चा होत. बुद्धीचें साम्राज्य सर्वत्र होतें. शंकराचार्यांनीं अद्वैत मांडावें. मीमांसकांनीं यज्ञाचा महिमा सांगावा, कर्म-कांडाची महती गावी. चार्वाकपंथीयांनीं देहाचें भस्म झाल्यावर कांहींहि उरत नाहीं, हें येथील जीवन हीच काय ती सत्यता असें प्रतिपादावें. अशा रीतीनें जनतेसमोर जो तो उभा राही. जनता सारें ऐकून घेई. कोणाचा छळ होत नसे. चार्वाकाला आपला नास्तिकवाद सांगायला तितकीच मोकळीक जितकी अद्वैताचा संदेश गर्जून सांगणाऱ्या श्री. शंकराचार्यांना. अशी सहिष्णुता जगांत अन्यत्र कोठेंहि दिसून येणार नाहीं. भारतीय संस्कृतीचा हा मोठेपणा

आहे. आणि आजच्या संक्रमणावस्थेंत त्याची अधिकच जरूर आहे. परंतु मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें कीं ही सहिष्णुता आज अस्तास गेल्याप्रमाणें दिसत आहे. आणि दैवदुर्विलास असा कीं ज्या महात्माजींनीं तुम्हां आम्हांस अहिंसा शिकवली, सहिष्णुता शिकवली, त्यांचे आम्ही अनुयायी म्हणवणाऱ्यां-कडूनच प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष, जाणीवपूर्वक वा नेणीवपूर्वक असहिष्णुता दाख-विली जात आहे.

मुंबईच्या म्युनिसिपल निवडणुकी संपल्या. ज्याला जेवढा प्रचार शक्य तेवढा झाला. महात्माजींच्या महान् प्रस्थानानें वातावरणाचा फायदा कॉंग्रेस पक्षास साहाजिकच मिळाला. एका बड्या अधिकाऱ्याजवळ निवडणुका एक महिनाभर पुढें ढकला असें कोणी म्हटलें. तेव्हां ते अधिकारी उद्गारले “ वाता-वरणाचा कॉंग्रेस पक्षास फायदा मिळूं नये अशी तुमची इच्छा, एवढेंच कीं नाहीं ? ” किती संशयी मन !

पुढें ढकला म्हणणाऱ्यांच्या मनांत कांहीं असो. तुमच्या मनांत मात्र वातावर-णाचा फायदा मिळावा हा हेतु होता हें तुमच्या उद्गारांवरून सूर्यप्रकाशवत् सिद्ध झालें. परंतु त्या कर्णोपकर्णी गोष्टी आपण दूर ठेवूं. निवडणुकी झाल्या. परंतु आतां शान्त नको का व्हायला ? तर आतां समाजवादी कामगारांवर योजना-पूर्वक हल्ले सुरू. याला काय म्हणावें ? कोणी दारू पिऊन मशाली पाजळून समाजवादी कार्यकर्त्यांस धमक्या दिल्या. परंतु त्यांचा तो सनातन मार्गच आहे. तेव्हां ते तसे वागले तर त्यांत विपरीत तें काय ? त्यांच्यामागून अहिंसक किंवा निर्मळ प्रचाराची अपेक्षा नसते. परंतु जे स्वतःला कॉंग्रेसचे म्हणवतात, समाज-वादी लोकांस चोर, डाकू संबोधून स्वतःला महात्माजींचे निष्ठावंत अनुयायी म्हणवतात, जे श्री. एस. के. पाटलांचें सत्य अहिंसेवर आधारलेलें सर्वोदयी नेतृत्व मानतात, अशांनीं तरी समाजवादी कामगारांवर नेम धरून हल्ले करायला नकोत. इतत्रहि असेच प्रकार आणखी होऊं लागले आहेत. मुंबईच्या मध्यवर्ति मेंदूकडून “ समाजवाद्यांस चांगली समज द्या, सरकार आपलें आहे, पोलीस कमिशनर तिकडे लक्ष देणार नाहींत, समाजवादी विरोध करतील तर गुंड म्हणून नेमकें त्यांना उचलतां येईल, विरोध न करतील तर मार खावा लागेल, बघूं किती टिकतात ते ” असें सत्य अहिंसेचें व्यावहारिक उपनिषद शिकवि-ण्यांत आलें आहे कीं काय ?

मी १९३९ मध्यें पूज्य विनोबाजींस एकदां लिहिलें होतें कीं ज्यांच्या जीवनांत सत्तेचें राजकारण असतें, सत्य अहिंसेचा संबंध ज्यांच्या जीवनांत फारसा नसतो, त्यांनीं आम्हांला येतां जातां केवळ ते काँग्रेस संस्थेचे पदाधिकारी, सत्ताधिकारी आहेत म्हणून सत्य अहिंसेच्या उपदेशाचे लोटे पाजीत बसावें ही सर्वांत उपरोधात्मक घटना होय ! हा खरा दैवदुर्विलास ! दुःखानें मला म्हणावें लागतें कीं, आजहि तोच प्रकार आहे. चार दिवसांपूर्वी एक कामगार तरुण माझ्याकडे येऊन म्हणाला, " गुरुजी, आम्हीं काय करावें ? एका मुलाला मर्मांतिक मार बसला. त्याची आई रडत आहे. आम्ही प्रतिहल्ला चढविला तर नेमके त्यांच्या जाळ्यांत आम्ही सांपडूं. आम्हीं गुंड ठरूं. आम्हांला हद्दपार करतील. न विरोध करावा तर असें कोठवर सहन करायचें ? सरकार त्यांच्या पाठीमागें." मी म्हटलें, " आपल्या देशांत महात्माजींनाहि घाव छातीवर घ्यावे लागले. तेथें तुम्ही आम्ही कोण ? सारें सहन करा. आपली कसोटी आहे. त्या मातेला म्हणावें ज्या देशांत गांधीजींना हुतात्मा व्हावें लागतें तेथें आपण कोठले कोण ? आपण एकच श्रद्धा घेऊन जाऊं या कीं आपलें निष्पाप रक्त सांडलें गेलें तर आपलें ध्येय अधिकच जवळ येईल." मी त्या कामगारास हें सांगितलें. परंतु मी अति दुःखी झालों.

समाजवादीपक्ष हा एक पक्ष आहे. प्रांजळपणें, अहिंसक लोकशाहीमार्गानें संघटना करीत, सेवा करीत तो जात आहे. या पक्षाविषयीं गांधीजींनाहि प्रेम होतें. हा डाकूंचा पक्ष नाहीं. ज्यांच्या हातीं काँग्रेस जावी असें महात्माजींना वाटे अशांचा हा पक्ष आहे. आपण खेळीमेळीनें जाऊं या. तुम्हीं तुमचें कार्य चालवा. निवडणुका लढूं. जनता निकाल देईल तो स्वीकारूं. पुढें जाऊं. समाजवादी लोकांपासून भिन्न असणाऱ्या कामगारांना माझी प्रार्थना आहे कीं मारहाणी बंद करा. घोडपदेव, सातरस्ता, नायगांव सर्वत्रच्या कामगारांना माझी प्रार्थना कीं, अहिंसक मार्गानें आपापले सेवासंघटनापंथ घेऊन आपण जाऊंया. त्यांत गोडी आहे, राष्ट्राचा सांभाळ आहे. घोडपदेवचे श्री. बोरकरदादा माझे स्नेही आहेत. नाशिक तुरुंगांत उपवासांत त्यांनीं माझी सेवा केली आहे. त्यांनीं प्रेमानें मला दिलेली गोधडी मी बोर्डीस जपून ठेवली आहे. ते परवां मला भेटायला आले होते. मी फार बोलूं शकत नव्हतों. महात्माजींच्या भव्य तसबिरीसमोर मी त्यांना मिठी मारली.

माझ्या डोळ्यांनीं माझ्या हृदयांतील कालवाकालव त्यांना सांगितली असेल. मी दादांना प्रेमानें प्रार्थितों कीं दादा, आपले मतभेद आहेत. तरीहि आपण सारे या भूमीचे. आपण अहिंसेचें सार्वभौम बंधन स्वीकारून आपापलें काम करीत राहूं या. पुढें असेंब्लीच्या निवडणुका येतील. जो तो आपला कार्यक्रम ठेवून उभा राहील. मारामाऱ्या नकोत. स्वर्गीय महादेवभाईनीं एकदां हरिजन-मध्यें लिहिलें होतें, " उद्यां समाजवादी कार्यक्रम, उत्पादनसाधनें राष्ट्रीय करणें, इत्यादि कार्यक्रम जनतेसमोर ठेवून जर समाजवादी पक्ष बहुमतानें निवडून गेला आणि कार्यक्रमानुसार कायदे करूं लागला तर त्यांत वावगें कांहींच नाहीं. लोकशाही मार्गानें समाजवाद आला तर जनतेच्या इच्छेनें तो आल्याप्रमाणें आहे. " तेव्हां आपल्या स्वतंत्र देशांत आपण लोक-शाही मार्गानें जाऊं या. महात्माजींना असें अहिंसक प्रचार—स्वातंत्र्य सर्वांसाठीं हवें होतें.

काँग्रेस सरकारच्या चरणींहि माझी प्रार्थना कीं समाजवादी कार्यकर्त्यांस पाण्यांत नका पाहूं. मी ईश्वरसाक्ष सांगतों कीं ते लोकशाही मार्गानें जाऊं इच्छितात. ते गुंड नाहींत. ४२ मध्यें घातपाती होते तर त्या वेळेस महात्मा-जींच्या उपवासापर्यंत आणि पुढेंहि ९ ऑगस्टपासून १६ महिने सौ. सुचेता कृपलानीपासून तो स्वामी आनंदापर्यंत सारे त्या कार्यक्रमांत होते. आज आतां तो सवाल नाहीं. स्वातंत्र्य आलें आहे. आतां लोकशाही मार्गानें जाणें हेंच काम. इंग्लंडमध्यें ॲटलीचें कामगार मंत्रिमंडळ यायला कित्येक वर्षें लागलीं. इंग्लंडांत गेलीं पाऊणशें वर्षें समाजवादाचा प्रचार होतां होता आतां यश आलें. आपल्या-कडेहि समाजवादी सरकार यायला वेळ लागेल. समाजवाद्यांजवळ पैसा नाहीं. वृत्तपत्रें नाहींत. काँग्रेस संस्थेच्या भोंवतालचें तेजोवलय अधिकारी गटानें स्वतः-भोंवतीं ठेवल्यामुळें तेंहि असून आम्हांस नसल्यासारखें. तरीहि लोकशाहीवर विश्वसून समाजवादी पक्ष जाणार आहे. त्यांना हिंसा नको आहे. तेव्हां काँग्रेस-मंत्र्यांना प्रार्थितों कीं आतां गुप्त पोलिसांचा ससेमिरा नको. मनमाडचे थोर कार्य-कर्ते श्री. गायकवाड यांना गुंड नका म्हणूं. रावळगांवला कायमचें १४४ कलम १० मैल टापूंत लावून समाजवाद्यांचा लोकशाही हक्क मातींत नका दवडूं. जळगांवला शान्ति स्थापूं पाहणाऱ्या समाजवादी तरुणांसच आकसानें सत्ता हातीं असल्यामुळें तेथील काँग्रेस श्रेष्ठींच्या मूक इच्छेस्तव अटक नका करूं.

तुम्ही महात्माजींचें पुण्यपावन नाम उच्चारीत असतां. मग अहिंसेच्या नि लोकशाहीच्या मार्गानें जाणाऱ्या समाजवादी कार्यकर्त्यांची कां बरें सर्वत्र गळचेपी ? असें नाहीं होतां कामा. लोकशाहीचा तो अपमान आहे. डॉ. उत्तमराव पाटलांवर सभेला कोठें न जाणें, न बोलणें, न लिहिणें असे विचित्र निर्बंध ! माझी मान तर उद्वेगानें दुःखानें भारावून खालीं होते. प्रभु करो नि विचारप्रसाराचें स्वातंत्र्य ज्या देशांत प्राचीन काळापासून असे, अहिंसेचें सार्वभौम बंधन पाळणाऱ्यांना प्रचारस्वातंत्र्य असायला हवें असें महात्माजींनी जेथें तुम्हां आम्हांस शिकविलें, त्या या स्वतंत्र देशांत प्राचीन लोकशाहीनें जाणाऱ्यांस, निर्मळ, प्रांजळ प्रचार करणाऱ्यांस कॉंग्रेस मंत्र्यांनीं मोकळीक द्यावी. कॉंग्रेस संस्थांनींहि तसें स्वातंत्र्य रहावें म्हणून दक्षता दाखवावी. सहिष्णु सुंदर लोकशाहीचा पाया आपण या महान् राष्ट्रांत घालूं या. भारताची परंपरा, महात्माजींवरची निष्ठा आम्हांस सहिष्णु करो. अधिक काय लिहूं ?



## मुंबईनें महाराष्ट्राला महात्माजी द्यावे

महात्माजींच्या क्रूरतम हत्येमुळें महाराष्ट्रभर प्रथम सात्त्विक आग पेटली. नंतर परंपरागत आर्थिक, सामाजिक, धार्मिक विषमतेची मनांत शेंकडों वर्षें दबा धरून बसलेली प्रचंड तेढ वरचें झांकण फेकून दिल्यामुळें प्रचंड स्फोट होऊन बाहेर पडली नि पेटलेली आग वाऱ्याप्रमाणें सर्वत्र आगडोंब करीत निघाली. आज आग भस्म करून शांत होत आहे. आतां शेतें कापलीं जाण्याची सुरुवात आहे. थोर सेवक स्वामी रामानंदतीर्थ इतरांसह शांतता, स्नेह प्रस्थापीत संचरत आहेत. परंतु दुःख, कष्ट, क्लेशांना सीमा नाहीं. एका धावडशी गांवांतील वीस घरें गेलीं. अश्रूंनीं ओला झालेला एक तरुण मला भेटला. म्हणाला, "गुरुजी, मंगळसूत्रेंहि गळ्यांतून गेलीं." मी तरी काय करणार? सातारा, सांगली, कोल्हापूर, सर्वत्र आज ब्राह्मण मंडळी निराधार हिंडत आहेत. झाडाखालीं आहेत. बाळंतिणी होत आहेत. ना आधार ना निवारा. दारूण दशा! नौखालींत महात्माजी गेले. बिहारांत गेले. हिंदूंनीं मुसलमानांचीं घरें बांधून द्यावीं म्हणाले. आज या महाराष्ट्राच्या दक्षिणेकडच्या प्रलयांत कोण जाणार? मायबहिणींना, वृद्धांना, लेंकरांना, भयभीतांना, चिंताग्रस्तांना कोण धीर देणार? कोणी विनोबाजी निवृत्ति दूर झुगारून येईल का? कोण येणार?

मी काय लिहूं? नौखालींत मुसलमानांना नांवें ठेवलीं. येथें आपणच आहोंत. परंतु नौखालींत महात्माजी सुरक्षित राहिले. राष्ट्राची ठेव आपणांस परत मिळाली. ज्यांना आज आगींतून जावें लागत आहे, त्यांच्या ज्ञातिबांधवांनीं राष्ट्राची ती ठेव नष्ट केली. अति क्रूरपणें नष्ट केली. परंपरागत विषम-

तेच्या दबून राहिलेल्या दारुगोळयाला काडी लागली. शांतपणें सर्वांच्या पापांचें हें प्रायश्चित्त सामुदायिक रीतीनें घेतलें जात आहे. ऐतिहासिक कायदा ही एक अजब वस्तु आहे. आपल्या रोजच्या कारभारांत जो गुन्हा करतो, त्याला साधारणपणें शिक्षा होते. मी चोरी केली, मी सांपडलों, मी शिक्षेस पात्र ठरलों. परंतु ऐतिहासिक कायद्याची अंमलबजावणी निराळी असते. तेथें गुन्हेगारच शिक्षा भोगतो असें नाहीं. कोणास तरी त्या पापाचें प्रायश्चित्त घ्यावें लागतें. विश्वशक्ति जणूं तुम्हांस एक मानते. तुका म्हणे एका देहाचे अवयव. कोठेंतरी शिक्षा झाली तरी ती विराट समाजाला जणूं झाली. आमच्या पूर्वजांनीं अस्पृश्यता निर्मिली. परंतु त्याचे दुष्परिणाम आम्हांला भोगावे लागत आहेत. आमचे पूर्वज ज्ञानविज्ञानांत मागें राहिले, जगापासून दूर राहूं लागले, नि आम्हीं मागें पडलों व गुलाम झालों. अशा रीतीनें पापें पूर्वजांचीं तर निस्तरावीं आजच्या पिढीनें. त्याप्रमाणेंच संघाच्या किंवा हिंदुमहासभेच्या कोणा कटवाल्यांनीं कट रचिले. परंतु प्रायश्चित्त सर्वांना घ्यावें लागत आहे. संघांत आपलीं मुलें व्यायामासाठीं जावींत म्हणूनहि आईबाप पाठवीत. जा समितींत, जा संघांत, असें आईबाप म्हणत. त्या संस्थांचे वरचे सूत्रधार कोणते उद्देश डोळ्यांसमोर ठेवून जात आहेत तें खेडेगांवांतील जनतेला काय माहीत? कांहींतरी धर्माचें आहे, भगवा झेंडा आहे, व्यायाम आहे, बजरंग बली की जय आहे, जाऊं द्या मुलें तेथें, असें मायबापांना वाटे. संघ राजकीय गोष्टींपासून अलिप्त आहे असेंहि संघाधिकारी उद्घोषीत असत. परंतु लष्करी पद्धतीनें कट करून सत्ता हातीं घेण्याचें डाव प्रगट होऊं लागले. आमचीं सरकारें आंधळींच होतीं. सेवादलें व समाजवादी धोक्याची सूचना देत होते. त्यांचा उपहास होत असे. आणि शेवटीं महात्म्याचें महान् बलिदान झालें आणि त्या बलिदानाच्या महापातकाच्या महान् क्षालनार्थ आज दक्षिण महाराष्ट्रांत लहानमोठीं प्रायश्चित्तें दिलीं जात आहेत. निरपराधीहि यातना, अपमान क्लेश भोगीत आहेत. मी येथें मोसंब्याचा रस घेत आहें. मायभगिनींनो, मुलाबाळांनो, तुमच्या आमच्या इतर बांधवांनीं जीं पापें पूर्वीं केलीं, आज केलीं त्यांचें प्रायश्चित्त तुम्हीं घेत आहांत. कोणी तरी घ्यावें लागतें असा ऐतिहासिक कायदा आहे. तें भाग्य आगींतून

जाण्याचें ललाटीं आहे. भोगा तें आणि महाराष्ट्राला निर्मळ भाग्यावर पुन्हां चढायला तेज द्या.

मुंबापुरींतील कामगारांनो, पांढरपेशांनो, श्रीमंतांनो, तुम्ही नौखाली, सिंध, पंजाबला मदत पाठवलीत. जवळच्या महाराष्ट्रांतील मायबहिणींचे अश्रू तुम्हीं नाहीं का पुसणार? आपल्या बांधवांनीं आंधळेपणानें काय हें केलें? सांगलीला गजानन मिल जाळली गेली. परंतु सारे कामगारच आज बेकार झाले. त्यांच्या घरांतील बायका–माणसें मुलें आज बेकार, उपाशी आहेत. शहरांतील कामगार समजतो कीं राष्ट्राची होळी पेटवून समाजवाद येत नाहीं. गिरण्या जाळून, बागा तोडून, गवतांना काडी लावून, घरें शिलगवून मरणाची समता निर्माण होते. परंतु आर्थिक समता येत नसते. शहरांतील जागृत कामगार हें जाणतो; म्हणून मुंबापुरी शान्त राहिली. आपले खेडेगांवांतील बंधु हें अजून जाणत नाहींत. म्हणून त्यांच्या सात्त्विक आणि वर्गीय प्रक्षोभास निराळें स्वरूप मिळालें. परंतु रडून काय होणार? सारें पाप शेवटीं अज्ञानरूप असतें. नवीन विचार नेणें हाच त्याला मार्ग. परंतु तोंवर हजारों बांधवांचें काय? आपण माणसें आहोंत. माणसांची विटंबना, अश्रु पाहून जो उभा रहात नाहीं तो दगड आहे. आज महाराष्ट्रांतील हे तुमचे निर्वासित बांधव, या निर्वासित बंधुभगिनी तुमच्यापासून मानवतेची, उदार बंधुतेची अपेक्षा करीत आहेत. ही सारी मंडळी श्रीमंत होती असें नाहीं. कांहीं कुटुंबें रडुखुडू संसार करणारीं होतीं. परंतु ब्राह्मण पडलीं. बिचारीं रखडत आहेत, वणवण रुदन करीत जात आहेत. महात्माजी असते तर? तुम्हीं आम्हीं महात्माजींवरच्या प्रेमानें काय हें घोर पाप केलें? अरेरे! आपण मानव किती चंचल नि चुका करणारे! परंतु आपलेच ओठ, आपलेच दांत, सारेच आपण. कोणी कोणास बोलावें, सांगावें? मी वेदनांनीं विकल झालों आहे.

मुंबापुरी, तूं महाराष्ट्राला पुन्हां महात्माजी दे. एका महाराष्ट्रीय ब्राह्मणानें महात्माजींचा पार्थिव देह पाडला. आपण महात्माजींचा महान् आत्मा महाराष्ट्रास देऊं. कारण महाराष्ट्रांतील या ज्वालांत, या अश्रूंत, या हाहाःकारांत महात्माजींचा महान् आत्माहि नष्ट होत आहे, झाला आहे. आपण मुंबईहून तो पाठवूं या. कामगारांनो, तुमचे पगार येतील. महागाईभत्ता अधिक मिळेल. महाराष्ट्रांतील हजारों उध्वस्त घरांदारांसाठीं ते पैसे द्या. पडलेले संसार सुधारावे

म्हणून ही मदत उभी करा. कोट्यावधि रुपयांची हानि झाली आहे. आणि अश्रूंची किंमत कोण करील? गळ्यांतील मंगलसूत्राची किंमत कोण करील? परंतु चार दैवाचे थेंबहि पुन्हां हिरवळ हंसवतात. त्याप्रमाणें तुळशीपत्र ठेऊन दिलेली मदत तिकडील निर्वासितांचे अश्रू पुशील; निराश, अंधकारमय हृदयांना आशेचा नवकिरण देईल; म्हणून माझी हात जोडून तमाम बंधु-भगिनींना विनंती कीं या क्षणीं शक्य ती अधिक मदत देऊन मानवतेची पूजा करायला उभे रहा. हा ब्राह्मण ब्राह्मणांना मदत करायला सांगतो असें नका म्हणूं. येथें भूतदयेचा, मानवतेचा साधा सवाल आहे. मी ब्राह्मण नाहीं, निर्वासित ब्राह्मण नाहींत, तुम्हीं ब्राह्मणेतर नाहीं. एका आकाशाखालचें आपण या क्षणीं जीव आहोंत. एका विश्वाच्या विशाल नौकेंतील यात्रेकरू आहोंत. सर्वांची एक जात, एकच पंथ, एकच अखेरचा मुक्काम आहे. पगार, भत्ता मिळेल तेव्हां अधिकांत अधिक देणगी देऊन त्याग करा. लाखों रुपये कामगारांनीं उभे करा.

त्याचप्रमाणें मुंबापुरींतील पांढरपेशांनो नि धनिकांनो, तुम्हींहि संघीय पापांत, शांतिपापांत भागीदार हस्तें परहस्तें, प्रत्यक्ष अप्रत्यक्ष आहांत. शहरांत होतांत म्हणून निभावलांत. विचार करा. तुम्हींहि महाराष्ट्राच्या मदतीसाठीं जास्तींत जास्त त्याग करून उभे रहा. आंग्रेवाडी, गोरेगांवकर वाडी, शास्त्री हॉल, सोमण बिल्डिंग, मोहन बिल्डिंग, शिवाजी पार्क, साऱ्या ब्राह्मणी पांढरपेशी लोकांनो! गंभीरपणें विचार करा. मोठें मन करा. सहानुभूतीचा, मोलाचा महान् क्षण आहे. यावेळचे तुमचे सारे पगार महाराष्ट्रासाठीं अर्पण करा. घरांतील कोणी गेलें, आजारी पडलें तर आपण कर्ज करतों. आज हजारों कुटुंबें धाय मोकलीत आहेत. तुम्हीं एका महिन्याची प्राप्ति, एका महिन्याचा पगार नाहीं देणार? तुम्हांला माणुसकी, बंधुता, अश्रूंची कदर, या गोष्टी का कळत नाहींत? हृदयें का नाहींशीं झालीं?

मुंबईतून कामगार, पांढरपेशे, धनिक यांच्या त्रिविध महान् सहानुभूतींतून महात्माजींचा महान् आत्मा आपण महाराष्ट्राला पाठवूं. ही महान् सहानुभूति, ही सक्रिय मदत महात्माजींच्या आत्म्यास आनंदवील. महाराष्ट्राचें एक हृदय आहे, एक आत्मा आहे असें अनुभवास येईल आणि भारतमातेच्या महान् घरांत आपण जगायला, सुखानें नांदायला लायक आहोंत असें ठरूं.



## पूज्य विनोबाजींना हाक

शेवटची विनवणी
संतजनीं परिसावी
विसर तो न पडावा
माझा देवा तुम्हांसी
आतां फार सांगूं काय
अवघें पायांसी विदीत
तुका म्हणे पडतों पायां
करा छाया कृपेची ॥

कालच्या कर्तव्याच्या अंकांत मी मुंबापुरींतील जनेतला महान् सहानुभूति जास्तींत जास्त आर्थिक साहाय्य देऊन महाराष्ट्रीय निर्वासितांसाठीं दाखवा म्हणून प्रार्थना केली. सहानुभूतिरूप महात्माजींची मूर्ति आपण महाराष्ट्रीयांस द्यावी असें मी सुचविलें. मुंबईचे कामगार, पांढरपेशे वर्ग, इतर धनिक या कार्यांत शक्य तें जास्तींत जास्त करतील अशी आशा मी बाळगून आहें. मुंबईतील भगिनीवर्गहि या थोर कार्यांत मागें राहणार नाहीं अशी माझी श्रद्धा आहे. स्त्रियांचें मन हळुवार असतें. सातारा, कोल्हापूर, सांगली कडील माय-भगिनींचें अपार दुःख आहे. येथील सर्व महिला मंडळें, वनिता मंडळें जागृत होऊं देत. जास्तींत जास्त साहाय्य द्यायला तयार रहा. मुंबईच्या भगिनींनीं जर हजारों रुपये ओतले तर पुरुष मागें राहणार नाहींत. तिकडे कामगारहि मागें राहणार नाहींत. सारी मुंबई विराट् सहानुभूतीनें सद्गदित होऊन उभी राहूं दे.

मुंबईहून आपण पैसे पाठवूं. निराधारांना थोडा आधार देऊं. परंतु तिकडील जनतेचीं भंगलेलीं मनें कोण सांधवील? तुटलेलीं हृदयें कोण जोडील?

" फुटलें मोतीं तुटलें मन
सांधूं न शके विधाता "

ही शक्ति कोणाजवळ आहे? महाराष्ट्राचा आत्मा विदीर्ण, विशीर्ण आहे. यांतून पुन्हां प्रेमस्नेहाचा आत्मा कोण निर्मिणार? कोणाजवळ ही किमया आहे? कोणाजवळ हें अमृत-रसायन आहे?

माझी दृष्टि वर्ध्याजवळ पवनारकडे वळत आहे. तेथें धाम नदीच्या तीरावर पूज्य विनोबाजी आहेत. सेवारूप साधना करीत आहेत. त्याग, तपस्या, वैराग्य, ज्ञान, भक्ति, कर्म, यांची ते मूर्ति आहेत. ते मूर्त शांति आहेत. मूर्तिमंत अद्वैत आहेत. महात्माजींच्या साधनेची ती चालती बोलती श्रुतिमाउली आहे. पूज्य विनोबाजी आठ दिवस साताराकडे नाहीं का येणार? ते संतांचे ऋषिमुनींचे वारसदार आहेत. ते शान्ति घेऊन, अमृत रसायन घेऊन नाहीं का येणार?

महात्माजी नौखालीच्या आगींत गेले. शान्ति देऊन आले. विनोबाजी, तुम्ही साताराकडे या. कृष्णापंचगंगांच्या भागांत या. समर्थांच्या शिवभूमींत या. ही कर्मभूमि आहे, पराक्रमी भूमि आहे. विरोधविकासाची भूमि आहे. दोन ध्रुवांची भूमि आहे. येथेंच जास्तींत जास्त स्वातंत्र्याचा संग्राम रंगला. येथेंच जास्तींत जास्त रंगारिक्रूटहि मिळत. येथेंच थोर क्रांतिवीर, येथेंच अट्टल डाकू, दरोडेखोर, येथेंच महर्षि भाऊराव पाटलांसारखे कर्मवीर, तर तेथेंच आज अपार प्रक्षोभ नि उत्पात. मी सातारा जिल्ह्यांत हिंडतांना म्हणत असें, " सातारा म्हणजे माझें रामनाम. रामनामानें शिळा तरत. साताऱ्याचें नांव घेतांच दगडांना स्फूर्ति येऊन ते स्वातंत्र्ययुद्धांत उडी घेत. " सातारा जिल्ह्यांत २०।३०, ४०।४० हजारांच्या सभांत मी बोललों. किती श्रद्धा, निष्ठा, प्रेम! तिरंगी झेंडा पाहून शेतांतील बाया धांवून येत, प्रणाम करून परत कामाला जात. सातारा जिल्ह्यांत ध्येय, पराक्रम, श्रद्धा, निष्ठा, त्याग, सेवा, कष्ट यांचें अपार पीक येतें. परंतु त्याचेबरोबर दुसरेंहि पीक कधीं कधीं जोरावतें. दुसरीं विषारीं बीजेंहि तेथें आहेत. तीं नष्ट झालेलीं नाहींत. या जगांत पेरलेलें कधींहि नष्ट

होत नाहीं. तें कोठें तरी खोल असतें. चांगलें वा वाईट असतें. म्हणून माणसानें नेहमीं सत्याची, थोर ध्येयांचीच पेरणी करावी. मिसळ भेसळ नको. शुद्ध दाणे पेरणीला असावे. साताऱ्च्या भूमींत शुद्ध पेरणीबरोबर अशुद्धहि पडलेलें आहे. तें संधि सांपडतांच वर येतें. आणि विषाचेंहि अपार पीक येतें. अमृत आणि विष दोहोंची साताऱ्ला चव घ्यावी लागते.

अशा या भूमींत विनोबाजी या. साऱ्या विसंवादांतून सुसंवादी जीवनाची कला दाखवा. ही कला, तुमच्याशिवाय कोण दाखवील ? त्या कलेचे–जीवन–संगीताच्या कलेचे तुम्हीं महान् उपासक आहांत. त्या कलेचीच जीवनावधि तुम्ही उपासना केलीत. त्यांतील अमर प्रकाश घेऊन साताऱ्च्या बाजूला या.

पूज्य विनोबाजी मागें मला म्हणाले, "माझी प्रवृत्ति ही निवृत्तीची आहे." माझी त्यांना हात जोडून प्रार्थना आहे कीं कठिण प्रसंगीं तुम्ही अनन्त प्रवृत्तिमय होऊन या. शुकाचार्य सात दिवस अहोरात्र भागवत सांगत बसले. तुम्ही या संचारार्थ; भग्न हृदयांना शान्ति द्या. उजाड गांवें पहा. सर्वांना एकत्र बोलवा. अश्रु पुसा. धीर द्या. ऐक्याचे अमृतबोल ऐकवा. या, विनोबाजी या. तुम्ही १९३३ च्या ऑक्टोबरमध्यें वर्ध्यास म्हणालां होतां, "एखादे वेळेस माझ्या पायास भिंगरी लागेल. मी सर्वत्र भटकेन." ती भिंगरी आज लागो. या सर्वत्र संचार करायला. अमृतसिंचन करायला. आज जरूर आहे. हा क्षण आहे. यांतून नवीन महाराष्ट्र उभा राहील. नाहींतर जखमा भरून निघणें कठिण. तुम्हीं जातीय प्रक्षोभावरचे महान् धन्वन्तरी आहांत. या, विनोबाजी या.

पंढरपूरचा पांडुरंग मोकळा व्हावा म्हणून तुम्हांला अपार वेदना. आम्हीं तो मोकळा व्हावा म्हणून शक्य तें सारें केलें. पांडुरंग मोकळा आहे. या ना तुमच्या या प्रिय महाराष्ट्रांत. तुमची अमृतमय बोधवाणी घेऊन या. तुमची त्यागतपस्येची पावनगंगा घेऊन या. मी तुम्हांला किती आर्जवूं? किती प्रार्थूं ? माझ्या अश्रूंनीं मी हे शब्द लिहीत आहें. माझ्या रक्तानें लिहींत आहे. महाराष्ट्राचें शतचूर्ण हृदय माझ्या शब्दांतून तुम्हांला बोलावीत आहे. तुम्ही १ मार्चपासून हिंडायला या. दहा दिवस हिंडून गांधीसेवासंघाच्या बैठकीला तुम्हीं वेळेवर जाल. ही वेळ दवडूं नका.

तुम्ही आलेत म्हणजे बरोबर आश्रमसंगीत येईल. व्रतें येतील. चरका गूं गूं

करीत येईल. तकला नाचत येईल. वृत्तपत्रें, त्यांचे बातमीदार, हजारों तरुण, सेवादलें, सरकारी अधिकारी, कॅंग्रेसचे कार्यकर्ते, समाजवादी कार्यकर्ते, सारे येतील. सूर्याभोंवतीं सारे फिरणार, नाचणार. विनोबाजी तुम्ही या. सातारा, सांगली, कोल्हापूर सर्वत्र मांगल्याची, पावित्र्याची, सेवेची यात्रा, पंचारती सुरू होईल. खळमळ शमतील. वैरें विझतील. द्वेष शान्त होतील. नवीन शान्तीचें, प्रेमस्नेहाचें, नव आध्यात्मिक नि राष्ट्रीय विकासाचें भव्य पीक येईल. महाराष्ट्र महान् नांवाला पात्र ठरेल. तुमचें आगमन अमृतमय मेघवर्षावाचें होईल. मांगल्याचे मोक्षवैभवाचे अपार मळे पिकतील. या, विनोबाजी, या. आम्ही पैसा गोळा करून देऊं. तुम्ही प्राण ओतायला, आत्मा द्यायला, प्रेमस्नेहाचा सुकाळ करायला या. अधिक काय लिहूं ?



# गोध्रा येथील आगीनें जागे व्हा

देशांतील दुःखांना सीमा नाहीं. कधीं कधीं सुखापाठीमागून दुःखें येतात. आज आपणांला सुखाचें दर्शनच नाहीं. संकटें, दुःखें यांनीं चोंहों बाजूंनीं घेरलें आहे. देश परकी सत्तेपासून मुक्त झाला. परंतु द्वेषमत्सरांचे आपण गुलाम बनलों. देशाची फाळणी होऊन तरी भलें होईल असें वाटत होतें. अखंड भारताचें ध्येय सोडूनहि शान्तीचे प्रश्न मिटावे म्हणून काँग्रेसचे पुढारी फाळणीसहि तयार झाले. परंतु देशांत हिंदु--मुस्लीमांतील धर्माभिमान्यांनीं जे द्वेषमत्सर पसरवले होते ते कोठें जाणार? पेरलेलें कांहींही फुकट जात नसतें. पंजाबांत कत्तली सुरू झाल्या. निर्वासितांचे प्रवाह येऊं लागले. सारा देश हादरून गेला. लाखों लोक घरेंदारें सोडून येऊं लागले. त्याहि संकटांतून आपण आशेनें पुढें पाऊल टाकीत होतों. तोंच महात्माजींचा क्रूर वध झाला. तेंहि अनन्त दुःख आपण गिळून नवीन धैर्यानें पाऊल पुढें टाकीत होतों. महात्माजींच्या वधानें महाराष्ट्रांतील पशुता प्रकट झाली. ती शमते न शमते तों गोध्रा शहर पेटल्याची वार्ता आली. दुःखांची, आगींची, कत्तलीची आतां संवयच झाली आहे.

सिंधमधून पुन्हां निर्वासितांचे पूर येत आहेत. मुंबई प्रांतांत ते पसरत आहेत. गोध्रा येथें काहीं निर्वासित आले. घरेंदारें सोडून अपार आपत्ति भोगीत जे येतात, त्यांच्या मनांतील विषसम वेदना, प्रखर कटुता आपण समजूं शकतों. आलेल्या निर्वासितांनीं कहाण्या सांगितल्या. वातावरण प्रक्षुब्ध झालें. सुरी हल्ले झाले. तेथें गोळीबार झाला. कांहीं लोक आश्रयार्थ जरा दूर गेले. परंतु ते तेथें गेल्याचें जमावाला कळलें. जमावानें त्या दूर गेलेल्यांवर हल्ला चढविला.

ताबडतोब तेथें पोलिस गेले. तेथील हल्ल्यांत सात ठार झाले. एकंदर दंगलींत सोळा ठार व पंचवीस जखमी झाले.

इतक्यांत तिकडे जे मुसलमान घरें सोडून गेले होते, त्यांचीं दोन घरें पेटलीं. गोध्रा म्युनिसिपालिटीचे आगीचे बंब बेकार होते. बंबावरचा मुस्लिम अधिकारी बेपत्ता होता. तो मुद्दाम गेला असें नाहीं म्हणतां येणार. कारण मुस्लिम घरें पेटत होतीं. गोध्रा येथें पाण्याची अडचण. विहिरी खोल. वारा सुटला, आग पेटली. घरें भडकत चाललीं. हळुहळु हजार घरें पेटलीं. हिंदु, मुस्लीम दोघांचीं घरें. दुकानें पेटलीं. कोणाचीं किती हा हिशेब करणें म्हणजे वेडेपणा आहे. समसमान पेटलीं असें वाचून कांहींना बरें वाटेल. जैन लोकांची सारीच वस्ती जवळजवळ भस्म झाली. हिंदूंचा अर्धा बाजार भस्म झाला. बोहरींचा निम्मे बाजार दग्ध झाला. अरेरे. हीं पहा निराधार माणसें. या पहा मायबहिणी. मुलांना घेऊन हरणीप्रमाणें कावऱ्या बावऱ्या होऊन हिंडत आहेत. या हिंदु मायबहिणी, या मुसलमान मायबहिणी. त्या तिकडे, या इकडे. अश्रु वहात आहेत. हायहाय ध्वनि उठत आहे. ज्वाला गगनाला भिडत आहेत. आणि आक्रोश गगनाला पोंचत आहे. वारा जोरानें वहात आहे. कडाड कडाड तुळया पडत आहत. भिंती कोसळत आहेत. आणि सांठवलेलें तेल, गोडें तेल, रॉकेल, डालडाचे डबे—अग्नि पेटत आहे, अधिकच भडकत चालला आहे. आणि हें काय आहे इकडे? येथें चारा भरलेला आहे. चाऱ्यानें पेट घेतला. मुसलमान बंधू गुरेंढोरें बाळगणारें. या म्हशी स्वैर हिंडत आहेत. कोटें आगींतच भस्म होत आहेत. हजारों घरें पेटलीं. शेंकडों घरांची होळी. हजारों माणसें निराधार झालीं. कोट्यावधि रुपयांचें नुकसान झालें. प्राणहानि फार नाहीं झालीं. हें कोणाचें प्रेत? हें बाहेरच आहे. हा भिकारी असावा. बिचारा जळून गेला. त्या निरपराधी जीवाचें बलिदान झालें. माणसें जळलीं नाहींत. घरें जळलीं, सामान जळलें.

आणि आग लागलेल्या घरांच्या भोंवतीं हे कोण? हे सामान नेत आहेत. यांचेंच का हें सामान? का दुसऱ्यांचंच नेत आहेत? पोलिस, लष्करी सैनिक, यांना वाटत आहे कीं जो तो मालक आपली मालमत्ता उरली सुरली नेत आहे. परंतु हे मालक नाहींत. तो पहा एक घाबरला. अरे हे लुटारू आहेत. यांतील कांहीं निर्वासितच आहेत. त्यांचे पोषाख नाना तऱ्हेचे. हिंदु पोषाख, मुसलमान पोषाख! तिकडे कोणी हायहाय करीत आहेत, घरदार गेल्यामुळें निराधार झाले आहेत. तर हे त्यांच्या घरादारांची लूट करीत आहेत. काय आहे हें मानवी जीवन?

गोध्रा येथील आग विझवायला पुण्याचे, मुंबईचे, बडोद्याचे बंब गेले. लष्कर गेलें. आग भडकूं नये म्हणून लष्करी लोक घरें पाडीत आहेत, संबंध तोडीत आहेत. परंतु किती उशीरां ही मदत आली ? पुण्या मुंबईहून बंब येईपर्यंत अग्नीनें काम केलें होतें.

प्रथम दोन मुसलमानांचीं घरें पेटवलीं गेलीं. वाटत होतें कीं देवाचा वारा त्यांचींचि घरें पेटवील. त्यांचाच बाजार भस्म करील. परंतु प्रभु समदृष्टि आहे. 'होळी सर्वांचीच होवो' तो म्हणाला. केलें तुका झालें माका. दुसऱ्याचें वाईट करायला जाल तर त्यांत स्वतःचेंहि वाईट आहे. कांटे पेराल तर कांटे खावे लागतील. म्हणून आपण सत्कर्मेंच पेरावीं. सर्वांचें कल्याणच चिंतावें. त्यांतच तरणोपाय आहे.

पुष्कळ वर्षांपूर्वीं पूर्व खान्देशांत बहादूरपूरला हिंदुमुसलमानांची तेढ होती. तेथें हिंदु जमीनदार होते. त्यांनीं हिंदु गुंडांना पैसे देऊन मुसलमानांचीं शेतें भातें कापवलीं. शेवटीं मुसलमान गांव सोडून गेले. परंतु गुंडांना पैशांची चटक लागली होती. ते आतां हिंदूंचींच शेतें कापूं लागले. नाहींतर पैसे द्या म्हणत. भीक नको पण कुत्रें आवर अशी स्थिति झाली. एकदां मीं बहादूरपूरला गेलों होतों. तेथील श्रीमंत हिंदु जमीनदार मला म्हणाले, " गुरुजी, या गुंडांना कांहीं सांगा. " मी म्हटलें, " मी काय सांगूं ? तुम्हीं जें पेरलेंत त्याचीं फळें भोगा. मुसलमानांवर गुंड सोडलेत, ते आतां तुमच्यावर आले, मी काय करणार ? "

यासाठी सूडबुद्धि नको. तें शस्त्र आपल्यावरहि उलटतें. जगांतील सारे सत्पुरुष सांगत आले कीं तो वाईट वागला असला तरी तूं चांगल्या रीतीनें वाग. तूंहि वाईट वागशील तर दोन वाईट माणसें होतील. वाईटाचा परिणाम कधींहि चांगला होणें शक्य नाहीं. सारी मानवजात एकाच नावेंत बसलेली आहे. त्यानें नावेला भोंक पाडलें तर तूंहि पाडणार का ? लौकर बुडाल. त्यानें पाडलें असेल तर तूं बुजवायला जा. अग्नीला विझवायला अग्नि आणायचा नसतो. पाणी आणायचें असतें.

महाराष्ट्रांत महात्माजींना विसरलों म्हणून हजारों निर्वासित झाले. गुजराथेंतील गोध्राहि त्यांना विसरला. गोध्रा येथें जे निर्वासित आले ते महात्माजींचा संदेश विसरले. महात्माजींनी मरण घेऊन येणाऱ्यालाहि प्रणाम केला. ते सांगत होते कीं सर्वांचा सांभाळ करा. पाकिस्तानांत कांहीं झालें तरी हिंदुस्थानांत परस्परांस

सांभाळा. परंतु ती त्यांची शिकवण आपण विसरलों. संतापानें दोन मुस्लीम घरें पेटवलीं. परंतु प्रायश्चित्त सर्वांना मिळालें. अग्नीनें सर्वांना समान लेखलें. वाऱ्यानें सर्वांना समान लेखलें. द्वेषानें द्वेष शमत नाहीं. आगीनें आग विझत नाहीं. दुसऱ्याचें अकल्याण कराल तर तुम्हांसहि तें आज वा उद्यां अनुभवावें लागेल. म्हणून सदिच्छा बाळगा, दुसऱ्याचें मंगल चिंता. त्यांतच मानवता, साधुता, एवढेंच नव्हे तर खरा बचावहि आहे.

पाणी किती पातळ, हलकें. परंतु जमिनीच्या पोटांत दगड जात नाहीं, तरी पाणी शिरतें. दगड जमिनीवर टाकला तर तेथेंच टणकन पडतो. परंतु तें मृदु मवाळ पाणी, तें झिरपत पाताळापर्यंत जातें. "तुका म्हणे पाणी । पातळपणें तळा खणी." प्रेमामुळें, नम्रपणामुळें पाणी खोल जाऊन पोंचतें. शेवटीं सहानुभूति, प्रेम, मानवता याच वस्तु द्वेषमत्सरांस फोडून खालीं उदयास जाऊन भिडतील. त्यांचीच उपासना करूं या.

गोध्रा येथील तीं दोन घरें साऱ्या देशाला, जगाला गंभीर धडा देत आहेत; 'दुसऱ्यांची घरें पेटवाल, तर तुमचींहि पेटतील. दुसऱ्याचें वाईट कराल तर स्वतःचेंहि होईल. म्हणून सर्वांचें भलेंच चिंता. म्हणजे तुम्हालाहि मंगलाची प्राप्ति होईल." हा धडा हिंदु मुसलमान घेणार का? किती दिवस आपण सूडबुद्धि बाळगणार? दुःखें आपत्ति कष्ट भोगायला लागले तरी तें विसरून नवीन नवीन आशेनें जगायला उभें राहिलें पाहिजे. परंतु जेथें जाऊं तेथें जर आपण आपल्यावरचे अत्याचार, आपले हाल, मनांतील द्वेषमत्सर, वैरें हीं नेऊं तर हिंदुस्थानभर आगीच पेटतील. मग आशा कसली, उत्साह कोठला? म्हणून आपण स्वतःचें दुःख मनांत दूर ठेवूं या. झालें गेलें विसरून नवीन मंगल दुनिया निर्मूं या. सृष्टि पुढें जात असते. रडायला, सूड घ्यायला येथें वाव नाहीं. गढूळ पाणी पुन्हां निवळ होतें. तें पुन्हां पुन्हां गढूळ कराल तर तें पाप आहे. त्यानें कोणालाच शान्ति नाहीं, जीवन नाहीं. त्यानें सर्वांवर मरणकळा ओढवेल. गोध्रा येथील जनतेच्या दुःखानें दुःखी व्हा, परंतु शहाणे व्हा. ही आग राष्ट्राला जाग देवो. ही आग आमचें किल्मिष जाळो. आमच्यांतील द्वेषमत्सर या आगींत भस्म होवोत. असें झालें तर या आगींतूनहि मांगल्य उभें राहील. या राखेंतून, भस्मांतून नव भाग्य उदयास येईल. या विनाशांतून मांगल्याचे अंकुर तरारतील. प्रभु करो नि भारतीयांस ही जागृति येवो. देशांत

शांति, बंधुता येवो. महान् कर्में समोर आहेत. परंतु अविरोध निर्माण केल्याशिवाय, प्रेमैक्य निर्माण केल्याशिवाय ब्रह्मकर्माला, महान् कर्माला कोठून संधि ? ऋषि म्हणतो, "सर्वेषां अविरोधेन ब्रह्मकर्म समारभे" "सर्वांच्या जीवनात सुसंवाद निर्मून, प्रेमाचें संगीत निर्मून मी ब्रह्मकर्माला, महान् कर्माला आरंभ करीत आहें." आपणांस नवभारत निर्मिताचें, सर्वांचे संसार सुंदर नि सुखी करण्याचें, लोकशाही समाजवाद आणण्याचें महान् ब्रह्मकर्म आरंभायचें आहे. परंतु हे गोध्रा प्रकार, हे सातारी, कोल्हापुरी प्रकार जोंवर आहेत तोंवर कोठलें थोर भवितव्य, कोठलें भाग्य, कोठला समाजवाद, कोठून विकास, कोठून संधि ? म्हणून जागे व्हा. गोध्रा येथील भयंकर आग अमर जागृति देवो. मोह दवडून सत्कर्माचें भान देवो.



## यंदाची होळी

आज शिवरात्र. पंचांगाप्रमाणें मायमाऊली कस्तुरबांची आज पुण्यातिथि. शिवरात्र म्हणजे कल्याणमय रात्र. जनतेच्या कल्याणाचें चिंतन करण्याची रात्र. शिवरात्रीच्या नंतरच फाल्गुन महिना येतो. जनतेचें, समाजाचें कल्याण व्हायला हवें असेल तर अमंगलाचें भस्म केल्याशिवाय तें कसें होणार ? शेतांतील विषारी तण काढून टाकल्याशिवाय मोत्यासारख्या दाण्यांचें पीक येणार नाहीं. तुकाराम महाराज म्हणतातः

निवडावे खडे । तरी दळण वोजें घडे
निवडावें तण । शेती करावी राखण·

धान्यांतील खडे काढा नि मग दळा, म्हणजे त्या पीठाची भाकर पुष्टि देईल. शेती चांगली पिकायला हवी असेल तर सारें तण काढून टाकावें लागतें. कोंकणांत पेरा करण्याआधीं जमीन जाळतात. हेतु हा कीं विषारी गवताचें बीं जळून जावें. आणि शुद्ध बीज उगवावें. तेव्हां मंगलाची निर्मिति व्हायला हवी असेल तर अमंगलाची होळी करायला हवी. आणि अमंगल नाहींसें झालें कीं मग प्रेमाची रंगपंचमी येते. बसंतोत्सवाचा आनंद येतो.

शिवरात्रीनंतर लौकरच लहान लहान होळ्या आपण करूं लागतों. होळी म्हणजे अभद्र बोलणें, अभद्र लिहिणें, धुळवड करणें, चिखल फेंकणें, शेण्यागोंवऱ्या, लांकडें जाळणें हा अर्थ नव्हे. त्या होळींत मनांतील सारी घाण जाळायची असते. समाजांत प्रेमस्नेहाचा सुकाळ व्हावा म्हणून क्षुद्रता, स्वार्थ, जात्यभ्धता, सर्वांचा होम करावयाचा असतो. हा होळीचा अर्थ आहे.

आपला देश आज स्वतंत्र झाला आहे. परंतु आपण आत्मा गमावून

बसलेले आहोंत. आपल्या सर्वांच्या हृदयांतील पापानें महात्माजींची हत्या केली. त्या पापांत आपण सारे भागीदार आहोंत. कारण आपलीं हृदयें बरबटलेलीं आहेत. तेथें काळे बाजार आहेत, जातीयता आहे, द्वेष मत्सर आहेत, प्रान्तीयता आहे. या सर्व घाणींतून आपणांस मुक्त व्हायचें आहे. आपण जरा गंभीर होऊं या. मोठ्या मनानें विचार करूं या. महात्माजी गेल्यामुळें आपण दुःखी आहोंत. परंतु दुःख हा परमेश्वरानें पाठवलेला महान् गुरु असतो. दुःख शिकवायला येतें. या दुःखापासून आपण धडा घेऊं या. आपण ठरवूं या एक वर्षभर तरी सारे उत्सव बंद करावयाचे. गंभीर होऊन अन्तर्मुख होऊन पावलें नीट टाकावयाचीं. या होळीच्या सणापासूनच आरंभ करूं या. होळीचा सण आपण बीभत्स केला आहे. ऋषिमुनींच्या भूमींत, संतांच्या भूमींत, महात्माजींच्या भूमींत अचकट विचकट बोलणें लज्जास्पद आहे. खालीं मान घालावी लागेल अशा गर्जना आपण करतों. मायबहिणींना ऐकवतों. तसें बोलायला लहान मुलांना शिकवतों. हें सारें वाईट आहे. स्वतंत्र होणें म्हणजे सर्व वाईट गोष्टींपासून मुक्त होणें. त्याचप्रमाणें आपल्या मनोबुद्धीला गुलाम करणाऱ्या सर्व दुष्टनष्ट गोष्टींपासूनहि मुक्त होणें. हा अर्थ लक्षांत आणून यंदांचा शिमगा पाळूं या. वाईट शब्दांच्या बोंबा नकोत. दरसालचा शिमगा नको. महाराष्ट्रांत आधींच प्रक्षुब्ध असलेली परिस्थिति या होळीच्या निमित्तानें पुनः बिघडायची. सर्वांचीं मनें अशान्त आहेत. पुन्हां आगी लागायच्या, वणवे भडकायचे. म्हणून राष्ट्राचें, समाजाचें शिव इच्छिणाऱ्यांनीं यंदापासून होळीचे दिवस निराळ्या अर्थानें मानावे. गांवोगांवच्या जनतेनें एकत्र ठरवावें कीं यंदा होम करूं. परंतु त्या होमांत लांकडाबरोबर गांवांतील सारी घाणहि जाळूं. सारे जातिभेद जाळूं. कोंकणांतील कांहीं गांवीं ब्राह्मणेतर ब्राह्मणवस्ती भस्म करायला निघाले तर हरिजन ब्राह्मणेतरांना म्हणाले, "आम्ही तुमची वस्ती शिलगावून देऊं." याचा अर्थ स्पष्ट आहे. तुम्हांला ब्राह्मणी वर्चस्व नको. परंतु तुम्ही सारे ब्राह्मणेतर अस्पृश्यता नष्ट करायला तयार आहांत काय? कांहीं हाडाचे खरे सत्यशोधक सोडले तर हरिजनांना जवळ घ्यायला, ओटीवर येऊं द्यायला, विहिरीवर पाणी भरूं द्यायला मराठा व तत्सम मंडळी, इतर ब्राह्मणेतर, अस्पृश्येतर, मंडळी किती तयार आहे? म्हणून आपल्या देशांत जपून जायला हवें. ब्राह्मणेतर ब्राह्मणांवर तुटून पडतील तर हरिजन

ब्राह्मण नि ब्राह्मणेतरांवर तुटून पडतील. एकदां हिंसेचा मार्ग पत्करलात म्हणजे कोणी कोणाची हिंसा करूं नये हा त्याची करणार, तो त्याची करणार. देशांत यादवीच माजेल. म्हणून ज्या देशांत नाना जाती जमाती, नाना धर्म आहेत, त्या देशांत अहिंसेच्या मार्गानें जाणेंच हिताचें आहे. नाहींतर सर्वांचेंच निसंतान व्हायचें. म्हणून आपण सर्वच प्रकारची भेदात्मक घाण, सर्व प्रकारची जातीयता या होळींत जाळूं या. अश्लील घोषणांऐवजीं पवित्र घोषणा करूं या. सारें स्वरूपच बदलूं या.

"जातीयता भेदाभेद आपण सारे जाळूं
आपण सारे भाऊभाऊ, एकमेकां पाळूं"

अशा घोषणा गर्जवूं या.

"आपण सारे हिंदी, ऋणानुबंधी; विकासाला मिळूं दे, सर्वांना संधी" अशा घोषणा करूं या.

"जातपात आतां नको, आपण सारे एक
स्वातंत्र्य आलेलें, फुलवूं या सुरेख"
"नाना जाति नाना धर्म, प्रेमें नांदू दे
भारताला सारें जग प्रेमें वंदू दे"

अशा उज्वल ध्येयाचीं वाक्यें या शिमग्याच्या सणांत आपण घोषवूं या. आपणांला नवी दुनिया, नवी सृष्टि निर्मायची आहे. सारें अभिनव, मंगल, ऐक्याचें, विकासाचें करायचें आहे. त्याला तयार व्हा. या शिमग्याच्या सणांत अंगावर शेणमाती उडविण्याऐवजीं, आपण ऐक्याचीं ब्रीदवाक्यें असलेलीं प्रतीकें आपापल्या छातीवर लावूं या. होळीसमोर ऐक्यचिन्हें छातीवर लावून त्या होळींत सारे द्वेषमत्सर, संकुचितता, क्षुद्रता जाळायला एकत्र जमूं या. तरच या होळीनंतर प्रेमाची रंगपंचमी येईल. सुखाचा, शान्तीचा, वैभवाचा वसंत येईल. झाडांना ज्याप्रमाणें पालवी फुटेल, नवीन फुलें येतील, सृष्टींत नवचैतन्य येईल, कोकिळा कूऊ कूऊ करून प्रभूचें स्तवन करील, त्याप्रमाणें आपणहि जर सर्व भेद जाळूं, ऐक्याचा महान अनुभव घेऊं, आपण सारे मानव, सारीं प्रभूचीं लेंकरें ही थोर जाणीव घेऊन एकमेकांना भेटूं, हृदयाशीं धरूं, तर राष्ट्रीय संसार रडका न राहतां त्याला भाग्याची कळा चढेल. सारी अवकळा जाऊन खऱ्या वैभवाचा षोडश कलांचा पूर्ण चंद्र शोभूं लागेल. म्हणून महाराष्ट्रीय बंधु

भगिनींनो, यंदांचा होळीचा सण अशा अभिनव रीतीनें, गंभीरपणें, राष्ट्रीय दृष्टीनें पाळा. या दिवसांत एकच गोष्ट करूं या. रात्रीं पिठासारख्या चांदण्यांत साऱ्या गांवकऱ्यांनीं, हिंदुमुस्लीमांनीं, स्पृश्य अस्पृश्यांनीं, ब्राह्मण ब्राह्मणेतरांनी एकत्र यावें, नाना खेळ खेळावे, टिपऱ्या खेळून ऐक्याचा गोफ विणावा, एकत्र झुणका भाकर खावी; आपण सारे एक, सारीं भारतमातेचीं लेकरें हा महान् अनुभव घ्यावा. या होळीच्या दिवसांत "आम्ही जातीयता सोडली, आम्ही सारे एकत्र राहूं, हिंदुस्थानांत आम्ही सारें गुण्या गोविंदानें नांदूं" अशा प्रतिज्ञापत्रकावर गांवोगांव सह्या गोळा कराव्या. स्त्रीपुरुष, लहानथोर सर्वांनीं होळीच्या मुख्य दिवशीं त्या महान् होमाभोंवतीं सर्व गांवकऱ्यांनीं मंडलाकार जमून गंभीरपणें पुढील निर्धाराचा उच्चार करावा.

"हे शिवशंकरा, आम्ही आजपासून सारी जातीयता जाळीत आहोंत. एक होत आहोंत. आमचा निश्चय पार पडायला हा अग्निनारायण बल देवो."

राष्ट्रसेवादलांतील एका सैनिकानें भाई एस्. एम्. जोशी यांना यंदाच्या होळीपासून असें कांहींतरी व्हावें म्हणून सुचविलें. मला ती कल्पना अपार आवडली. महाराष्ट्रभर असलेल्या सेवादलाच्या शाखांनीं असा प्रचार करावा. असे कार्यक्रम आंखावे. जनतेस तरुणांस प्रेमानें, उत्कट कळकळीनें असें वागायला विनवावें, नवीन मंगल पाऊल टाकायला प्रार्थावें. आपणांस आज प्रत्येक सण, प्रत्येक क्षण, प्रत्येक प्रसंग या महान् राष्ट्रीय ऐक्याकडे नेण्यासाठीं उपयोगांत आणायचा आहे. मानवता फुलवण्यासाठीं त्यांचा उपयोग करायचा आहे. हें थोर कार्य आहे. महात्माजींचें महान् जीवन, हौतात्म्याचें मरण या गोष्टी सांगत आहे. महाराष्ट्रांतील सर्व वृत्तपत्रांनीं या होळीच्या सणाला असें दिव्य रूप जनतेनें खेडोपाडीं, शहरीं द्यावें म्हणून जर तळमळीनें लेख लिहिले तर मोठें काम होईल. माझी तशी नम्र प्रार्थना आहे. महाराष्ट्रांतील सर्व लहान थोर बंधूंस प्रार्थना कीं मानवतेचे उपासक बनून आपण महाराष्ट्राचा, भारताचा मोठेपणा वाढवूं या. अधिक काय लिहूं ?

## गुढी पाडवा

महाराष्ट्रांत आज सर्वत्र गुढी पाडवा आहे. हा वर्षप्रतिपदेचा दिवस मुख्यतः महाराष्ट्रांतच मानला जातो. आज सर्वत्र घरोघर गुढ्या उभारण्यांत येतील. नवीन वर्षाचा आरंभ सुरू होईल. महाराष्ट्रानें गेलें वर्ष कसें गेलें, नवें वर्ष कसें दवडायचें याचा निश्चय करावा. आपण शालीवाहन शक मानतों. त्यानेंच मिळविलेल्या महान् विजयाच गुढ्या उभारून आपण स्मरण करीत असतों. महाराष्ट्रावर शकांची टोळधाड आली होती. गुजराथ, माळवा जिंकून शकांचा लोंढा महाराष्ट्राकडे येत होता. कोणी तो अडवला? शालिवाहन राजानें तो महान् पराक्रम केला. दंतकथा अशी आहे कीं शालिवाहन राजानें कुंभाराच्या मडक्यांचे घोडेस्वार बनविले आणि शकांचा धुव्वा उडविला. दंतकथेचा अर्थ काय? अर्थ हा कीं महाराष्ट्रांतील जनता त्या वेळेस मातीसारखी पडलेली होती. तिच्यांत नव्हतें त्राण, नव्हता प्राण. अशा निर्जीव पडलेल्या जनतेंत शालिवाहन राजानें चैतन्य फुंकलें. मातीसारखी पडलेली जनता खडबडून उठली. आलस्य, उदासीनता सोडून उभी राहिली. मनांतील भेदाभेद सोडून शत्रूला तोंड द्यायला एकजुटीनें उभी राहिली. मातींतून राष्ट्र उभें राहिलें, महाराष्ट्र उभें राहिलें. परचक्र गेलें. शालिवाहन राजाच्या नांवानें नवीन शक सुरू झाला. चैत्र शुद्ध प्रातिपदेपासून नवीन वर्ष सुरू करण्यांत आलें. त्या दिवशीं सर्व महाराष्ट्रभर पहिला विजयोत्सव झाला. जणुं तो महाराष्ट्रांतील पहिला वहिला महान् स्वातंत्र्यदिन होता. महाराष्ट्राची मान उंच झाली होती.

त्या त्या युगांत महापुरुष येतात आणि जनतेंत नवीन प्राण ओततात. प्रभु रामचंद्र आले आणि त्यानीं ज्यांना मानव म्हणावें कीं माकडें म्हणावें असें मनांत यई अशांत चैतन्य ओतून त्यांच्याकडून रावणाचें साम्राज्य धुळीस मिळविलें.

शिवछत्रपति आले. त्यांनीं लंगोट्या मावळयांत अशी एक स्फूर्ति उत्पन्न केली कीं पांची पातशाह्या न जुमानतां मावळयांनीं जनतेचें स्वातंत्र्य स्थापिलें. महात्मा गांधी आले. आणि त्यांनीं या निःशस्त्र जनतेंत असें अलौकिक तेज निर्मिलें कीं ज्याच्यापुढें सारें जग दिपून गेलें. महापुरुष स्वतःच्या अजिंक्य श्रद्धेनें, अपार त्यागानें, ध्येयनिष्ठेनें एक प्रकारची प्रचंड प्रेरणा सभोंवतालच्या जगाला देत असतात. परंतु त्यांना असें तेव्हांच करतां येतें जेव्हां ते जनतेशीं एकरूप होतात. अवतार शब्दाचा अर्थ खालीं येणें. जो माड्या, महाल सोडून खालच्या जनतेंत येऊन मिसळतो तोच महान् क्रांति करूं शकतो. दिवाणखान्यांत धान्य पेरून शेती पिकत नाहीं. माळरानांत, उघड्या शेतांत जेव्हां पेराल तेव्हां भरपूर पीक येईल. त्याप्रमाणें क्रांतीचा संदेश आम जनतेंत पेरावा लागतो. साधुसंत सर्वत्र कीर्तनें करीत जात, नवमंत्र पेरीत जात. आज संत श्री गाडगे महाराज, संत श्री तुकडोजी महाराज तीच परंपरा चालवीत आहेत. क्रांति केवळ राजकीय नसते. आजकाल आपल्या देशांत सर्वच घांडुळलें जात आहे. सारेंच नवीन आहे. अशा वेळेस ते ते नवीन विचारांचे वारे सर्वत्र नेणें हें कार्य करायचें असतें. परकी सत्ता गेली. आतां खरें स्वराज्य, जनतेचें स्वराज्य निर्मावयाचें आहे. त्यासाठीं अपरंपार कार्य करणें प्राप्त आहे.

आपण नवीन वर्षाचा आरंभ तेव्हां धरला आहे जेव्हां सर्व सृष्टींत नवीन जीवन फुलत असतें. एकीकडे उन्हाळा होत असतो परंतु अशाच वेळेस वठून गेलेल्या वृक्षवेलींना नवपल्लव फुटत असतात. परमात्मा सृष्टींतील वृक्षवेलींना नवीन वस्त्रें देत असतो. वसंत ऋतूचे हे दिवस! फुलांफळांना बहर असतो. कोठें नवीन पालवी फुटत असते. तर करवंदीच्या जाळया फुलून करवंदें तयार होतात. महाराष्ट्रांतील तीं काळीं द्राक्षें गोरगरीब मनमुराद लुटतात. पिवळे, शेंदरी, लाल काजू लटकत असतात. आंब्यांचा भर असतो. जांभळें पिकूं लागतात. कोकंब, अळू, फणस–महाराष्ट्रांतील सारी सृष्टि सुंदर दिसूं लागते. एकीकडे सुगंधी, सुरस अशी नव सृष्टि! आणि तिकडे ती कोकिळा कूऊ कूऊ करूं लागते. ती म्हणते "सर्वत्र रखरखलेलें असतांना या सृष्टीला हिरवा पोषाख कोण देत आहे, कोण फुलांफळांना अपार बहर आणीत आहे?" ती जणुं कूऊ कूऊ करून "कोठें आहे तो, कोठें आहे तो?" असें विचारीत असते. सृष्टीचें असें हें मधुर मंगल वैभव सर्वत्र दिसत असतांना, वसंताचें वैभव शोभत असतांना, कोकि-

ळेचें कूऊ सुरू असतांना आपण नवीन वर्षाचा पहिला दिवस साजरा करीत असतों. उंच ध्वज करून उभा करतों. फुलांच्या माळा, साखरेच्या माळा त्याला घालतों. आज सारें गोड, सारें सुगंधी, सारें सुंदर—आज मन उंच जावो, मन निर्मळ होवो. मन सुगंधी, सुरस होवो. आज नवें वर्ष. जुनें जावो, नवीन येवो. जुनी घाण, जुनीं वैरें, जुने द्वेषमत्सर, जुनाट कल्पना, यांचा अस्त होवो. नवीन संकल्प, नवीन योजना, नवीन मैत्री, नवीन उदार विचार, नवीन दृष्टि येवो. आज या सर्वच गोष्टींची जरूर आहे.

महाराष्ट्रांतील बंधुभगिनींनों, नवीन गुढी उभारतांना नवीन युगाचा अर्थ समजून घ्या. जगांत सर्वश्रेष्ठ कांहीं असेल तर तें कल्पनांचें सामर्थ्य. तरवारीपेक्षां विचार बलवान् असतो. महापुरुष येतो, एखादी कल्पना देतो आणि साऱ्या जगाचें रूप बदलून टाकतो. हिटलर आला. त्यानें जर्मनीला कांहीं विचार दिले. एक प्रचंड शक्ति त्यानें उभी केली. सारें जग हादरलें. लेनिन आला. त्या सीलबंद गाडींतून त्याला जर्मनीनें रशियांत पाठविलें. परंतु त्या बंद गाडींतून अशी प्रचंड कल्पना बाहेर पडली जिनें रशियाचें रूप बदललें आणि जी कल्पना साऱ्या जगाला मिठी मारूं पहात आहे. महात्माजी आले. त्यांनीं एक अहिंसक अस्त्र पददलित जनतेला दिलें. आणि ४० कोटी मृतवत् लोक खडबडून उठले आणि स्वतंत्र झाले. कल्पनांचें जगावर प्रभुत्व असतें. आज जग युद्धाकडे जात आहे. जगांत पुनः हुकूमशाही कम्युनिझम नको असेल तर त्याच्याहून प्रबळ असा कोणता विचार तुम्ही मांडाल? जनतेचें चित्त ओढून घेईल अशी कोणती नवीन दुनिया तिच्यासमोर ठेवणार? ट्रूमनी योजनेंत तें सामर्थ्य नाहीं. ज्या लोकशाहींत भांडवलशाहीचें प्राधान्य आहे त्या लोकशाहींत स्टॅलिनच्या कल्पनांना मागें सारण्याचें धैर्य नाहीं. मग तें कोठें आहे, कशांत आहे?

महात्माजींच्या संपूर्ण दर्शनांत ती शक्ति आहे. परंतु आपण तें संपूर्ण दर्शन सर्वत्र घेऊन जाणार का? आपण गुळमुळितपणा मुळमुळितपणा दाखवूं तर सारें निरर्थक आहे. आपण तीस कोटी जनतेच्या या हिंदुस्थानांत असें कांहीं दिव्य करून दाखवायला हवें कीं जगाचें लक्ष स्टॅलिनकडून तुमच्याकडे, ट्रूमनकडून तुमच्याकडे येईल. एका अमेरिकन लेखकानें म्हटलें आहे, "जगाला असा मनुष्य मार्गदर्शक म्हणून हवा आहे ज्याच्या जवळ लेनिनचें

डोकें आहे, आणि महात्माजींचें हृदय आहे." भारतानें ही गोष्ट सिद्ध करायची आहे. पूर्व आणि पश्चिम यांचा असा अपूर्व संगम करण्याची ही महान् जबाबदारी भारतीयांवर आहे. लेनिनच्या डोक्याचें महात्माजींच्या हृदयाशीं लग्न लागलें म्हणजे त्यांतून निर्मळ साधनांनीं, लोकशाही रीतीनें आणलेला, नैतिक मूल्यें मानणारा असा नव समाजवाद निर्माण होईल. आज असा समाजवाद भारतांत यावा म्हणून आपण धडपड केली पाहिजे. आणि ही दृष्टि जीवनाच्या सर्व क्षेत्रांत नेली पाहिजे.

महाराष्ट्रा, नवीन वर्षाची गुढी उभारतांना या समाजवादाच्या उपासनेची दीक्षा घे. दहा वर्षांनीं समाजवाद आणूं, हळुहळु आणूं असें म्हणण्यांत अर्थ नाहीं. भांडवलदारांजवळ भांडवल वाढूं दे, मग तें हातांत घेऊं, असें म्हणाल तर लाल नाशाकडे जावें लागेल. उद्यां व्यक्तिस्वातंत्र्य गमवावें लागेल. हुकूमशाहीच्या फांसांत मरावें लागेल. म्हणून आतांच आम्हांस समाजवाद आणला पाहिजे ही घोषणा दुमदुमली पाहिजे. जनतेला सांगितलें पाहिजे कीं आपल्या समाजवादांत नीति आहे, वैयक्तिक स्वातंत्र्य आहे, लोकशाही आहे, निर्मळ साधनें आहेत. पुन्हां सर्वांचा संसार सुखाचा करण्याची ही प्रतिज्ञा आहे. तुम्ही स्टॅलिनवादानें दिपून जाऊं नका, ट्रूमनी भांडवलशाहीनें संतापूं नका. आपण या दोघांना दूर सारणारी तिसरी भव्य कल्पना घेऊन उभे राहूं या. भारतांत समाजवाद आणूं. या क्षणीं आणण्याच्या निर्धारानें उभे राहूं. जातपात सारें चुलींत गेलें. आपल्या समोर एकच ध्येय. हुकूमशाही न आणतां, नैतिक मूल्यांचा बळी न देतां समाजवाद आणणें. महाराष्ट्रा, यासाठीं ऊठ. गांवोगांवीं शहरोंशहरीं या विचाराभोंवतीं सारे उभे राहोत. आमची जात हिंदी; आमचें ध्येय नैतिक मूल्यें मानणारा, लोकशाहीला मानणारा समाजवाद आणणें; —असें सर्वत्र सर्वांनीं गंभीरपणें घोषविलें पाहिजे.

संकुचितपणाचें पाप दूर करूं या. जातीयतेचें पाप दूर करूं या. धर्मांधतेचें पाप दूर करूं या. प्रान्तीय द्वेषमत्सर दूर ठेवूं या. आणि नवीन मंगल दृष्टि घेऊन उठूं या.

तो मातींतून वीर निर्माण करणारा शालिवाहन आज आठवा. तो थोर ध्येयांना न सोडतां स्वराज्य स्थापणारा शिवराय आठवा. संस्कृतांतील ज्ञान मराठींत आणून ब्रह्मविद्येचा सुकाळ करणारे ते बंडखोर परंतु शांति अहिंसेचे

पुतळे असे संत आठवा, ते महात्मा ज्योतिबा आठवा, ज्यांनीं पहिल्यानें हिंदुस्थानांत अस्पृश्यतानिवारणाचें महान् कार्य सुरू केलें. ते न्यायमूर्ति आठवा, ज्यांनीं व्यापक, संग्राहक विचारसरणी दिली. ते सर्वांगीण क्रांतीचे उपासक आगरकर आठवा. स्वराज्य माझा जन्मसिद्ध हक्क आहे असें गर्जणारे कर्मयोगी लोकमान्य आठवा. आणि अस्पृश्य बंधूंत स्वाभिमानाची ज्योत पेटवणारे—ज्यांचा येत्या १४ तारखेस वाढदिवस आहे ते महान् पंडित डॉ. बाबासाहेब आंबेडकर तुमच्या समोर आहेत. आणि नव्वद वर्षे पुरीं होऊन ज्यांना ९१ वें वर्ष लागेल ते महर्षि अण्णासाहेब कर्वे समोर आहेत. ते वीरपुरुष, संतपुरुष सेनापति बापट, ते विनोबाजी, सारे डोळ्यांसमोर आणा. महाराष्ट्राचा प्रांतिक अभिमान म्हणून या गोष्टी मी सांगत नाहीं. आपण भारतमातेचीं लेंकरें आहोंत. जेथें तुम्हीं आहांत, तेथें महान् वीर जन्मले, धडपडले. भारतमातेचीं तुम्हीं थोर लेंकरें आहांत. मधून मधून कोणाचें चुकत नाहीं, कोण पाप करीत नाहीं ? परंतु त्या चुकांचा, पापांचा मार्ग सोडून नवदिव्य मार्गानें पुनः जाणें यांत पुरुषार्थ असतो. महाराष्ट्रा, तूं हें काम कर. तूं गरीब आहेस. समाजवादाशिवाय तुला तरणोपाय नाहीं. परंतु समाजवाद हवा असेल तर सारी क्षुद्रता, जातीयता सोडून देणें प्राप्त आहे. सर्वांना समान मान. सर्वांच्या आत्म्याची पूजा कर. सर्वांना प्रतिष्ठा आहे हें ध्यानांत धर. हिंदुमुसलमान, ब्राह्मणब्राह्मणेतर, स्पृश्यास्पृश्यें हीं सारीं द्वंद्वें, द्वैतें झुगारून दे. गीतेनें दोनच पक्ष, दोनच वर्ग सांगितले. राक्षसी वृत्तीचे नि दैवी वृत्तीचे. इतर जातपात, इतर धर्म गीता सांगत नाहीं. सर्वांचें भलें व्हावें म्हणून धडपडणारा एक वर्ग. आणि मीच मोठा, मला कोठारें पाहिजेत, सत्ता पाहिजे, भांडवल पाहिजे, असें म्हणणारा, लुबाडू लोकांचा दुसरा वर्ग. तुम्हीं कोणत्या पक्षाच्या बाजूनें उभे रहाणार तें आज ठरवा. आज नवें वर्ष. नवीन संकल्प करा. सारा महाराष्ट्र समाजवादाचा उपासक होवो. निर्मळ साधनांनीं परंतु शक्य तितक्या लवकर समाजवाद आणणार अशी आज प्रतिज्ञा करा आणि वर्षभर त्या प्रतिज्ञापूर्तीसाठीं शक्य तें सारें करीत रहा.



## राष्ट्रीय सप्ताहाचा आरंभ

आज सहा एप्रिलचा दिवस. आपण एप्रिल सहापासून तेरापर्यंत राष्ट्रीय सप्ताह पाळीत असतों. यंदांच्या या सप्ताहांत आपल्या मनांत शेंकडों प्रकारच्या संमिश्र भावना उत्पन्न होतील. महात्मा गांधींनीं रौलेट कायद्याविरुद्ध प्रचंड चळवळ या देशांत सुरू केली. १९१९ मधील ते दिवस. राष्ट्रसभेचें शिष्टमंडळ विलायतेस गेलें होतें. त्यावेळचें महायुद्ध संपलें होतें. परंतु महायुद्धांत हिंदुस्थाननें अपार मदत केली. तिचें बक्षीस म्हणून रौलेट ॲक्ट ब्रिटिश सरकारनें आम्हांस दिला. संशयावरून वाटेल त्याला पकडण्याचा अधिकार पोलीसांस देणारा तो कायदा. मानवाच्या संपूर्ण स्वातंत्र्याची गळचेपी करणारा तो कायदा. महात्माजींना ती गोष्ट सहन झाली नाहीं. साबरमतीच्या आश्रमांतून त्यानीं धीरगंभीर हांक राष्ट्राला मारली. अशी श्रद्धामय हांक कित्येक शतकांत कोणी मारली नव्हती. दक्षिण आफ्रिकेंत सत्याग्रहाचें तेज दाखवून तो महापुरुष मायभूमीस आला होता. येथें आल्यावर देशभर हिंडून चंपारण्यांत, खेडा जिल्ह्यांत त्यानीं सत्याग्रह केले होते. राष्ट्राला एक नवीन दीक्षा द्यायला महात्माजी अधीर झाले होते. राष्ट्रव्यापक चळवळ करायची त्यांना उत्कट इच्छा होती. देशाला स्वातंत्र्य मिळवायला दुसरा मार्ग नव्हता. जनतेची आत्मशक्ति जागी करायला महापुरुष उभा राहिला. आफ्रिकेंत वृद्धांनीं मायबहिणींनींहि गोळीबारांत निर्भय मरण पत्करलें होतें. भारतीय जनता निर्भयपणें अहिंसक रीतीनें परकी सत्तेला आव्हान देऊं शकेल असा विश्वास महात्माजींना वाटत होता. आणि ते उभे राहिले. रौलेट ॲक्टचा निषेध करण्यासाठीं हिंदुस्थानभर उपवास करा, हरताळ पाळा, सभा भरवा; सुतक्यासारखे राहून प्रचंड मिरवणुकी काढा;

अशा प्रकारचा आदेश महात्माजींनी दिला. देशांतील तमाम जनतेला निर्भय-पणें ब्रिटिश सत्तेला आव्हान द्यायला उभे रहा, तुमच्यांत ती शक्ति आहे, तुमचा आत्मा कोण चिरडील, असें सांगणारा आजवर कोणी नव्हता. दहशत-वाद आणि शिष्टमंडळें यांच्याशिवाय आम्हांला दुसरें तिसरें दिसत नव्हतें. निःशस्त्र जनतेच्या हातांत प्रबळ असें, अजिंक्य असें निर्भय असहकाराचें शस्त्र द्यायला युगपुरुष उभा राहिला. साऱ्या देशांत चैतन्य संचरलें. देशभर सभा, मिरवणुकी, हरताळ, उपवास यांचा कार्यक्रम झाला. महात्माजी मुंबईस होते. लाखों लोक समुद्रावर गेले. सभेला जमले. सर्व लोकांच्या तोंडावर एक नवतेज फुललें होतें. ब्रिटिश साम्राज्यशाहीला आव्हान द्यायला सारें राष्ट्र उभें राहिलें.

महात्माजींनीं जी तारीख दिली होती, तिच्यांत कांहीं घोटाळा झाला. कोठें दिवस आधीं मानला गेला, कोठें मागून. दिल्लीला प्रचंड मिरवणूक निघाली. परंतु तेथें सरकारनें रुद्र रूप धारण केलें. गोळीबार झाले. स्वामी श्रद्धानंद गुरख्यांच्या बंदुकीसमोर उभे राहिले. "चलाव तेरी गोली" असें म्हणाले. तें अभिनव तेज होतें. दिल्लींत हिंदु-मुसलमान भाईभाई झाले होते. हिंदु हुता-त्म्यांना मुसलमानांनी खांदा दिला. मुसलमान शहीदांस कबरस्थानांत पोंचवा-यला हिंदु गेले. स्वामी श्रद्धानंदांना मशीदींतून व्याख्यानासाठीं बोलावण्यांत आलें. दिल्लींत हिंदु-मुसलमानांचें ऐक्य रक्तानें निर्माण होत असतां पंजाबांत डायर ओडवायर यांनीं कत्तली केल्या. त्यांनीं सर्वत्र सभाबंदी जाहीर केली. पंजाबांत १९१४-१८ च्या महायुद्धांत रिक्रूटभरतीसाठीं अपरंपार छळ झाले होते. पंजाबांत जागृती येऊं नये म्हणून ब्रिटिश अधिकाऱ्यांचा डाव. आणि शेवटीं तो दिवस आला. तेरा एप्रिलचा दिवस. ज्या दिवशीं जालियनवाला बागेंत कत्तल झाली. हजारों जनतेवर दारुगोळा संपेपर्यंत गोळ्यांचा वर्षाव करण्यांत आला. किती गेले त्याची कोणी गणती केली आहे? पंजाबभर लष्करी कायद्याचा धिंगाणा सुरू झाला. पोटानें सरपटायला लावलें. स्त्रियांची अब्रू गेली. रस्त्यारस्त्यांत शकडोंना फटक मारले. उन्हांतून मुलांना कित्येक मैल रखडवलें. हा राष्ट्रीय सप्ताहाचा, रक्ताचा नि अश्रूंचा इतिहास आहे. महा-त्माजींनी आरंभिलेल्या राष्ट्रव्यापक सत्याग्रहाचा तो आरंभ होता. आपण तेव्हां-पासून हे सात दिवस पवित्र म्हणून पाळत आलों. महात्माजींना हा सप्ताह

किती पवित्र वाटे याची कल्पना ते आरंभीं आणि अंतीं या सप्ताहांत उपवास करीत यावरून दिसून येईल. १३ एप्रिल हा हुतात्मा-दिन म्हणून आपण पाळतों. राष्ट्रीय सप्ताहाचा तो शेवटचा दिवस.

त्या गोष्टीला आतां जवळ जवळ तीस वर्षें होत आलीं. या वर्षी आपण स्वतंत्र आहोंत. ज्या स्वातंत्र्यासाठीं तें १९१९ मधील अमर बलिदान झालें तें आज मिळालें आहे. जें बीज पेरलें गेलें त्याचा आज वृक्ष झाला आहे. परंतु मन दुःखानें विद्ध आहे. ज्या पंजाबांत स्वातंत्र्यसंग्रामाचा तो आरंभ झाला, त्याच पंजाबांत स्वातंत्र्य मिळाल्यावर आम्ही एकमेकांच्या कत्तली केल्या. त्याच पंजाबांतून घरें दारें सोडून लाखों लोक इकडे तिकडे गेले. स्वातंत्र्याच्या लढ्याच्या आरंभीं १९१९ मध्यें अश्रूंची नि रक्ताची किंमत दिली. आज तें मिळाल्यावरही पुन्हां अश्रूंची नि रक्ताची किंमत दिली. अजून देत आहोंत. आणि स्वातंत्र्याच्या मार्गावर या निःशस्त्र राष्ट्र ला अहिंसेच्या मार्गानें नेणारा तो राष्ट्रपिता, त्याच्या मोलवान् प्राणांचीहि किंमत राष्ट्राला द्यावी लागली. आज आपण स्वतंत्र आहोंत. परंतु १९१९ मधील तें जातीय ऐक्य आज कोठें आहे? ते महात्माजी आज कोठें आहेत? तो अखंड भारत कोठें आहे? त्यावेळच्या उदार भावना कोठें आहेत? आज आपण ब्रिटिशांपासून मुक्त झालों. परंतु जातीय स्वार्थ द्वेषमत्सर यांचे आपण गुलाम झालों आहोंत. या राष्ट्रीय सप्ताहांत राष्ट्रीय सद्‌गुण पुन्हां आपल्या अंतःकरणांत येवोत. समाजांत पुनरपि एकतेचें वातावरण येवो. निःस्वार्थ वृत्ति फुलो. व्यापाऱ्यांनो, काळा बाजार बंद करा. जनतेला वांचवा; जातीयवाद्यांनो, राष्ट्रांतील सर्वांना आपले भाऊ माना; प्रान्ताभिमान नि भाषाभिमान वाढवणाऱ्यांनो, राष्ट्राची एकता विसरूं नका, शेजारच्या प्रांतावर, त्यांच्या भाषांवर प्रेम करा. हिंदुस्थान स्वतंत्र झाला आहे. परंतु हें स्वातंत्र्य टिकवायचें आहे ना? सारी क्षुद्रता सोडून मोठी दृष्टि घेत-त्याशिवाय मिळालेलें स्वातंत्र्य फलद्रूप होणें कठीण आहे. म्हणून सर्वांनीं महात्माजींना स्मरून, स्वातंत्र्यार्थ धडपडलेल्या सर्वांना स्मरून, सर्व हुतात्म्यांना स्मरून मनांतून जातीयता समूळ काढून टाकावी. हिंदुमुसलमान भेद नको. स्पृश्यास्पृश्य भेद नको. ब्राह्मणब्राह्मणेतर भेद नको. बेडकाला चिखलच आवडतो. त्याप्रमाणें भेदांचा चिखलच आपणांस आवडतो असें समजायचें का? या भेदांना केव्हां मूठमाती देणार, बोला. ते सारे हुतात्मे तुमच्याजवळ

मागणी मागत आहेत. ते म्हणत आहेत, " आम्हीं मेलों तें यासाठीं का कीं तुम्हीं एकमेकांना वैरी समजून मारीत सुटावें ? " काय आपली शोचनीय स्थिति ? बंधुभगिनीनों, लहानानों, मोठ्यांनों, थोडातरी गंभीरपणें विचार करा. आम्ही सारे हिंदी ही दृष्टि घ्या. तुम्ही ही दृष्टि न घ्याल, जातीय दृष्टीला मूठमाती न द्याल, तर मिळालेल्या स्वातंत्र्याला लौकरच मूठमाती देण्याची पाळी येईल.

या सप्ताहांत गांधीजींबद्दलची कृतज्ञता निधीस जास्तींत जास्त रकम देऊन प्रकट करा. महात्माजींचे या राष्ट्रावर अनंत उपकार. त्यांनीं तुम्हां आम्हांस माणुसकी दिली. त्यांनीं नवीन दृष्टि दिली. त्यांचे उपकार कसे फेडणार ? परंतु रहावत नाहीं म्हणून कृतज्ञता व्यक्त करायची. हिंदुस्थानांतील कोट्यवधि लहानथोर माणसें निधींत भर घालतीलच; परंतु महात्माजींविषयीं कृतज्ञता प्रकट करायची असेल तर राष्ट्राला वांचवणारें आध्यात्मिक धन द्या. तुम्ही पैसे द्याल. परंतु मनांत जातीयता, प्रान्तीयता असेल तर ? तुम्ही पैसे द्याल. परंतु जनतेला अन्नवस्त्र इतर आवश्यक वस्तु नीट पुरवीत नसाल तर ? म्हणून महात्माजींची शिकवण आपलीशी करा. नाहीं तर त्या पैशाला काय अर्थ ?

राष्ट्रीय सप्ताह आला कीं सारा स्वातंत्र्याचा लढा डोळयांसमोर उभा राहतो. त्या सर्वांना प्रणाम करूं या. तें करुणगंभीर गाणें काय म्हणतें ?

दिन खूनके हमारे
प्यारो न भूल जाना

" अरे आमचें बलिदान विसरूं नका. किती मातींत गाडले गेले ? कोण गणना करील ? आमची आठवण येऊन दोन अश्रुबिंदु ढाळा. " असें तें गाणें आहे. तें आठवा. त्यांतील भावना सांठवा. हृदय निर्मळ करा. त्यांत भक्तिप्रेम भरा. आम्ही सारे एक ही भावना तेथें उचंबळो. तरच राष्ट्रीय सप्ताह मानला असें होईल. तीस कोटी आम्ही एक—असें मनांत प्रामाणिकपणें म्हणाल तर राष्ट्र उभें राहील. राष्ट्रच नसेल तर राष्ट्रीय सप्ताह तरी कोठला ? आपणांस नवें राष्ट्र निर्मावयाचें आहे. आपण शतखंड आहोंत. आज छिन्नभिन्न आहोंत. यांत प्राण ओतायचा असेल तर एकच अमृतरसायन आहे. तें म्हणजे ' हें राष्ट्र, या राष्ट्रांतील सारे माझे माझे ' ही भावना जीवनांत प्रतिक्षणीं अनुभवणें; ही भावना रोमरोमांत भरून ठेवणें. स्वामी

विवेकानंदांहून थोर धर्म-सेवक नि थोर राष्ट्रसेवक दुसरा झाला नाहीं. भारता-विषयीं त्यांना किती प्रेम ! ते एके ठिकाणीं लिहितात:

" भारत, भारताविषयीं मी काय सांगूं, काय बोलूं ? भारताची माती मला सोन्याप्रमाणें आहे. भारताचें सारें सारें मला प्रिय आहे. भारतांतील चांडाळ हा माझा भाऊ, भारतांतील पंडित माझा भाऊ, भारतांतील पागल माझा भाऊ. सारे माझे माझे. ही प्रिय भरतभूमि; आपल्या बाल्याचा ती पाळणा आहे; आपल्या कौमार्यांतील ती क्रीडाभूमि आहे; आपल्या यौवनांतील ती स्वप्नसृष्टि आहे; आपल्या वार्धक्यांतील ती वाराणशी आहे. भारत, प्रिय भारत, त्याची सेवा करायला, त्याला महान् स्थान प्राप्त करून द्यायला सारे उठा. तुम्ही सारे सिंहाचे छावे आहांत. सारी क्षुद्रता सोडा. सान्या भिंती पाडा. सर्वांना जवळ घ्या. या आध्यात्मिकतेंतून खरा भारत उभा राहील. नवराष्ट्र उभें राहील. तें तेजानें फुलेल, जगाला दिपवील. "

विवेकानंदांची भावनापूर्ण संस्फूर्त अशी ती वाणी ! ती पुन्हां आज तुमच्या सर्वांच्या कर्णरंध्रांत घुसो. आज त्या जळजळीत शब्दांची, भावनोत्कट वाणीची अत्यन्त आवश्यकता आहे. राष्ट्रीय सप्ताहाचें माहात्म्य ओळखून, आजची गंभीर घटना लक्षांत आणून आपण पाऊलें टाकूं या.



## हुतात्मास्मरण

आज १३ एप्रिलचा दिवस. जालियनवाला बागेंतील त्या अमानुष कत्तलीचा हा दिवस. १९१९ मधील महात्माजींच्या नेतृत्वाखालीं स्वातंत्र्याची चळवळ सुरू झाल्यावरचा पहिलाच तो प्रसंग. तें निष्पाप बलिदान झालें. आणि तें कोण विसरेल ? ब्रि. सरकारनें हंटर कमिटी नेमून त्या अमानुष हत्यांच्या पापाची सारवासारव केली. आणि काँग्रेसचे थोर कार्यकर्ते गंगा-तटाकीं गंभीरपणें जमून प्रतिज्ञा करते झाले कीं ब्रिटिश सत्ता नष्ट केल्याशिवाय आम्ही स्वस्थ बसणार नाहीं.

मी मागेंच सांगितलें होतें कीं महात्माजी या दिवशीं उपवास करीत. त्यांच्या जीवनांत इतकें महत्त्व या दिवसाला होतें. १६ एप्रिलच्या आजच्या या दिवशीं आपण सर्वच हुतात्म्यांचें कृतज्ञतापूर्वक स्मरण करूं या. ज्ञात, अज्ञात सारीं बलिदानें डोळ्यांसमोर आणूं या. त्यांना भक्तिप्रेमानें प्रणाम करूं या. आणि त्या हुतात्म्यांत महात्माजींचें महान् बलिदान मेरुमण्यासारखें शोभत आहे. जगाला सुधारणारे थोर हुतात्मे ! ज्यांनीं जीवनहि तिळतिळ रोज झिजविलें आणि शेवटींहि महान् समर्पण केलें. जगाला बलिदानांनींच माणुसकी थोडी फार दिली आहे. समाज प्रथम वक्रतुंड असतो. त्याला कोणताहि नवीन विचार द्या, नवीन प्रकाश द्या. त्याचें तोंड वांकडें असतें. परंतु ध्येयवादी लोक अपार निष्ठेनें, त्यागानें, दैनंदिन बलिदानानें समाजाला वक्रतुंडाच्याऐवजीं मंगलमूर्ति करूं बघतात. या सर्व हुतात्म्यांचे अपार उपकार. ज्यांनीं ज्यांनीं मानव-जातीला सन्मार्गावर आणण्यासाठीं अपार त्याग केला त्या सर्वांचें आज स्मरण करूं या.

वर्ध्याला, सेवाग्रामला गांधी सेवकांचा महान् मेळावा जमला होता. तेथें आचार्य कृपलानी म्हणाले, "हुतात्मा व्हायची तयारी ठेवा. महात्माजींचे अनुयायी होणें, त्यांच्या पाठोपाठ जाणें, म्हणजे हुतात्मा होण्याची, मरणाची तयारी ठेवणें." जगाला या वृत्तीची सदैव जरूर आहे. वस्तु सडूं नये म्हणून मीठ घालतात. त्याप्रमाणें समाज सडूं नये म्हणून स्वतःचे प्राण अर्पून समाज टिकवणारे हुतात्मे लागत असतात. जग अपूर्ण आहे. तें अपूर्णच राहणार आहे. मुंगीच्या पावलानें जगाची प्रगति होत असते. तींच तीं शिखरें पुन्हां चढावीं लागतात. मानवजात तेंच तें विसरते, पुन्हां मिळवूं बघते. यामुळें प्रगति फार अल्प होत असते. लोकशाहीसाठीं जग कित्येक शतकें लढत आहे. लोकशाही आलीशी वाटते. परंतु नवीन हुकूमशाह्याहि आलेल्या दिसतात. आजचें युग लोकशाहीचें कीं हुकुमशाहीचें ?

आज हिंदुस्थानांत काय दिसत आहे ? जगाचे कूट प्रश्न दूर ठेवूं या. या देशांत काय आहे ? आम्ही लोकशाही स्वराज्य यावें म्हणून लढलों. लोकशाही समाजवाद यावा म्हणून लढलों. लोकशाही समाजवाद यावा म्हणून मोठाल्या गप्पा मारीत आहोंत. परंतु आज प्रत्यक्षांत या देशांत काय अनुभवास येत आहे ? जे पक्ष हिंसेचीं ध्येयें समोर ठेवून याच देशांत सशस्त्र क्रांति करून सत्ता हातीं घेऊं पहात असतील त्यांचा प्रश्न दूर ठेवूं. कम्युनिस्ट, रा. स्व. संघ, यांचीं ध्येयें तशीं असतील तर त्यांना प्रचारस्वातंत्र्य, संघटनास्वातंत्र्य लोकशाही स्वराज्यांतहि देतां येणार नाहीं. कारण लोकशाही कारभार म्हणजे लोकांसमोर आपले कार्यक्रम मांडून, निवडून येऊन, तदनुरूप कायदे करण्याचा कारभार. कम्युनिस्ट किंवा आर. एस. एस., यांच्याविषयीं मी बोलत नाहीं. परंतु समाजवादी तर लोकशाहीनें, निर्मळ साधनांनीं जाऊं इच्छितात. त्या पक्षावर आज बंदी नसली, तरी त्यांच्या कार्यकर्त्यांना ठिकठिकाणीं बंदी आहे. कधीं त्यांना गुंड ठरवण्यांत येतें. असला फॅसिस्ट चावटपणा सुरू आहे. आश्चर्य हें कीं समाजवादी पक्षावर बंदी नसतां जी संघटना समाजवादी पक्षाची नाहीं तीहि बंद केली जाते. सेवादलासारखी थोर संस्था बंद केली जाते. असें कानांवर आलें कीं एक आपल्या प्रांतांतले बडे कॉंग्रेसवाले पुण्यास कॉंग्रेसदलाला बौद्धिक पाजतांना म्हणाले "सेवादलावर बंदी घालण्यांत आली. कारण तें समाजवादी पक्षाचें आहे आणि समाजवादी या सेवादलाला शस्त्रास्त्रें देऊन

राजसत्ता उलथून टाकणार आहेत. बंदी नाहीं घालायची तर काय ? " त्या कार्यकर्त्यानें सत्याला स्मरून जें बौद्धिक दिलें तें एका कॉंग्रेस पक्षीय पालकानें श्रद्धेनें ऐकलें. घरीं आल्यावर आपल्या सेवादलांत जाणाऱ्या मुलीला तो म्हणाला, " कां बंदी घातली विचारतेस ? यासाठीं बंदी घातली. " ती मुलगी पित्याला म्हणाली, " मग समाजवादी पक्षावरच आधीं कां नाहीं घातली ? " पिता निरुत्तर झाला, किंवा त्याला ऐकूं गेलें नसेल. अधिकाराच्या जागावर असणारे कॉंग्रेस कार्यकर्ते असें बेजबाबदारपणें कॉंग्रेसदलांत बोलत असतील तर फॅसिझम या देशांत झपाट्यानें सत्य अहिंसेच्या नांवानें येत आहे यांत संशय नाहीं. सेवादल ही एक शैक्षणिक संस्था आहे. ती आधीं सेवेला वाहिलेली. ती जातीयतेविरुद्ध म्हणून उभी राहिली. तिनें त्यासाठीं अपार कार्य केलें. अशा संस्थेला ही हत्यारी आहे किंवा होणार आहे असें बोलणें म्हणजे सत्याचा खून आहे. सेवादलानें फौज उभी करण्याचें ध्येय कधींच डोळ्यांसमोर ठेवलें नव्हतें. परंतु सेवादल बंद करण्याचें ठरवायचें आणि मागून असा अपप्रचार करायचा ही हिंसा आहे, हें असत्य आहे. मुंबईचीं टाइम्स वगैरे कांहीं इंग्रजी पत्रेंहि मोठा आव आणून लिहितात " सरकार पक्षपात कसा करणार ? " या इंग्रजी पत्रपंडितांना या आरामपंडितांना सेवादल संस्था काय, तिचें ध्येय काय, काय काम हीं मुलें करतात तें तरी माहीत असतें का ? म्हणे पक्षपात नको. कॉंग्रेस-दल मग कशाला ठेवलें आहे ? श्री. मुरारजी भाई म्हणतात म्हणाले " कॉंग्रेस दलाची कवाईत लष्करी नसते. " मग सेवादलाची असते वाटतें ? कांहीं तरी बोलायचें. कोणी म्हणाले " कॉंग्रेस दलाला केव्हांहि सांगूं बंद करा तर तें बंद होईल. " अहो मुरारजी, तुम्ही मेळाव्याला बंदी घातलीत, तर अपरंपार खर्च सोसूनहि इतक्या मुलांमुलींचा हिरमोड पाहण्याचें पाप पत्करूनहि तुमची आज्ञा पाळली. आपणांस आणखी कोणता पुरावा हवा ? कॉंग्रेसदल म्हणजे का तुमचें सरकार छाप दल ? कॉंग्रेस कमिट्या आणि सरकार हीं इतकीं एकरूप वाटतें ? सरकारी तेवढें ठेवायचें, बाकीचें मातींत लोटायचें, असें ठरवलेंत वाटतें ?

खरी गोष्ट अशी आहे कीं यांच्या कॉंग्रेसदलांत कोणी जाईना. राष्ट्रसेवादल बंद केल्याशिवाय कॉंग्रेस दल कसें भरभराटणार ? ज्याप्रमाणें रावळगांव, मनमाड वगैरे ठिकाणीं समाजवादी कार्यकर्ते दूर केल्याशिवाय राष्ट्रीय मजदूर संघाचें जमेना, तसेंच येथें सेवादल बंद केल्याशिवाय कॉं. दल वाढेना. कारण मुलांना

कोठेंतरी खेळायला जायला हवेंच. मुंबईतच सेवादलाच्या शाखा भरतनाशा होतांच तेथील मुलें कांहीं ठिकाणीं कॉंग्रेस दलांत जाऊं लागलीं. अशा रीतीनें सत्तेच्या जोरावर, कायदा व दंडुका यांच्या जोरावर इतर संस्था संघटना—त्या अहिंसक असल्या तरी, थोर कार्य करीत असल्या तरी दडपून आपल्या संस्था वाढवूं पहाणें, दृढमूल करणें, यालाच फॅसिझम म्हणतात. सेवादल हिंसावादी आहे असें म्हणणें म्हणजे दोरीला साप म्हणून धोपटण्याप्रमाणें आहे. परंतु कॉंग्रेसमधील मोठमोठ्या मातबरांनीं महात्माजी जातांच सत्य अहिंसेलाहि तिलांजलि दिली आहे. त्यांच्या डोळ्यांसमोर सत्ता आहे. आणि आज लोकशाही रीत झुगारून अहिंसक संस्थांना, सेवापरायण संस्थांना, नव पिढीला एकराष्ट्रीयत्वाची, सर्वैक्याची दृष्टि देणाऱ्या संस्थांना बंदी करित आहेत. महात्माजी असते तर अशा वेळीं सत्याग्रह करते, करायला सांगते.

आम्हांला का तीच वेळ येणार आहे? आमचा आत्मा तडफडत आहे. कोठवर या कडू गोळ्या आम्ही गिळाव्या? कोठवर हा लोकशाहीचा खून बघावा? कोठवर नागरिक स्वातंत्र्याचें अपहरण बघावें? हां, आम्हीं सशस्त्र बंडाचे पुरस्कर्ते असता तर गोष्ट निराळी. परंतु आम्ही अहिंसक आहोंत. सेवेला वाहिलेले आहोंत. असें शतदां सांगितलें तरी बंदी घातली जाते. आणि तुमचाच अपवाद कसा करायचा असें पुन्हां विचारलें जातें. आम्ही म्हणतों कीं, ज्या ज्या अहिंसक घटना आहेत, मुलांच्या मनोबुद्धीला वळण देणाऱ्या, मानवतेचें ध्येय शिकविणाऱ्या, त्या सर्वांना तुम्ही मोकळीक द्या. परंतु हें नसेल होत तर? तर आम्हांला महात्माजींनीं अमर मार्ग दाखविला आहे. त्यांनीं लिहिलें होतें कीं उद्यांच्या स्वराज्यांत अन्याय होतो असें दिसलें तर मी सत्याग्रह करीन, शान्तीनें करीन व शिक्षा भोगीन. फक्त समाजांत अशान्ति होणार नाहीं हें बघितलें म्हणजे झालें. युद्धाच्या ऐन काळांतहि महात्माजींनीं वैयक्तिक सत्याग्रह पुकारला. आज आपलें राज्य म्हणायचें. परंतु आपलें राज्यहि सदसद्‌विवेक बुद्धीची गळचेपी करील तर? अहिंसेचें सार्वभौम बंधन पाळणारे असूनहि गळचेपी होत असेल तर? तर हौतात्म्याचा सनातन मार्ग आहे. कॉंग्रेससरकारला कोणीतरी गंभीरपणें सांगण्याची वेळ आली आहे कीं हें आम्ही सहन करणार नाहीं. फॅसिझम हिंसेच्या रूपानें येवो कीं अहिंसेचें नाम जपत येवो. त्याला विरोध करणें, शान्ततेनें विरोध करणें, हाच १३ एप्रिलचा अमर संदेश आहे.



# शिक्षक नि शिक्षण–कांहीं विचार

पश्चिम खान्देशांतील माध्यमिक शिक्षकांच्या परिषदेस मी गेलों होतों. मी तेथें जें बोललों तें कदाचित् अन्यत्र येईल. परंतु त्याचा थोडा सारांश येथें देत आहें. शिक्षकांची संघटना सर्वत्र होत आहे. तिची जरूरहि आहे. संघटना असली म्हणजे प्रश्नांना निश्चितता येते. संघाच्या प्रमुखांजवळ बोलतां येतें. सरकारजवळ, संस्थेजवळ प्रतिनिधींमार्फत बोलतां येतें. कलियुगांत संघटनेचा मंत्र प्राचीन काळापासून देण्यांत आलेला आहे. तो मंत्र शिक्षक बंधूहि आचरूं लागले ही आनंदाची गोष्ट आहे. प्राथमिक शिक्षक प्रि. दोंदे यांच्या थोर नेतृत्वाखालीं संघटित झाले. माध्यामिक शिक्षकहि पोलादी संघटना बनवीत आहेत. शिक्षक आजपर्यंत दुःखें बोलले नाहींत. म्हणून त्यांच्याकडे लक्षहि दिलें गेलें नाहीं. परंतु ते कोठवर कळ सोसणार, उपासमार काढणार? कधीं न बोलणारे शिक्षकहि बोलूं लागले, मागूं लागले,. याचा अर्थ त्यांना जीवन अशक्यच झालें असा आहे. शिक्षक अमर्याद कधीं मागणार नाहीं. वाटेल तें मागण्याची त्याची वृत्तिच नसते. स्वभावानें, वृत्तीनेंच शिक्षक मर्यादशील असतो. म्हणून मला नेहमीं वाटत असतें कीं शिक्षक मागतील तें मोकळेपणें द्यावें. त्यांत काटछाट करूं नये. कधीं तोंड न उघडणाराहि मागतो आहे याचा आपण गंभीरपणें विचार करावा. प्राथमिक शिक्षक, माध्यामिक शिक्षक यांना सरकारनें निश्चिन्त करावें. उगीच इकडे तिकडे काटछाट करूं नये. शिक्षकसंघ जें मागेल तें द्यावें. घाटे परुळेकर योजनेनें हेडमास्तर नि इतर शिक्षक यांच्यांत दोन ध्रुवांइतकें अंतर पाडलें आहे असें शिक्षक म्हणतात. हेडमास्तरांना अधिक पगार असो. त्यानें शिकवण्या करणें योग्य नाहीं. परंतु

तो पगार वाटेल तितका नको. हेड मास्तर नि इतर शिक्षक यांच्यांत भेद पाडण्याचा तर हा डाव नाहीं ना? शिक्षकसंघ एकत्र येऊन काय तें ठरववील. माझें म्हणणें इतकेंच कीं शिक्षकांना संसार नीट चालो. त्यांची उपासमार संपो. त्याला ज्ञानोपासनेला थोडा वेळ मिळो.

प्राथमिक, दुय्यम तसेंच उच्च शिक्षकांची समाजानें प्रतिष्ठा राखली पाहिजे. ज्याच्या ताब्यांत मुलें सोंपवायचीं त्याच्याबद्दल पालकांना आदरबुद्धि हवी. आज ही भावना खेड्यांत वा शहरांत दिसत नाहीं. जनताच शिक्षकाविषयीं अनुदार, उदासीन नि आदर न दाखविणारी झाली तर मुलें तरी आदर कशीं दाखविणार?

शिक्षकानेंहि स्वतःची भूमिका उच्च ठेवली पाहिजे. तो खरा शिक्षक कीं जो जास्तींत जास्त पुढें गेलेल्या विचाराशीं नवीन पिढी नेऊन जोडतो. क्षुद्र नि कुरसलेले विचार नवीन पिढीला देणें पाप आहे. शिक्षकासमोर मानवतेचें ध्येय हवें. त्याच्याजवळ जातिभेद, धर्मभेद, प्रांतभेद असतां कामा नये. समोरचा मुलगा म्हणजे परमेश्वराचें प्रतीक, मानवतेचें प्रतीक असें वाटलें पाहिजे. शिक्षकांनीं अलीकडे जातीयता, धर्मान्धता मुलांत नेली. त्याची फळें आपण भोगीत आहोंत. शुक्राचार्यांनीं देवांच्या गुरूच्या मुलालाहि प्रेमानें जवळ घेतलें. केवढा थोर आदर्श! भारतीय शिक्षकांनीं ही थोर दृष्टि घेतली पाहिजे. मुलांसमोर महान् आदर्श त्यांनीं ठेवावा. खिस्त म्हणाला, "माझ्या लहानग्यांना बिघडवूं नका." लहान मुलांना तरी जातीयतेचीं विषारी इंजक्शनें देऊं नका. आपण सारे हिंदी ही भावना शिक्षकांनीं नवीन पिढीला दिली पाहिजे.

स्वातंत्र्य आलें आहे. नवराष्ट्र बनवायचें आहे. सर्वांना संधि मिळायला हवी. शिक्षणाची संधि तेव्हांच सर्वांना मिळेल जेव्हां सारेंच शिक्षण मोफत होईल. शिक्षकांचा पगार वाढावा म्हणून फी वाढवण्यांत येते. परंतु ती सात सात रुपये फी किती लोक देऊं शकणार? म्हणून श्रमणाऱ्यांच्या पिढ्यान्-पिढ्या श्रमतच असतात. शिक्षण मोफत करा. निश्चिन्त करा. पण पैसा कोठून आणायचा? श्रीमंतांवर शिक्षण कर बसवा. आजकाल गरीबाला जेवढी फी तेवढीच श्रीमंताला. प्राचीनकाळीं गरीब विद्यार्थी गुरूला फूल देई तर श्रीमंत लक्ष नाणीं अर्पी. आजच्या परिस्थितींत शिक्षण कर श्रीमंतांवर बसवा. उत्पादन साधनें राष्ट्रीय करून त्यांतील नफा इकडे आणा. कांहीं करा. परंतु शिक्षण मोफतच व्हायला हवें.

वर्धा शिक्षण पद्धति म्हणजे राष्ट्राला महात्माजींची थोर देणगी आहे. हें शिक्षण प्राथमिक शाळांतच असावें असें नाहीं तर त्यांतूनच दुय्यम शिक्षणहि विकसत जायला हवें. उद्योगांतून शिक्षण हें थोर तत्त्व आहे. कर्मांतूनच ज्ञान हा भारतीय संस्कृतीचा सिद्धान्त आहे. तुलाधार वैश्याला तराजूची दांडी धरून मनहि तसेंच सरळ राखावें असें आध्यात्मिक ज्ञान मिळालें. कर्मांतून आध्यात्मिक ज्ञान मिळतें, तद्वत् विज्ञानहि मिळालें पाहिजे. मुलांना कर्ममय, उद्योगमय करा. त्यांची इंद्रियें, हात डोळे उत्सुक असतात. त्यांना नवनिर्मिति करायची इच्छा असते. राष्ट्रांतील मुलांची सर्जनशक्ति आज शेंदोनशें वर्षें मारली जात आहे. वर्धा शिक्षण पद्धतीचा उत्तमोत्तम प्रयोग करूं लागलों तर चपळ, कुशल, तल्लख बुद्धीची नवीन पिढी तयार होईल. ही पिढी शोधबोध करणारी होईल. म्हणून शिक्षकांनीं हिंमतीनें हा प्रयोग उचलावा. जगाच्या शिक्षणशास्त्रांत भारतहि भर घालीत आहे असें करावें.

मी शिरपूरच्या माझ्या भाषणांत अनेक विचार मांडले होते. ते येथें कोठवर देणार? परंतु आमचे शिक्षक सांसारिक बाबतींत निश्चिन्त होऊन नवभारत निर्मायला, नवशिक्षणपद्धति हातीं घेऊन नवीन तेजस्वी, ध्येयवादी पिढी निर्मायला उभे राहोत हीच माझी प्रार्थना. सर्व प्रकारची उदासीनता, क्षुद्रता, संकुचितता झडझडून दूर फेंकून, मानवतेचा धर्म हृदयांत पुजून त्यांनीं नवीन पिढीला थोर ध्येयाची दीक्षा द्यावी. शिक्षकांवर फार मोठी जबाबदारी आहे. राष्ट्राला ते आकार देतात. ते जे विचार देतील, भावना देतील, तें भांडवल उद्यांचीं मुलें बरोबर घेऊन राष्ट्राचा पसारा मांडणार, राष्ट्राची मांडणी करणार. राष्ट्राच्या संसाराचा विचका होऊं नये म्हणून आपण सारेच जपूं या. शिक्षण शाळेंत मिळतें. घरींदारीं मिळतें. रस्त्यांत मिळतें. उच्चारलेला, लिहिलेला प्रत्येक शब्द परिणाम करीत असतो. प्रत्येक शब्द म्हणजे पेरणें आहे. या पेरणींतून मांगल्याचें, उदारतेचें, निर्भयतेचें, विशालतेचें, ज्ञानविज्ञानाच्या उपासनेचें भरपूर पीक येवो. अशी दृष्टि ठेवून आपण सारे बोलूं, लिहूं. कारण आपण सारेच शिकत असतों, शिकवीत असतों. आपण सारेच पेरणारे आहोंत. एकमेकांच्या मनोभूमींत पेरणारे. परंतु त्यांतल्यात्यांत शिक्षक हा या बाबतींत

फार मोठी पेरणी करणारा आहे. म्हणून त्याच्यावर अधिक जबाबदारी. ती तो पार पाडो नि त्याचीहि समाजांत प्रतिष्ठा वाढो, त्याची ददात दूर होवो. शिक्षक हा खरा भारतभाग्यविधाता. म्हणून शिक्षकांस माझे प्रणाम !



## कामगारांनीं निश्चित धोरण ठरवावें

मुंबईच्या म्यु. कार्पोरेशनच्या निवडणुका झाल्या. समाजवादीपक्षानें प्रथमच स्वतंत्रपणें निवडणूक लढविली. अनुभव नव्हता, प्रचारपत्रें हातीं नव्हतीं. मतदार आणायला मोटारी नव्हत्या. आणखीहि कांहीं महत्त्वाच्या ईश्वरी घटना झाल्या. तरीहि समाजवादीपक्षाला चांगलीं मतें मिळालीं. कांहीं ठिकाणीं त्यांनीं २ उमेदवार उभे न करतां एकच केला असता तर तो पहिल्या नंबरानें निवडून येता. असो. एकंदरींत पाहिलें तर कामगारांनीं समाजवादी पक्षास बऱ्यापैकीं पाठिंबा दिला. मुंबईतील कामगार समाजवादी पक्षाला अधिक मानतात, असें निःशंकपणें म्हणतां येईल.

परंतु कामगारांनीं सारी उदासीनता झडझडून फेंकली पाहिजे. निवडणुकीच्या वेळेस हजारों कामगार उदासीनच राहिले. या बाबतींत शे. का. फे. च्या लोकांचा कित्ता गिरवण्यासारखा आहे. मी शेंकडों ठिकाणीं पाहिलें आहे कीं शे. का. फे. चे लोक जास्तींत जास्त मतदान करतात. मागें खानदेशांत भुसावळला शेंकडा ९५ टक्के शे. का. फे. मतदारांनीं मतें दिलीं होतीं. त्यांच्यांतील स्त्रियाहि मताधिकार चुकवीत नाहींत. इतर सर्वांनीं हा धडा घेतला पाहिजे. समाजवादीपक्षाचे कांहीं उमेदवार तर अगदीं थोड्या मतांसाठीं पडले. हजारों मतदार कामगार घरींच राहिले वा कशाला जायचें असें म्हणत बसले. आपण गरीब जाहोंत. मोटारी आपल्याजवळ नाहींत. आपल्याला हातीं कारभार घ्यायचा आहे. अशावेळेस किती दक्षतेनें लक्ष द्यायला हवें बरें ?

माय भगिनी मतें द्यायला फारशा आल्याचें नाहींत. वयांत आलेल्या सर्वांना मताचा अधिकार मिळून अखेर काय उपयोग ? त्या हक्काचा जर आपण

कसोशीनें उपयोग न करूं तर दैव देतें नि कर्म नेतें असेंच म्हणावें लागेल. पांढरपेशी मध्यम वर्गीय जनता नि जागृत कामगार जनता मनावर घेईल तर सर्व ठिकाणीं बहुमत मिळवूं शकेल. परंतु ती महत्त्वाकांक्षा हवी. तळमळ हवी. नुसत्या गर्जना, घोषणा करून सत्ता हातीं येत नसते. गीता सांगते " दक्ष तो मोक्ष मेळवी. "

कामगारांनीं आतां तरी सावधान रहावें. त्यांनीं प्रथम एका गोष्टीचा स्वच्छपणें विचार करायला हवा. आपण कोणाला मानायचें? राष्ट्रीय मजदूर संघ आहे; कम्युनिस्ट आहेत; समाजवादी पक्षाशीं जोडून असणारी मिल मजदूर सभा आहे. आपण कोठें जायचें? याच्यापुढें धरसोड नको. नदी जरा इकडे तिकडे गेली तरी समुद्राच्या रोखानें ती जात असते. त्याप्रमाणें समाजवादी पक्षाशीं कधींमधीं शंभर टक्के न जुळलें तरी हाच पक्ष एकंदरींत हिंदी परिस्थितींत कल्याणकारक आहे असें कामगारांनीं मनाशीं निश्चित केलें पाहिजे. समाजवादी पक्षाची " भारतीय मजदूर पंचायत " अशा नांवानें अखिल भारतीय कामगार संघटना लौकरच उभी राहील. हिंदुस्थानांतील कामगार संघटना तिला जोडल्या जाव्यात.

कॉंग्रेसचेंच सरकार आणि कॉंग्रेसचाच राष्ट्रीय मजदूरसंघ. कामगार संघटना सरकारी तंत्राखालच्या नसाव्यात. कॉंग्रेसमध्यें पंडित जवाहरलालसारखीं व्यक्तिशः समाजवादी विचारसरणीचीं कांहीं माणसें असलीं तरी, आणि कॉंग्रेसची कागदी योजना पुष्कळशी राष्ट्रीयकरणाची असली तरी तें सारें कधीं व्हायचें हा प्रश्न आहे. प्रश्न ध्येयाचा नसून कधीं होणार हें सारें असा आहे.

कम्युनिस्ट पक्ष एका अर्थी स्वतंत्र नाहीं. रशियाच्या धोरणानुसार तो स्तुति–निंदा करील, पवित्रे टाकील. त्यांची पक्षनीतिहि लोकशाहीवृत्तीची नसते. हुकुमशाही प्रवृत्तीकडे त्यांचा कल. प्रचारतंत्रहि फॅसिस्ट असतें. त्यांत प्रांजलपणा, निर्मळपणा नि प्रामाणिकपणा तितकासा नसतो. एकदां एखाद्याला बदनाम करायचें ठरलें कीं त्या धोरणानुसार त्यांचीं सारीं चक्रें सुरू होतात. नेहमींच संप, मोड तोड झोड, असें धोरण असतें. म्हणून हा पक्षहि हिंदी परिस्थिति नि परंपरा यांना शोभेसा नाहीं. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या बाबतींतहि या पक्षानें अक्षम्य गुन्हे केलेले आहेत. विश्वासार्ह असा हा पक्ष वाटत नाहीं.

म्हणून शेवटीं समाजवादी पक्षच राहतो. हा पक्ष अजूनपर्यंत अपमान.

शिव्याशाप सोसून काँग्रेसमध्यें होता, अजून आहे. जोपर्यंत परसत्तेशीं लढा होता तोंपर्यंत एकजूट ठेवण्यासाठीं तसें करणें आवश्यक होतें. या पक्षाला महात्माजींचाहि आशीर्वाद होता. काँग्रेसचे नरेंद्रदेव वा जयप्रकाश यांना काँग्रेसनें अध्यक्षपद द्या अशी त्या महान् क्रांतिकारकाची अखेरची इच्छा होती. परंतु त्यांच्या थोर अनुयायांनीं स्वतःची स्वतंत्र बुद्धि वापरून राष्ट्रपित्याची इच्छा दूर सारिली. समाजवादी पक्षासमोर आज महान् प्रश्न आहे. चलेजावच्या ठरावाच्या वेळेस अशी भाषा ऐकूं येई कीं परसत्ता गेली कीं राष्ट्रसभेचें विसर्जन केलें जाईल. आर्थिक–कार्यक्रमभेदानुसार निरनिराळे पक्ष होतील. ज्याला बहुमत मिळेल तो कारभार करील. लोकशाही सुरू होईल. परंतु काँग्रेस बरखास्त होत नाहीं. पंडित नेहरूंच्या मतें आज बरखास्त करून कसें चालणार? हिंदी सरकार हवेंत का लोंबकळत रहाणार? शून्यावस्था ( व्हॅक्युअम ) निर्माण करणें चूक ठरेल. तेव्हां काँग्रेस संस्था सर्वव्यापी ठेवून तिच्या द्वारा सर्वत्र संबंध राखून तिच्या कक्षेंतलें म्हणून आजचें सरकार कारभार करील. आर्थिक बाबतींत काँग्रेस आस्ते कदम जाणार असें दिसतें. तडकाफडकी समाजवाद ती जाणूं इच्छित नसावी. कागदावर मांडील, परंतु कृति लांबणीवर पडेल. सरदारांनीं भांडवलवाल्यांना आश्वासन दिलेंच आहे. एक भांडवलदार परवां कलकत्त्यास म्हणाले, “वीस वर्षें तरी आम्हांस पूर्ण वाव द्या. समाजवाद्यांसमोर नमूं नका. अन्नापेक्षां राष्ट्राचें रक्षण महत्त्वाचें आहे. उपाशीं राहूं परंतु देशाचा बचाव व्हायला हवा. सरकारनें एक तर आम्हांला गुंडाळा कारभार सांगावें. नाहींतर वीस वर्षांची निश्चिन्ती द्यावी.” अशा परिस्थितींत समाजवादी पक्षानें दूर होणेंच बरें. काँग्रेसचे सभासद करून बहुमत करून घ्या हा मानभावी उपदेश निरुपयोगी असतो. कारण सभासद करायला पावतीं पुस्तकें मिळण्यापासून तों मतदान केंद्रें कोठें कोठें ठेवायचीं तोंपर्यंत अनंत अडचणी सत्ताधारी गट निर्मित असतो.

काँग्रेसची आर्थिक प्रश्नासंबंधींची दिरंगाई किंवा चलढकल समाजवादी पक्षास नको आहे. त्याप्रमाणेंच कम्युनिस्टांचें परधार्जिणें धोरणहि त्यांना नको आहे. समाजवादी पक्षाचा प्रचार निर्मळ, प्रांजळ असतो; प्रमाणिक असतो. लोकशाहीला ते मानतात. येतां जातां संप संप करीत नाहींत. जपून जातात. आलीच वेळ तर संप करतात. अशा रीतीनें हिंदी परंपरा, स्वातंत्र्येतिहास, कामगार किसानांचें कल्याण, त्यांच्या हातीं सत्ता यावी हें ध्येय अशा रीतीनें सर्व

बाजूनीं समाजवादी पक्ष निर्दोष आहे. अर्थात शंभर टक्के निर्दोषिता कोठेंच नसते. त्या त्या पक्षाची गति कोठें आहे, ध्येय काय आहे हें सामग्र्यानें पाहून त्याचें बरें वाईटपण ठरवावें लागतें.

म्हणून मुंबईच्या तमाम कामगारांना प्रार्थना कीं तुम्ही सारे समाजवादी पक्षाला मिळा. एक निष्ठा धरा, एक श्रद्धा धरा. चंचलत्व नको. मिल मजदूर सभेचे लाखों सभासद बना. गिरण्यांतून जे प्रतिनिधि निवडले जात असतात ते मजदूर सभेचेच निवडा. यापुढें एक ध्येय, एक आशा. समाजवादी पक्ष सामर्थ्यवान् करणें; त्याच्या कामगार संघटनेंत तमाम धंद्यांतील कामगार संघटनांनीं सामील होणें! निवडणुका आल्या तर एकजात सर्वांनीं समाजवादी पक्षाला मतें देणें; उदासीन न राहणें; हें यापुढें कामगार, शेतकरी सर्वांनीं ध्येय ठरवावें. म्हणजे आज ना उद्यां, पांच नाहीं तर दहा वर्षांनीं तरी श्रमजीवींच्या प्रतिनिधींच्या हातांत दिल्लीची किल्ली येईल. प्रान्ताप्रान्तांतीलहि कारभार येईल. परंतु हें व्हावें म्हणून अभंग निष्ठा हवी. ती नसेल तर सारें फोल आहे. मुंबईचा कामगार हिंदुस्थानचा मार्गदर्शक आहे. जें मुंबई करील तें उद्यां हिंदुस्थान करील. म्यु. निवडणुकीच्या निमित्तानें बरा आरंभ झाला. आतां संपूर्ण उत्साहानें संघटितपणें, निष्ठेनें, श्रद्धेनें, चंचलपणा टाकून समाजवादी पक्ष बलवान् करा, मजदूर सभा एकमेव प्रातिनिधिक बनवा हीच प्रार्थना—



## राष्ट्रसेवादलावरील बंदीचें राष्ट्रीय सप्ताहांतील महान् पुण्यकार्य

परवां रात्रीं राष्ट्रसेवादलावरील बंदीची बातमी हातीं आली. सरकारी प्रसिद्धि खात्याकडून पांच तारखेचें पत्र आहे. सहा तारखेस तो अमर राष्ट्रीय सप्ताह कालपासून सुरू झाला. त्यांत राष्ट्रीय उभारणीचीं पुण्यकर्मे करायचीं असतात. या राष्ट्रीय सप्ताहांत मुख्यत्वें दोन गोष्टी करा अशी कॉंग्रेसच्या अध्यक्षांनीं सूचना केली होती. गांधी राष्ट्रीय स्मारकनिधि जमविणें आणि जातीयतेचें वातावरण नाहींसें करून सर्वत्र सलोखा नि बंधुभाव उत्पन्न करणें. या त्या दोन गोष्टी. महाराष्ट्रांत, मुंबईत, बेळगांवकडे राष्ट्रसेवादल जातीयता दूर करण्याचें महान् कार्य करीत आहे. त्या सेवादलावरहि बंदी घालून मुंबई सरकारनें जातीयता दूर करणाऱ्या एका थोर संस्थेस मूठमाती दिली आहे. गेलीं सात वर्षें हें सेवादल सर्व देशभर जातीयतेचे विषारी वारे पसरवणाऱ्या संघीया संघटनेस तोंड देत आहे. महाराष्ट्रांत साठ सत्तर हजार नवतरुण, राष्ट्रीय वृत्तीचे, जातीयता न बाळगणारे उभे केले. ठायीं ठायीं संघाच्या लोकांकडून मार खाल्ला, डोकीं फोडून घेतलीं. परंतु अहिंसेचें स्वतःचें ब्रीद कधीं सोडलें नाहीं. राष्ट्रसेवादलाचे महाराष्ट्रावर अपार उपकार. एक नवीन पिढी निर्माण केली. पुण्याच्या एका शिबीरांत मागें सिंध, युक्तप्रांत, बिहार, मद्रास, येथूनहि स्वयंसेवक शिकायला आले होते. सिंधमध्यें सेवादलाच्या शाखा संघीयांचा मार खाऊनहि सुरू केल्या. मद्रासलाहि संघटना उभी केली. संघानें देशभर जें विषमय वातावरण निर्मिलें होतें, त्याला पायबंद हें थोर सेवादल घालीत होतें. तें सेवादल आज कॉंग्रेसमंत्री मातींत मिळवीत आहेत. केवढें राष्ट्रप्रेम, देशभक्तीचें केवढें थोर कर्म ! मुरारजी, प्रणाम, तुम्हांस अनंत प्रणाम !

सेवादलाच्या कार्याचा इतिहास लिहूं तर रामायण होईल. उन्हाळ्यांत कांहीं ठिकाणीं सेवादल सैनिक पाणी भरीत. कॉलऱ्यासारख्या साथींत सफाई करीत, टोंचण्याची व्यवस्था करीत. पुरांत, आगींत सर्वांच्या आधीं धांव घेत. कोठें त्यांनीं रस्ते दुरुस्त केले, गांवांतील पडकीं देवळें नीट केलीं; त्यांनीं वाचनालयें काढलीं, ग्रामसुधारसमित्या स्थापिल्या, रुग्णोपचारी उपकरणें ठेवलीं. हिंदुमुसलमानांच्या दंगलींत त्यांनीं प्राण धोक्यांत घातले. नाशिकला दुकानांतील माल रस्त्यांत फेंकला जात असतां सेवादल सैनिक तेथें निर्भयपणें जाऊन ती लुटालूट थांबविते झाले. मी किती इतिहास सांगूं? अस्पृश्यतानिवारणासाठीं शेंकडों व्याख्यानें त्यांनीं दिलीं, हजारों सह्या गोळा केल्या, सहभोजनें केलीं. सेवादलांत अनेक मुसलमान तरुणहि कार्य करीत आहेत. सेवादल म्हणजे राष्ट्राची मूर्ति, राष्ट्राची आशा. महात्माजींचीं ध्येयें प्रत्यक्षांत कोणी आणीत असेल तर सेवादल होय. त्या ध्येयानांच अधिक उत्कटपणें आचरतां यावें म्हणून तें स्वतंत्र झालें. महात्माजींच्या वधानंतर महाराष्ट्रांत, कोल्हापुराकडे दंगल माजली. मुंबईतहि थोडी अशान्ति होती. मुंबईतील कित्येक चाळींतील लोकांना वांचवण्याचें श्रेय सेवादलाला आहे. अनेकांना त्यांनीं सुरक्षितपणें पोंचवलें. पुण्यास ढमढेरे वगैरेंच्या घरांच्या आगी विझवायला सेवादल सैनिक उभे राहिले आणि गडहिंग्लजच्या बाजूला संघाच्या कार्यकर्त्यांवर जनता धांवून गेली असतां त्याला पाठीशीं घालून एका सेवादलाच्या वीरानें स्वतःच्या छातीवर लाठीचे घाव घेतले. त्यानें संघाच्या कार्यकर्त्यांचे प्राण वांचवले. सेवादलाचा तो वीर रक्त ओकत दवाखान्यांत पडला. सेवादलाच्या कामगिरीसारखी उज्ज्वल, उदात्त, जातिधर्मनिरपेक्ष सेवा कोणाजवळ आहे? परतुं आज बक्षीस काय मिळत आहे? संघाच्या लोकांनीं सेवादलास अनेक ठिकाणीं मारहाण केली. प्रत्यक्ष महात्माजींच्या वधाचेंहि त्यांच्यावर पाप. तरीहि महात्माजींच्या ध्येयास अनुसरून संघाच्या कार्यकर्त्यांना वांचवायला सेवादल सैनिक स्वतःच्या प्राणांची ढाल करतात. मुरारजी, बाळासाहेब, हें धैर्य कोठें बघाल, महात्माजींच्या ध्येयाची हीं कृतिमय पूजा कोठें कोठें पहाल ? आणि जी संस्था असे धडे देते तिला तुम्ही राष्ट्रीय सप्ताहाच्या पहिल्याच दिवशीं बंदी घातलीत ? प्रणाम, तुमच्या या दिव्य भव्य कर्माला अनंत प्रणाम !

शिरीषबाळ, नंदुरबारला तूं सेवादल चालवीत असस. तूं बंदुकीसमोर उभा

राहिलास. ज्या तुझ्या निष्पाप बलिदानानें सेवादल वंदनार्ह झालें, तेंच आज बंद केलें जात आहे. बाळ, स्वर्गांतून तूं अश्रू ढाळूं नकोस. महाडच्या कमलाकरा, तूंहि सेवादलांतील बाळ. आईबापांना तूं तें शेवटचें पत्र लिहून ठेवलेंस. झेंडा खालीं कर तुला म्हणाले. तूं म्हणालास "खालीं करण्यासाठीं हातीं नाहीं घेतला." तुला गोळी घालण्यांत आली. सेवादलास तूं बलिदानानें वाढवलेंस. तें तुझें थोर सेवादल आज गाडलें जात आहे. वाईट नको वाटून घेऊं बाळ. आणि तो सेवादलांतील इस्माईल.

तो मुस्लीम तरुण. तोहि चलेजाव लढ्यांत गोळीबारांत पडला. इस्माईल, रडूं नको. अल्ला सारें भलें करील. कुर्ल्याचा तो प्रभाकर! मुसलमानानें सुरा मारला तरी त्याच्या द्वेषाची भाषा मरतांना न बोलतां माझें सेवादल, सर्वांना जवळ घेणारें सेवादल, असें म्हणत तो गेला! प्रभाकर, तूं जातीय ऐक्याची मूर्ति होतास. तूं सेवादलाजवळ तो ध्येयवाद शिकलास. परंतु ज्या सेवादलाचें स्मरण करीत तूं प्राण सोडलास तें आज मातींत पुरलें जात आहे. रडूं नको, संतापूं नको. आम्ही धीरगंभीर रीतीनें सारें साहूं. स्वर्गांत तूं अस्वस्थ नको होऊं. किती तरी तेजस्वी मुलें, मुली माझ्या डोळ्यांसमोर येतात. जमखिंडीस हरिजन वस्तींत जाऊन हरिजन मुलींची वेणीफणी करून त्यांचें प्रेम जिंकून सेवादलाची तेथें शाखा चालवणाऱ्या त्या थोर मुली! परंतु तें सेवादल आज मुरारजी सत्य अहिंसेला स्मरून मातींत मिळवीत आहेत. केवढें सत्कर्म! मुरारजींना तें किती शोभून दिसतें!

सेवादल पक्षातीत आहे. काँग्रेसला तें आपुलें बाहुलें बनवायचें होतें. थोर ध्येयांना आचरण्यासाठींच सेवादल स्वतंत्र झालें. तेव्हांपासून श्री. शंकरराव देव, श्री. स. का. पाटील यांचा सेवादलावर राग. स. का. पाटील तर येरवड्यापासून म्हणत होते कीं सेवादल काँग्रेसच्या हुकमतीखालीं न आलें तर मी त्याची पाळेंमुळें खणून काढीन. परंतु सेवादलाची ध्येयनिष्ठा, सेवा, पाटलांच्या आढ्यांनाहि पुरून उरली. तें मरेना. तेव्हां राष्ट्रीय सप्ताहाच्या आरंभादिनीं कायद्याचा बडगा हाणून तें गतप्राण करण्यांत येत आहे. आज शंकरराव देवांना कृतार्थ वाटेल, आज स. का. पाटील मनांत पेढे वाटतील. जातीयतेचें विष दूर व्हावें, राष्ट्रपुरुषाच्या अंगांतील हा विषदाह शांत व्हावा म्हणून "आपण सारे एक" हा रामनामाचा नवा मंत्र राष्ट्रास शिकवणाऱ्या राष्ट्रसेवादलाला नष्ट

करूं पहाणें म्हणजे जातीयतेच्या राक्षसाला अमृतप्रदान करणें होय. आमच्या कॉंग्रेस मंत्र्यांना जातीयता हवी आहे वाटतें ? तीं तुमची कांग्रेस दल आतां तुफानी प्रचार करणार आहेत वाटतें ? अरे राष्ट्रीय सप्ताह येणार म्हणून मुंबईतील राष्ट्रसेवादलांतील सैनिकांनीं परीक्षा सांभाळून, मलमपट्टि कामें करून, पांच हजार " जातीयता नष्ट करा " हे सुंदर पोस्टर्स मुंबईभर चिकटवले. कोणी केलें हें काम ? पाटलांच्या कॉंग्रेसदलानें ? राष्ट्रीय ऐक्याचीं गाणीं, जातीयता नष्ट करा हीं प्रतीकें, सारा प्रचार, सेवादलाचे हजारों सैनिक करीत असतात. त्याला बंदी घालून, सरकारनें काय मिळवलें ? जरा म्हणावें अंतःकरण शोधा. कॉंग्रेस पक्ष म्हणजेच संपूर्ण सत्य नव्हे. इतरत्रहि सत्य आहे, सेवा आहे, अहिंसा आहे, जातिधर्मनिरपेक्ष थोर वृत्ति आहे. तुमच्या कॉंग्रेसजवळहि नाहीं अशी निष्ठा सेवादलाजवळ आहे. त्याला बंदी घालण्यानें तुम्हां सर्वांचें खरें स्वरूप मात्र प्रकट झालें. परवां प्रेस कॉन्फरन्समध्यें श्री मुरारजी म्हणाले, वाईट असेल तें दडपायलाच पाहिजे. परंतु सेवादल का वाईट होतें ? महाराष्ट्रभर जातीय ऐक्याचा, अस्पृश्यतानिवारणाचा संदेश विचारानें, उच्चारानें, आचारानें ज्या संस्थेनें सतत दिला ती संस्था का वाईट, पापरूप ?

सेवादलास मारणें म्हणजे महात्माजींना मारणें आहे. कारण सेवादल ज्या गोष्टींसाठीं महात्माजी तडफडत होते त्या गोष्टी आचरत होतें. अहिंसक रीतीनें प्रचार करणाऱ्या सर्वांस मोकळीक असावी असें महात्माजी म्हणत. परवां विनोबाजीहि तसेंच म्हणाले. सेवादलाहून या ध्येयानें जाणारी दुसरी कोणती संस्था आहे ? आणि ती संस्थाहि रद्द ठरवली गेली ? अरेरे, केवढा हा सरकारी अधःपात, केवढी ही क्षुद्र दृष्टि !

मी तर बेचैन आहें. वाटतें कीं जेथें थोर ध्येयवादी निर्मळ संस्था मातींत गाडल्या जातात तेथें जगायचें तरी कशासाठीं ? वाटे या कॉंग्रेसी वृत्तीचा निषेध करून मरून जावें. परंतु मरून काय ? या सेवादलाच्या हजारों मुलांमुलींबरोबर मलाहि दुःखवेदना अनुभवूं दे. सेवादलांतील मुलांमुलींनों, सुसकारे नका सोडूं. रडूं नका, संतापूं नका, उतावीळ नका होऊं. प्रिय एस्. एम्., किती संयमानें तुम्ही सेवादल चालवीत होतांत. सेवादल हें तुमचें बाळ. आज तुम्हांला अपार दुःख होईल. आंतर्प्रान्तीय शिबिर घ्यावें म्हणून धडपडत होतांत. तुम्हांला हे कोठें जागाहि मिळूं देत नव्हते. परंतु आतां साराच खेळ संपला.

अवहेलना करूं नये. परंतु येथें तर गुरुदेवांच्या शरीराचीहि अशी मानखंडना ! अरेरे, भारतमाते, तुझीं मुलें मानवाप्रमाणे कधीं वागूं लागतील ? नुकत्याच झालेल्या प्रश्नांतहि अपार राक्षसी प्रकार झाले. जिवंत माणसें जाळलीं गेलीं. माझे एक सेवादलाचे थोर कार्यकर्ते, त्यांचीं तीन माणसें जिवंत जाळलीं गेलीं. एक मित्र भेटला. त्याच्या वडिलांच्या डोक्यांत प्रहार केलेला. आम्ही मुसलमानांना नांवें ठेवत होतों. त्यांनीं कलकत्त्यांत, नौखालींत अत्याचार केले. आपणहि महाराष्ट्रांत जिवंत माणसें जाळीत आहोत ! पापाचे वांटेकरी एकाच धर्माचे लोक नसतात. वृक, व्याघ्र, रीस सर्व जातींत, सर्व धर्मांत, सर्व देशांत आहेत. हें सारें पाहिलें म्हणजे वाटतें कीं मानव अजून जंगलीच आहे. परंतु निराश होऊन तरी काय करायचें ? सारें पाप म्हणजे अज्ञान. अज्ञान दूर करायला ज्ञान आणायला हवें. आणि तें ज्ञान म्हणजे पुस्तकी नव्हे. तर जीवनांत मानव्याच्या रूपानें फुललेलें; व्यापक सहानुभूति, बंधुभाव याच्या रूपानें फुललेलें. म्हणून तुम्ही आम्ही सर्वांभूतीं भगवंत बघायला शिकूं या. सर्वांची प्रतिष्ठा सांभाळूं या. सर्वांचा स्वाभिमान राखूं या. प्रत्येक ठिकाणीं आत्मतत्त्व आहे. त्या आत्म्याचा अनादर नका करूं.

गुजराथेंत भडोचच्या सेवाश्रमांत डॉ. चन्दुलाल म्हणून थोर सेवक आहेत. ते पूर्वी विलायतेस शिकायला गेले होते. नाशिकच्या तुरुंगांत मला त्यांचा थोर सहवास घडला. ते एकदां मला म्हणाले, "गुरुजी, स्वातंत्र्याचा अर्थहि आपल्या लोकांस अजून कळला नाहीं." मी संतापून म्हटलें, "असें कां म्हणतां ? लाखों लोक स्वातंत्र्यासाठीं लढत आहेत, बलिदानें करीत आहेत. तरी का आम्हांस अर्थहि नाहीं कळला ?" ते शांतपणें म्हणाले, "रागावूं नका. इंग्लंडमधील एक गोष्ट सांगतों. मी शिकायला गेलों होतों. एका खोलींत रहात होतों. माझ्या शेजारच्या खोलींत दुसरा एक श्रीमंत हिंदी विद्यार्थी रहात होता. तिकडचा नाताळचा सण आला. त्या श्रीमंत विद्यार्थ्याकडे एक मोलकरीण कामाला येत असे. खोली झाडी, भांडीं घाशी. त्याच्या मनांत आलें कीं हिला कांहीं तरी द्यावें. सणाची देणगी. आपण शिमग्याचें पोस्त देतों त्याप्रमाणें. ती मोलकरीण काम करून जाणार होती. त्या श्रीमंत तरुणानें खिशांतून पांच शिलिंगाचें एक नाणें काढून तिच्यासमोर फेकलें. तो तिला म्हणाला, 'तुझा नाताळचा सण आहे. घे तुला.' ती मोलकरीण तशीच उभी

राहिली. खालीं वांकून तिनें तें नाणें उचललें नाहीं. ती त्या श्रीमंत नबाबाला म्हणाली " ते पैसे मला नकोत. मी गरीब मोलकरीण असलें तरी मला स्वाभिमान आहे. मी भिकारीण नाहीं. प्रेमानें मला जवळ बोलावून माझ्या हातावर एक दिडकी ठेवली असतीत तरी ती मी आनंदानें घेतली असती. परंतु कुत्र्यासमोर तुकडा फेंकावा, भिकाऱ्यासमोर कांहीं फेंकावें, त्याप्रमाणें माझ्यासमोर फेंकलेलें हें नाणें मला नको. " ती मोलकरीण निघून गेली. गुरुजी, इंग्लंडमधील मोलकरीणहि स्वाभिमान सांभाळायला शिकलेली आहे. परंतु आपल्याकडे ? बड्या लोकांना गरीबांस तुच्छतेनें वागवण्यांतच मोठेपणा वाटतो. आणि बड्यासमोर दीनवाणें उभें राहणें, त्यांनें फेकलेलें उचलणें, यांतच गरिबाला स्वधर्म वाटतो. हें सारें बदललें पाहिजे. व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाची कधींहि विटंबना होतां कामा नये. तुच्छतेनें देणारा आणि स्वाभिमानशून्यपणें घेणारा दोघेही मानवतेला पारखे आहेत. " " तुका म्हणे देतो । घेतो तोहि नरका जातो " दुसऱ्यास तुच्छ मानणाराहि नरकाचा धनी. आणि जो स्वतःला तुच्छ मानतो तोहि तसाच. गरिबी हा गुन्हा नाहीं. आत्म्याचें वैभव सर्वांजवळ आहे. म्हणून कोणी दीनवाणा नको. कोणी घमेंडनंदन नको. या देशांत गरिबांतल्या गरिबाचाहि स्वाभिमान सांभाळला जाईल तेव्हांच स्वातंत्र्याचा अर्थ समजूं लागला असें म्हणतां येईल.

खानदेशांत एकदां कॉटन असोसिएशनची बैठक होती. कापसाचा भाव ठरवायचा होता. इतर गोष्टी होत्या. त्या सभेंत व्यापारी, शेतकरी, सर्वांचे प्रतिनिधि असत. व्यापाऱ्यांच्या बरोबरीनें शेतकरीहि खुर्चीवर बसले होते. एक खुर्ची अजून रिकामी होती. एक बडे शेटजी यायचे होते. त्यांची सारे वाट पहात होते. आले एकदांचे शेटजी. परंतु तेथें शेतकरीहि खुर्चीवर बसलेले पाहून त्यांचें पित्त खवळलें. " येथें कुणबट्यांबरोबर मी बसूं कीं काय ? " असें ते म्हणाले. केवढा अहंकार ? कुणबी धान्य पिकवतो. कापूस पिकवतो. तो पिकवील तेव्हां तुम्ही व्यापार कराल नि कोट्याधीश कुबेर व्हाल. तो शेतांत राबणारा अन्नदाता शेतकरी, तो जगाचा आधार. परंतु त्याला आम्हीं तुच्छ मानतों. अरे, सर्वांना मान द्या. सर्वांची प्रतिष्ठा सांभाळा. समाजाची सेवा करणारे सारे पवित्र आहेत. परंतु शेती करणाऱ्याला मान नाहीं. काळेबाजार करणाऱ्याला मान आहे, त्याचे मरीन ड्राइव्हला बंगले आहेत. अरेरे, केवढें पाप आपण करीत आहोंत.

समाजसेवेचीं सारीं कर्मे, सेवेचे सर्व धंदे पवित्र आहेत. परंतु त्यांतल्या त्यांत दोन धंदे पवित्रतम आहेत. एक शेतकऱ्याचा नि दुसरा शिक्षकाचा. शेतकरी समाजाला धान्याची भाकर देतो, समाजाचा देह सांभाळतो: शिक्षक मनोबुद्धीचें खाद्य देतो; आंतरिक जीवनाला योग्य ती ज्ञानरूप, विचाररूप भाकर देतो. शेतकरी राष्ट्राचा देह सांभाळतो, शिक्षक राष्ट्राची मनोबुद्धि सांभाळतो. दोघे पवित्र, थोर. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं राष्ट्राच्या देहाची नि मनोबुद्धीची पुष्टितुष्टि करणारे शेतकरी नि शिक्षक दोघांचीहि समाजांत पायमल्ली होत आहे. शेतकऱ्याला, जो अन्नदाता, जगाचा मायबाप त्याला सारे हुटहुट करतात. वकिलाकडे तो सतरंजीच्या कडेला बसेल. कोर्ट–कचेरींत सारे त्याला दूर बसवतील. आगगाडींत त्याला जागा कोण देणार? वाङ्मयांत त्याच्या भाषेची, राहणीची टिंगल, तोच विनोद. शेतकऱ्याची ही दुर्दशा तशीच त्या शिक्षकाची. जो तुमच्या मुलाबाळांना माकडांतून मनुष्याकडे नेतो, त्या गुरुदेवांविषयी केवढी समाजांत अनुदारता! खेडेगांवांतील पंच पटकन् म्हणतात: "जा मास्तराला बोलव." मास्तर म्हणजे जणुं कचरा, कोणा झाडाचा पाला. प्राथमिक शाळा, माध्यमिक शाळा, यांच्या व्यवस्थापक मंडळांत व्यापारी, वकील, जमीनदार असायचे. शिक्षणशास्त्रांतलें त्यांना कांहींहि कळत नसतें. परंतु त्यांनीं येतां जातां शिक्षकांचा अपमान करावा! काय ही स्थिति! शिक्षकाला पगार नीट नसायचा. सर्वांनीं त्याचा अपमान करायचा. त्यानें पोटाला मागितलें म्हणजे त्याला सांगायचें, "तुमचा धंदा पैशासाठीं नाहीं. पवित्र धंदा तुमचा." परंतु पवित्र धंदा करणाऱ्याची मानखंडना करायला मात्र आम्हांला कांहीं वाटत नाही. कालिदासानें, त्या प्राचीन महान् कवीनें म्हटलें आहे:

"प्रतिबध्नाति हि श्रेयः पूज्यपूजाव्यतिक्रमः" म्हणजे पूजाऱ्यांची जर पूजा आपण केली नाहीं तर आपलें मंगल होणार नाहीं. भारतांत हेंच पाप आज होऊन राहिलें आहे. तुम्हां आम्हांला अन्नवस्त्र देणारे किसान कामगार, त्यांची आपण मान खालीं केली आहे. त्यांना ना मान, ना स्थान; त्यांची खालीं मान. आणि ज्ञानाची, विचाराची भाकर देणारा शिक्षक, त्यालाहि ना मान, ना स्थान. त्याला सर्वांत कमी वेतन, त्याचा उपहास. ज्या देशांत शेतकरी नि शिक्षक, कामगार आणि गुरुजन यांची कदर केली जात नाहीं, त्या देशाला भले दिवस कसे येणार?

सरकारनें शिक्षकांची ददात मिटवावी. त्यांना मागायला लावूं नये. कोट्य-वधि रुपये सरकार इतरत्र खर्च करतें. सारी काटकसर येते ती शिक्षकाच्याजवळ. प्राथमिक शिक्षक, माध्यमिक शिक्षक, त्यांना पुरेसें द्या. ते कांहीं त्यानें भांड-वलवाले नाहीं होणार. समाजानेंहि शिक्षकांना मान द्यावा. त्यांची बूज करावी, प्रतिष्ठा सांभाळावी.

शिक्षकांनींहि आपला थोर धर्म सांभाळावा. ज्याप्रमाणें त्यांचें व्यक्तिमत्त्व विटंबिलें जातां कामा नये. त्याप्रमाणें विद्यार्थ्यांचीहि त्यांनीं विटंबना करूं नये. त्याला शंख, टोणग्या, गद्धा, असें म्हणूं नये. माझ्या समोरचीं मुलें परमा-त्म्याचीं रूपें आहेत. त्यांच्यांतील चित्कला मला प्रकट करावयाची आहे, असें शिक्षकानें मानावें. मुलें म्हणजेच देवाघरचीं रूपें. शिक्षक पवित्र, मुलें पवित्र. " देवो भूत्वा देवं यजेत् " सर्वच पवित्र. मुलांचीहि उपेक्षा होत असते. तशी होऊं नये.

खरें म्हणजे समाजांत कोणाचीच अप्रतिष्ठा नको. सर्वांना मान द्या, सर्वां-जवळ गोड बोला, सर्वांना प्रेम द्या. परमात्मा सर्वत्र आहे. देहाच्या आंत जाऊन आंतील परमात्मा पाहणें म्हणजेच स्वतंत्र होणें. आपण बाहेरच्या गोष्टींना महत्त्व देतों, म्हणून मानापमान करतों. जेव्हां आत्म्याला बघूं तेव्हां सर्वत्र गोड असें वातावरण, एक थोर बंधुभाव निर्माण होईल. हिंदुस्थाननें ही दृष्टि घ्यावी. कोणाचाहि येथें उपमर्द नको. असें आपण करूं, असें वागायला शिकूं, तरच स्वातंत्र्याचा अर्थ कळला असें होईल. घरांतील गडी माणसें, भांडीं घास-णारी मोलकरीण सर्वांना मान द्या. त्यांना दूर बसवूं नका, कमी लेखूं नका. आपण सारे मानवतेचे उपासक होऊं या.



## नागरिक स्वातंत्र्य

बंगालमध्यें कम्युनिस्ट पक्ष बेकायदेशीर ठरविण्यांत आला आहे. पूर्व पंजाबमध्येंहि केला जाईल अशी वार्ता आहे. सर्वत्रच असें होईल असेंहि कोणी म्हणतात. पुष्कळ वर्षांपूर्वी कम्युनिस्ट पक्ष असाच बेकायदा होता. ज्या वेळेस त्याच्यावरची बंदी निघाली त्यावेळेस आचार्य नरेन्द्रदेव यांनीं पत्रक काढून आनंद व्यक्त केला होता. समाजवादी पक्षाच्या आचार्यांनी कम्युनिस्टांवरची बंदी निघाली म्हणून दुःख किंवा खेद न मानतां आनंद प्रगट केला. दहा वर्षांपूर्वीची ती गोष्ट आहे. समाजवादी पक्ष सर्वांना नागरिक स्वातंत्र्य असावें असें मानतो. अमक्याला असू नये असें तो मानीत नाहीं. भाई डांगे मुलाखतींत म्हणाले कीं समाजवादी पक्ष संकुचित धोरण ठेवीत आहे. कम्युनिस्ट पक्ष बेकायदा ठरविला जातो, तर त्यांना फारसें वाईट वाटत नाहीं अशा आशयाचें त्यांचें म्हणणें होतें. समाजवादी पक्षाचे अशोक मेहता यांनीं त्या बाबतींतील आपलें म्हणणें मांडलें आहे. मी समाजवादी पक्षातर्फे बोलूं शकत नाहीं. परंतु सामान्यपणें या संबंधी कांहीं विचार मांडूं इच्छितों.

ज्यांना ज्यांना नागरिक स्वातंत्र्य हवें आहे त्यांनीं कांहीं मर्यादा स्वतःला घालून घेतल्या पाहिजेत. स्वातंत्र्याची इच्छा म्हणजे स्वच्छंदीपणा नव्हे. संपूर्ण स्वातंत्र्य मिळाविलेला मुक्त पुरुष सर्वांहून अधिक बंधनें स्वतःवर घालून घेत असतो. परकी सत्ता आपण दूर केली आहे. देश स्वतंत्र झाला आहे. स्वतंत्र याचा अर्थ असा नाहीं कीं सर्वांचे संसार एकदम सुखाचे झाले आहेत. सर्वांचे संसार सु ाचे करायचे आहेत. अन्नवस्त्राची ददात दूर करायची आहे. सर्वांना विकासाची संधि मिळेल असें करायचें आहे. अन्नवस्त्र, घरदार, विश्रांति,

आनंद, ज्ञानविज्ञान, कला, हें सर्व सर्वांना मिळेल असें करायचें आहे. स्वराज्य म्हणजे साधन. स्वराज्याच्या साधनानें रामराज्य निर्माण करायचें आहे. परंतु कोणत्या मार्गानें ? आपण जनतेसमोर निरनिराळे कार्यक्रम ठेवूं. निरनिराळ्या योजना मांडणारे निरनिराळे पक्ष राष्ट्रांत असतील. या विविध पक्षांनीं त्या त्या योजनांनुसार प्रचार करावा. त्या योजना पुढें अमलांत आणतां याव्यात म्हणून संघटना करावी. उद्यां निवडणुका येतील तेव्हां जनतेसमोर उभें रहावें. बहुमत मिळालें तर योजनानुरूप कायदे करावे, रामराज्य आणावें. हा मार्ग लोकशाहीचा आहे. प्रचार-स्वातंत्र्य, भाषणद्वारा वा लेखनद्वारा प्रचार-स्वातंत्र्य, संघटना-स्वातंत्र्य, संचार-स्वातंत्र्य, हें सारें सर्वांना हवें, सर्व पक्षांना हवें. परंतु या सर्व पक्षांनीं अहिंसेचें एक सार्वभौम बंधन सत्यार्थानें पाळलें पाहिजे. आम्ही लोकशाही माननों. देशाच्या कारभारांत अहिंसक रीतीनें बदल घडवूं, अशी स्पष्ट कबुली सर्व पक्षांनीं द्यायला हवी. आपण स्वातंत्र्य मागतों, नागरिक स्वातंत्र्य मागतों, तेव्हां आपल्यावरहि जबाबदारी येऊन पडते.

हिंदी कम्युनिस्ट प्रामाणिकपणें कोणता मार्ग घेऊन जाऊं इच्छितात ? लोकशाही मार्गावर त्यांचा विश्वास आहे का ? आज हिंदी प्रश्न लोकशाही मार्गानें सोडवले जावेत, जनतेंत आपापल्या आर्थिक योजनांचा प्रचार करून, निवडून येऊन, त्या त्या योजना अंमलांत आणून सोडवले जावेत, असें कम्युनिस्ट पक्ष प्रांजलपणें मानतो का ? का कांहीं काळ तरी हुकुमशाहीच हवी आणि ती कामगार हुकूमशाही सशस्त्र क्रान्तीनेंच आणतां येणार आणि ती आम्ही आणणार असें मत आहे ? समाजवादी पक्षानें साधनांच्या विशुद्धतेवर भर दिला आहे. कम्युनिस्ट पक्ष अशी निःसंदिग्ध घोषणा करूं शकेल का ? आमच्यासमोर कामगार क्रान्तीचें ध्येय आहे. आम्ही वाटेल तीं साधनें वापरूं, वाटेल तसा प्रचार करूं, सशस्त्र बंड करूं. अशी त्यांची भूमिका आहे का ? असा ते प्रचार करतात का, करीत रहाणार का ? सशस्त्र क्रान्तीशिवाय समाजवाद येणें अपरिहार्य आहे असा प्रचार मुंबईच्या कांहीं कामगारांत, कांहीं कामगार तरुणांत, त्यांच्या बौद्धिकांत कम्युनिस्ट करीत नाहींत का ? कम्युनिस्टांवर बंदी असूं नये, तो पक्ष सनदशीर असावा, असा आग्रह नागरिक स्वातंत्र्याच्या भक्ताला तेव्हांच धरतां येईल, जेव्हां कम्युनिस्ट पक्ष आपली संघटना, आपलें प्रचारतंत्र, आपली भावि क्रान्ति लोकशाहीच्या अहिंसक साधनांच्याद्वारा कर-

ण्याची प्रांजळ कबूली देईल. आजच्या हिंदी सरकारला या गोष्टीची खात्री वाटत नाहीं. कांहीं काँग्रेसमंत्री समाजवादी पक्षाविषयींहि साशंक आहेत. तुम्ही सरकारला उखडण्यासाठीं सशस्त्र बंड करणार आहांत असें एका मंत्र्यानें खाजगी म्हणूनहि दाखविल्याचें ऐकिवांत आहे. परंतु नाशिकच्या परिषदे-नंतर तरी अशी शंका घेणाऱ्या मंत्र्यांचें समाधान कदाचित् झालें असेल. समाजवादी कार्यकर्त्यांच्या हालचालीवर नेहमीं नजर ठेवणें, त्यांचें टपाल तपासणे, या गोष्टी हेंच दर्शवितात कीं साधनांची विशुद्धि आणि लोकशाहीवरचा विश्वास पुनःपुन्हां समाजवादी पक्षानें घोषविला तरी आजच्या काँग्रेस सरकारचा त्याच्यावर विश्वास नाहीं. स्वतःची भूमिका मांडणाऱ्या समाजवादी पक्षाची जर ही दशा, तर ज्यांचें धोरण अंधारांत आहे त्यांच्याबद्दल अधिकच शंका येणार.

चीनमध्यें गेलीं वीस वर्षें चँग कै शेक नि कम्युनिस्ट यांची प्रत्यक्ष लढाईच सुरू आहे. महायुद्ध संपलें तरी त्यांची वर्षानुवर्ष चाललेली लढाई संपलेली नाहीं. चिनी कम्युनिस्टांनीं कांहीं कांहीं टापू सशस्त्र क्रान्ति करून आपल्या ताब्यांत घेऊन तेथें कम्युनिस्टी राजवट सुरू केली. अनेक प्रान्तांतून त्यांनी असे प्रकार केले. हिंदुस्थानांत तसा प्रयोग करावा असें कम्युनिस्टांच्या मनांत आहे का? तेच अखंड रक्तपात या देशांतहि सुरू व्हावेत असें मत आहे का? पश्चिम बंगालमध्यें असा खास प्रयोग करण्याचें घाटत आहे का? कलकत्ता आणि इतर उद्योगधंद्यांचा टापू, यांतील कामगारांच्या संघटना संपूर्णपणें ताब्यांत घेऊन, कामगारांना क्रांतीच्या आघाडीवर उभें करून, खेड्यांतील किसानांनाहि बंड करायला लावून, एक प्रकारें सशस्त्र उठाव करून राज्यसत्ता हातीं घेऊन पश्चिम बंगालमध्यें कामगारांची हुकुमशाही स्थापण्याचा मनोदय आहे का? हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांत असे सशस्त्र प्रयोग करून तेथें कम्युनिस्टी राज-वटी स्थापण्याच्या योजना कम्युनिस्टांजवळ आहेत का? थोडक्यांत हिंदुस्थान-चा चीन करायचा आहे का? सरकारला जर असा सुगावा लागला असेल, बंगाली सरकारला जर खात्रीपूर्वक असें कांहीं कळलें असेल, तर तें सरकार अशा पक्षाला नागरिक स्वातंत्र्य कसें देणार? कम्युनिस्टांचा नागरिक स्वातंत्र्या-वर विश्वास आहे का? ते कदाचित् म्हणतील कीं, "आमचा असो नसो. तुम्ही तर नागरिक स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते आहांत; तुम्ही स्वतःच्या ध्येयाप्रमाणें

वागा. आम्हांला स्वातंत्र्य द्या." त्यांना एवढेंच उत्तर कीं आम्ही नागरिक स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते आहोंत. परंतु एका अटीवर. अहिंसेचें सार्वभौम बंधन प्रामाणिकपणें स्वीकारणें. हें बंधन जो पक्ष पाळणार नसेल त्याला नागरिक स्वातंत्र्य नेहमींच मिळेल असें नाहीं."

१९४५ मध्यें एका जुन्या कसलेल्या कम्युनिस्ट कार्यकर्त्याजवळ बोलतांना तो शेवटीं म्हणाला, "उद्यां आमच्या हातीं सत्ता आली, आणि आमच्या कोणी विरुद्ध गेला तर आम्ही त्याला गोळी घालूं." हें त्या कार्यकर्त्याचें कदाचित वैयक्तिक मत असेल. परंतु संक्रमणकाळांत, आरंभींच्या हुकूमशाही काळांत जो कोणी विरोधी जाईल त्याची हीच गत होईल असें रशियाच्या क्रान्तीच्या इतिहासावरूनहि कळून येतें. आजचें काँग्रेस सरकार हुकूमशाही नसल्यामुळें गोळ्या घालीत नाहीं. तें तुमचा पक्ष बेकायदा ठरवतें. वेळ आली तर तुम्हांस स्थानबद्ध करील. अर्थात आजच्या स्टेटविरुद्ध सशस्त्र कट करून बंडच उभारलेंत तर त्यावेळेस काय होईल तो प्रश्न निराळा.

म्हणून ज्यांना ज्यांना नागरिक स्वातंत्र्य हवें आहे, संघटनास्वातंत्र्य हवें आहे. त्यांनीं त्यांनीं आपली भूमिका गुलदस्तांत न ठेवतां स्वच्छपणें मांडणें जरूर आहे, नुसतें नागरिकस्वातंत्र्याच्या नांवानें ओरडण्यांत अर्थ नाहीं. तो दंभ होईल. शिखंडीच्या पाठीमागें लपून अर्जुनानें बाण मारावे, त्याप्रमाणें हिंसात्मक चिथावणी देऊन किसान कामगारांना पुढें करावें, त्यांचे बळी द्यावे, त्या बलिदानाचें भांडवल करावें, आपण मागें राहून पुन्हां नागरिक स्वातंत्र्याच्या नांवानें अट्टाहास करावा, निरनिराळ्या प्रसिद्ध लोकांच्या सह्या मिळवून पत्रकें काढायला लावावीं, अन्याय होत आहे म्हणून बभ्रा करावा, ही नेहमींची कारवाई करण्यांत अर्थ नाहीं. साधनांची निर्मलता असावी हें तत्त्व ज्यांना मान्य नाहीं, ते अशा गोष्टी करणारच आणि नेहमीं करतातहि.

आपण निर्मळ असून, अहिंसक रीतीनें जात असून, लोकशाहीवरची श्रद्धा जोपवलेली असूनहि जर आपल्या नागरिक स्वातंत्र्यावर सरकार गदा आणील तर तें पाप होय. त्याच्या विरुद्ध सविनय कायदेभंगच वेळ आली तर करणें महात्माजींच्या शिकवणीप्रमाणें न्याय्य ठरेल. परंतु ज्यांची स्वतःची नागरिक स्वातंत्र्यावर श्रद्धा नाहीं, जे उद्यां सत्ता हातीं आली तर हुकूमशाही निर्मून दुसऱ्याला तें देणार नाहींत, आणि आजहि सशस्त्र क्रान्ति करण्याच्या ज्यांच्या

योजना आहेत, सशस्त्र क्रांतीवरच ज्यांचा विश्वास आहे, तदनुरूप जे बोलणार, वागणार, प्रचार करणार, त्यांनीं नागरिक स्वातंत्र्य कोणत्या तोंडानें मागावें, मागितलें तरी तें कसें मिळणार, आणि त्यांना मिळावें म्हणून लोकशाहीला नि साधनांच्या शुद्धतेला मानणारा मनुष्य तसा आग्रह तरी कसा धरणार ?

हिंदुस्थानांत तरी रक्तपात नकोत. महात्माजींसारखा महापुरुष म्हणजे एक प्रचंड बांध होता. ती थोर शक्ति, रक्तपाताला रोखूं शकणारी शक्ति आज नाहीं. आतां का येथें रक्ताळ क्रान्ति आणणार? नको. आपण दरिद्रनारायणाचें स्वराज्य आणूं. लोकशाही मार्गानें आणूं. सर्वांनीं अहिंसा नि लोकशाही हीं बंधनें घालून घ्यावींत नि पक्ष निर्मावे, प्रचार करावे.

या देशांत लाल क्रान्ति व्हायला नको असेल, हिंदुस्थानचा चीन व्हायला नको असेल, तर त्वरेनें समाजवाद अंमलांत आगला पाहिजे. कॉंग्रेस तर गोगलगायीच्या गतीनें जाऊं पहात आहे. म्हणून समाजवादी पक्ष उभा राहिला आहे. कॉंग्रेसपासून स्वतंत्र होऊन त्वरेनें समाजवाद आणावा म्हणून घोष करीत आहे. समाजवादी पक्ष लोकशाही मानतो. या देशांत रक्तपात नको असेल, हत्याकांडें नको असतील, आणि समाजवादहि लौकर यावा असें वाटत असेल तर देशांतील कामगारांनीं, शेतकऱ्यांनी समाजवादी पक्षाच्या भोंवतीं सर्व शक्तीनें उभें रहावें. समाजवादी पक्ष राष्ट्रव्यापक करावा, बलवान करावा, यशस्वी करावा. म्हणजे रक्तपात टळून देश झपाट्यानें समाजवादाकडे जाणें शक्य होईल. प्रभु करो नि या देशांत अहिंसेच्या लोकशाही मार्गानें समाजवाद प्रस्थापित होवो.



## महाराष्ट्रीयांचें कर्तव्य

महाराष्ट्रासमोर आज थोर कर्तव्य आहे. महात्माजींच्या वधामुळें आणि नंतरच्याहि लाजिरवाण्या नि क्रूर घडामोडीमुळें कितीहि आपण सारवा-सारव केली, मनाचें कृत्रिम समाधान केलें तरी कोठें तरी मोठा मानसिक रोग आहे यांत शंका नाहीं. आपण सारे हिंदी ही भावना आपल्याजवळ नाहीं. आर्थिक प्रश्न सोडवायचे असतील तर या स्वतंत्र देशांत लोकशाही मार्गानें ते सोडवणें हाच मार्ग आहे. त्यासाठीं जाळपोळी हा मार्ग नव्हे. शेतें कापणें हा मार्ग नव्हे. दुसऱ्याला भिकारी करून आपला संसार सुधारत नसतो. मनांतील द्वेषमत्सराचें तात्पुरतें समाधान होतें. उद्यां भाषावार प्रान्त झाले म्हणजे तेथें कोणी सत्ता चालवायची ? तेथें कां एखाद्या जातीची हुकुमत स्थापणार आहांत ? गरिबांची सत्ता येऊं दे. त्यांचे संसार सुखाचे करूं इच्छिणारा पक्ष बहुमतानें निवडला जाऊं दे. केवळ जात या शब्दाला अर्थ नाहीं. प्रत्येक जातींत जमीनदार, इनामदार, खोत, व्यापारी, धंदेवाले आहेत. माझ्या जातीचा श्रीमंत असला म्हणजे तो का पिळणूक करीत नाहीं ? तेव्हां केवळ जातीनें ओळखणें हा खरा मार्ग नव्हे. एका ध्येयानें प्रेरित होतील त्यांची एकजात. तुकाराम म्हणतात, "माझिये जातीचें मज भेटो कोणी" त्यांच्या मनांत तेव्हां का त्यांची जन्मजात होती ? बर्नार्ड शॉ महात्माजींना १९३१ मध्यें म्हणाले, "आपली दोघांची एक जात आहे." समान ध्येयाची मंडळी एका जातीची होते. मग ती ब्राह्मण, मराठा, हरिजन, कोणी असो. हिंदु असो मुस्लीम असो. आशियाई असो, अमेरिकन असो. महा-राष्ट्रांतील सर्वांनीं हा विचार घेतला नाहीं तर आपण चिखलांत रुतून बसूं.

मला वाटत होतें कीं ४२ च्या लढ्यांतील नवयुवक तरी सारे एका जातीचे बनतील. परंतु जुने लोक त्यांच्या भोंवतीं जातीय जाळीं गुंफतात. सत्ता, जागा, आमिषें दाखवतात आणि ही नवीन पिढीसुद्धां जातीय बनूं लागलेली पाहून वाईट वाटतें. परंतु आपणांस ही चाकोरी सोडल्यावांचून गत्यंतर नाहीं. महाराष्ट्र हें दिव्य कार्य करायला उभा राहील काय ?

आम्ही सारे जणुं संशयग्रस्त आहोंत. परस्पर विश्वास नाहीं. आमची दृष्टिच विषारी जणुं होऊन गेली आहे. मी मागें "पूज्य विनोबाजींनीं साताऱ्याकडे जावें. त्यानीं अश्रु पुसावे, प्रेमभाव पुन्हां निर्मावा" इत्यादि लिहिलें होतें. काल माझ्याकडे नागपुरचें १५ तारखेचें 'सुराज्य' आलें आहे. त्या सुराज्याच्या अंकांत श्री. मामा वरेरकर यांचें एक पत्र आहे. त्यांत ते म्हणतात साने गुरुजींना खात्रीनें माहीत आहे कीं आपलें कार्यस्थळ सोडून विनोबाजी कुठेंहि जाणार नाहींत. संत तुकडोजी महाराजांना हांक मारली असती तर संचार करणें हीच त्यांची वृत्ति असल्यानें ते धांऊन आले असते; आणि कामाला लागले असते. आणि तें तर त्यांना नको आहे."

संत तुकडोजी महाराज संचारार्थ आले तर तें मला नको आहे असें कां म्हणावें ? पू. विनोबाजींजवळ १९३२ पासून माझा जिव्हाळ्याचा संबंध म्हणून मी त्यांना हांक मारली. गुरुदेवमंडळाच्या अनेक शाखांच्या कार्यक्रमांना मागील वर्षी मी गेलेलों आहे. अनेकांशीं माझा परिचय आहे. परंतु श्री. संत तुकडोजी महाराजांची नि माझी गांठ नाहीं. मी नेहमीं संकोचानें दूर दूर राहतों. विनोबाजींना हांक मारली, मनांत आलें म्हणून. ते मागील वर्षी मला म्हणाले होते, "तुम्ही उपवास पंढरपूरसाठीं नका करूं. मी तुमच्याबरोबर हिंडेन." पुष्कळ वर्षांपूर्वी वर्ध्याच्या एका प्रवचनांत ते म्हणाले होते कीं "एखादे वेळेस माझ्या पायाला भिंगरी लागेल नि मी सर्वत्र हिंडेन." ते शब्द मनांत येऊन मी त्यांना लिहिलें. ते अशा संकटप्रसंगीं, विरोधी प्रक्षुब्ध वातावरणांत येतील अशी आशा वाटली म्हणून मी लिहिलें तें. लिहिण्यामधून संत तुकडोजी मला नकोत असा का अर्थ निघतो ? परंतु कोणाला काढायचाच असला तर काढोत. आज आम्ही हृदयें जोडण्यासाठीं म्हणून खटपटी करायच्या आहेत. आणखी काल्पनिक संशय वाढविण्यासाठीं नाहीं. हरिजन दौऱ्याच्या वेळेस प्रत्येक व्याख्यानांत मी संत तुकडोजी महाराज नि

त्यांचे अस्पृश्यतानिवारण कार्य याविषयीं बोलत असें. परंतु विनोबाजींजवळ १५ वर्षांचा परिचय म्हणून त्यांना 'या' म्हटलें. माझ्या मनांत दुसरा हेतु नव्हता, किल्मिष नव्हतें, त्यांत कारस्थान नव्हतें, डावपेंच नव्हतें. परंतु मी हें सांगून तरी काय होणार ? आपल्या मनांतील सत्य शेवटीं एक प्रभु जाणे. तोंपर्यंत सारे गैरसमज सहन करणें हेंच काम. सार्वजनिक जीवनांत गेंड्याच्या पाठीप्रमाणें सारे आघात सहन करणारें मन बनवावें लागतें. महात्माजींविषयींहि गैरसमज होत, तेथें मी कोण ? मी उपवास केला तोहि माझ्या मनांत असलेली भेदभावना जावी म्हणून. महाराष्ट्राला कलंक लागला असा शिक्का मीच मारीत नाहीं, तर सारी दुनिया मारीत आहे. कोणास तसें नसेल वाटत तर ठीक. परंतु माझा उपवास दुसऱ्या कोणाचें पाप दूर करण्यासाठीं नव्हता. मला लोक म्हणत, " प्रक्षोभ पेटला आहे. प्रचाराला जा." मी म्हणे, " आधीं मला स्वतःला आगींत घालून घेऊं दे. मी तरी संपूर्णपणें कोठें शुद्ध आहे ? " असो. प्रिय श्री. मामांना माझें नम्र सांगणें कीं, श्री. संत तुकडोजी महाराज यांच्याविषयीं माझी भावना पूज्यबुद्धीचीच आहे. प्रत्यक्ष परिचय नाहीं म्हणून मी त्यांना न लिहितां परिचित विनोबांना त्यांचे शब्द आठवून ते कदाचित हिंडतील असें वाटल्यावरून हांक मारली. त्यांत दुसरा कोणताहि हेतु नव्हता. असो. मामांचें विधान वाचून वाईट वाटलें म्हणून हे शब्द. माझ्या भावनांना प्रभु साक्षी आहे.

पंडित जवाहरलाल नेहरू परवां नागपूरला म्हणाले, "मंत्रिपद सोडून जातीय वादाला आह्वान देत मैदानांत यावें असें वाटतें. आज एक जात, एक धर्म असें म्हणून चालणार नाहीं. केवळ हिंदीच नव्हे तर जगाचे नागरिक व्हायला हवें आहे." पंतप्रधान जवाहरलाल यांच्या उद्गारांतील तळमळ आम्हीं आपलीशी करावी नि सारें वातावरण बदलून टाकावें. सर्व प्रांतिक सरकारांनीं जातीयता नष्ट करण्याचा प्रचार करावा. मध्य नि प्रांतिक सरकारांना या बाबतींत कितीतरी करतां येईल.

महायुद्धांत चर्चिलनें 'व्ही' म्हणजे व्हिक्टरी विजय या चिन्हाचा सर्वत्र केवढा प्रयोग केला. आगगाड्यांचे डबे, सरकारी कचेऱ्या, शाळा, सर्वत्र "व्ही" अक्षर रंगविलें जाई. आपणहि प्रचाराचा पाऊस पाडायला हवा. जातियता नष्ट करा. हम सब हिंदी—हीं ब्रीदवचनें सर्वत्र दिसायला हवींत.

सरकारी कागदोपत्रीं हीं वाक्यें लिहा. लिफाफ्यांवर हे शिक्के मारा. आगगाड्या कचेऱ्या, शाळा सर्वत्र " जातीयता म्हणजे मरण, राष्ट्रीयता म्हणजे जीवन; सारे हिंदी " अशीं वाक्यें रंगवा. सरकारला किती करतां येईल. व्यापाऱ्यांनाहि पुष्कळ करतां येईल. मिलवाल्यांच्या कापडावरच्या चित्रांत " जातीयता नको. हम सब हिंदी " असें असावें. दुकानांतून माल देण्याच्या पिशव्या त्यांच्यावर हा शिक्का असावा. लॉंड्रींतून कपडे गुंडाळणाऱ्या कागदावर "हम सब हिंदी " हा तारक मंत्र दिसू दे. आजकालचें हें आपलें रामनाम आहे. रामाचें नांव घेऊन शंकराच्या विषाची आग शांत झाली. तुमच्या आमच्या राष्ट्रीय जीवनांत जात्यन्धता, धर्मान्धता, यांचें जहरी विष भिनलें आहे. तें दूर करायला एकच तारक मंत्र आहे. आपण इतर सारें विसरून सारे हिंदी असें म्हणायला, अनुभवायला शिकूं या. अमुक आडनांव, अमुक जात असें आतां डोळ्यासमोर नको. आपली जात लिहायची झाली तर ' हिंदी ' असें सर्वांनी लिहावें. अतःपर व्यक्तिगत जातीच्या डबक्यांत भ्रमणें नको. आपण सारेच मानवतेचे उपासक होऊं या. जातिनिरपेक्ष ध्येयांचे उपासक होऊं या. उद्यां " असा असा आमचा आर्थिक कार्यक्रम आहे, मानवी मूल्यें मानणारा आमचा पक्ष आहे. ज्यांना पसंत पडेल ते या. " असें आपण घोषवूं. मग ब्राह्मण, मराठा, स्पृश्य, अस्पृश्य, हिंदु, मुसलमान कोणीहि त्यांत येतील. तुमचीं आमचीं ध्येयें जातिधर्मातीत कार्यक्रमाची असूं देत. म्हणजे जातिधर्मीय दृष्टि जाऊन ध्येयात्मक दृष्टि येईल. सर्वांच्या सुखासाठीं म्हणून आपण कार्यक्रम ठेवले म्हणजे सर्वांगिण दृष्टि येईल.

जातिनिरपेक्ष दृष्टि घेतल्याशिवाय समाजवाद कसा येणार? मला अमक्या जातीचें वर्चस्व नको असें मी म्हणतों, तेव्हां माझ्या जातीचेंहि कोणावर असतां कामा नये हा विचार माझ्या मनांत स्पष्टपणें जागृत हवा. नाहींतर हा त्याला तुच्छ मानतो. तो त्याला मानतो. याला अंतच राहणार नाही. आम्ही एकीकडे स्वातंत्र्याची भाषा बोलतों. परंतु बोलवा महाराला, दे म्हणावें लांकडें फोडून, अशी सत्ता गाजवण्यांत आपणांस अन्याय वाटत नाहीं. मिरासदारी कोणाचीच नको. सर्वांचीच मान आतां उंच होऊं दे. ही खरी तारक दृष्टि होय. आपण सर्वांनीं ती घेऊं या. समाजवाद तरच येणें शक्य होईल. नाहीं तर एकाचें वर्चस्व दूर होईल, तर दुसरा वर्चस्व गाजवील. म्हणून सावध रहा.

एक अन्याय दूर करतांना तुम्ही पुनः दुसऱ्यास कमी मानण्याचा तोच चढेलपणा करूं नका.

आपण सारे महात्माजींचें नांव घेतों, सत्य, अहिंसा, सहानुभूति यांचा उच्चार करतों, आणि द्वेषमत्सरांनीं भरलेलीं भाषणें करतों. अतःपर हें पुरे. महात्माजींच्या क्रूर वधामुळें क्षणभर संताप आला, तर क्षम्य आहे. तें जिवंतपणाचें लक्षणहि आहे. परंतु महात्माजींचें निमित्त करून द्वेषमत्सराचीं विषें पेरणें, पेरत रहाणें घोर पाप आहे. राष्ट्राच्या मंगलाची, महात्माजींसारख्या विभूतीं-च्या भक्तीची, सर्वांना न्याय मिळावा या थोर जाणिवेची जर खरी तीव्रता असेल तर आपण एका उच्च नि उदार वातावरणांत जाऊं या. महाराष्ट्रांतील नवयुवकांनीं तरी जुनीं बरबटें विसरून, नवीन ध्येयवादी झेंडा, जातिधर्मनिरपेक्ष सर्वांगीण विकासाचा झेंडा हातीं घ्यावा. अशा निर्मळ वातावरणांतून पुढें निर्मळ समाजवाद फुलेल, नवीन इतिहास निर्माण होईल.



## प्रार्थना म्हणजे बळ

जागतिक शांति संस्थेचें १९४९ च्या जानेवारींत हिंदुस्थानांत रवींद्रनाथांच्या शान्तिनिकेतन संस्थेंत पहिलें अधिवेशन भरावयाचें आहे. "जगांत शान्ति असावी, पूर्व आणि पश्चिम यांनीं एकत्र यावें, राष्ट्रधर्म विश्वधर्माशीं विसंवादी नसावा, राष्ट्रधर्म जर अन्य राष्ट्रांना गुलाम करूं पाहील, दुसऱ्या राष्ट्रांचें रक्तशोषण करील, तर तो राष्ट्रधर्म शापरूप आहे, अशा चढाऊ, लढाऊ राष्ट्रधर्माची उपासना करणें म्हणजे पाप होय. महर्षि टॉलस्टाय म्हणे कीं, पुढील काळांतील जनता अशा राष्ट्रधर्माचे आपले पूर्वज कसे काय उपासक होते असें मनांत येऊन आश्चर्य प्रकट करतील." असें कविश्रेष्ठ रवींद्रनाथांनीं राष्ट्रधर्मावर व्याख्यानें देतांना जपानमध्यें २५।३० वर्षांपूर्वीच सांगितलें होतें. रवींद्रनाथांनींच संकुचित राष्ट्रवादाविरूद्ध प्रथम थोर वाणी उच्चारली. कोणत्याहि प्रकारची संकीर्णता, संकुचितता त्या विश्वकवीला सहन होत नसे. त्यांच्या संस्थेचें शान्तिनिकेतनचें विकसित स्वरूप म्हणजे विश्वभारती संस्था. शान्ति हवी असेल तर भारतानें विश्वाशीं प्रेमाचे संबंध राखावे. भारतानें आक्रमक नसावें. जगाशीं सहकार्य ठेवावें. ही जशी रवीन्द्रनाथांची शिकवण, तद्वतच महात्माजींचीहि होती. महात्माजी राष्ट्रधर्माचे उपासक दिसतात. भाई मानवेन्द्रनाथ रॅाय यांनीं अनेकदां म्हटलें आहे कीं महात्माजी राष्ट्रवादी होते. परंतु श्री. रॅाय ध्वनित करीत असत त्याप्रमाणें महात्माजींचा राष्ट्रवाद संकुचित नव्हता. आपण स्वतंत्र झाल्याशिवाय जगाच्या सहकार्यांत भर कशी घालणार? मला मुक्त होऊनच इतरांशीं मोकळेपणानें वागतां येईल; जगांतील इतर लोकांच्या जीवनाला सुखी सुसंवादी करण्याच्या कामीं थोडें फार कांहीं करतां येणें

शक्य होईल. महात्माजी कोणत्याहि राष्ट्राचा द्वेष नव्हते करीत. चलेजाव ठरावाच्या वेळेस ते म्हणाले, "मी पुनः पुन्हां माझें अंतःकरण तपासून पाहिलें कीं इंग्रजांच्या विषयीं तेथे द्वेष आहे कीं काय ? मला दिसला नाहीं. त्यांच्याविषयीं माझ्या मनांत प्रेमच आहे. त्यांनीं परकीयांच्या रक्तशोषणाच्या पापांतून मुक्त व्हावें, हीच माझी तहान आहे." अशा अर्थाचे त्यांचे शब्द असत. सकळ मानवांविषयीं त्यांना आपलेपणा वाटे. चले जाव ठरावाच्या वेळेस चँग कै शेकला लिहिलेल्या ऐतिहासिक पत्रांत ते म्हणतात, "चिनी स्वातंत्र्याचा बळी देऊन हिंदुस्थानला स्वातंत्र्य नको आहे. हिंदुस्थान स्वतंत्र होणें म्हणजे चिनी स्वातंत्र्यालाहि मोठा आधारच मिळाल्यासारखें होईल." असें त्यांनीं लिहिलें होतें. ते १९३१ च्या गोलमेज परिषदेच्या वेळीं विलायेंतत गेले असतांना एका प्रश्नाला उत्तर देतांना म्हणाले, "या जन्मीं सर्व मानवांवर मला प्रेम करूं दे. पुढील जन्मीं सर्व मानवतेवर सृष्टीवरहि करीन." महात्माजी प्रेमसमुद्र होते. हें विश्वाचि माझें घर अशी त्यांची वृत्ति होती. सारे भेद, राष्ट्रभेद, धर्मभेद, संस्कृतिभेद, भाषाभेद त्यांच्या महान् जीवनांत जिरून जात. सर्वांचें तेथें एक अमृतमय अद्वैत बने. कविवर गुरुदेव रवीन्द्रनाथ आणि भारतात महात्माजी दोघे विश्वभारती होते. भारतीय असून अतिभारती होते. जागतिक ऐक्याचे ते पुरस्कर्ते होते.

त्या गुरुदेवांच्या विश्वभारतींत जागतिक शांति परिषदेचें पहिलें अधिवेशन भरावयाचें आहे. अजून दहा महिने त्या गोष्टीला आहेत. महात्माजी आणि गुरुदेव दोघेहि पार्थिव रूपानें आज नाहींत. परंतु दोघांचे महान् आत्मे तेथें असतीलच. या अधिवेशनासंबंधीं महात्माजींना अपूर्व आस्था होती, अपार गोडी होती. आणि या परिषदेच्या एका कार्यकर्त्याला त्यांनीं मृत्यूच्या आधीं थोडे दिवस लिहिलें होतें : "सर्व जगांत दररोज ठराविक वेळीं आपण थोडी प्रार्थना केली तर ? मनानें एकत्र आलों तर किती सुंदर होईल."

महात्माजींच्या या इच्छेचा उल्लेख करून जागतिक शान्ति परिषदेचे चिटणीस श्री होरेस अलेक्झांडर यानीं सुचविलें आहे कीं "प्रतिदिनीं सायंकाळीं पांच वाजतां पांच मिनिटें तरी सर्व जगांतील शान्तिप्रेमी लोकांनीं प्रार्थना मनांत करावी. महात्माजींच्या आत्म्याशीं समरस व्हावें." किती सुंदर होईल !

जगांतील शांतिप्रेमी जीव त्या वेळेस मनानें एकत्र येतील. पांच वाजतां

आपण जेथें असूं तेथें अन्तर्मुख व्हावें. याक्षणीं सर्व जगांत कांहीं समानधर्मी व्यक्ति शान्तीसाठीं प्रार्थना करीत आहेत, सर्व बाह्य भेद, उपाधि विसरून सर्वव्यापी आत्म्याचें दर्शन करीत आहेत, असा महान् अनुभव आपण घेऊं, अशी थोर जाणीव आपण अनुभवूं असे उत्कट शान्तीचे भक्त जागतिक ऐक्याचे भावि निर्माते होतील. एकीकडे जगाचा पुन्हां संहार करणारीं अणु-गोळ्याप्रमाणें अतिनाशी शस्त्रें गोळा केलीं जात असतां दुसरीकडे या जगाचा बचाव व्हावा म्हणून आत्मशक्तीचे प्रयोग करणारे हे शान्तिदूत मनानें एकत्र येऊन धडपडत राहतील. प्रार्थना करतील कीं मानव हा दानव न होवो? सारे सहिष्णु होवोत. जगांत सहकाराचा, स्नेहाचा प्रेमधर्म येवो.

प्रार्थना म्हणजे बळ, प्रार्थना म्हणजे शक्ति. आपणांस त्या वेळेस दुर्बलपणा वाटतो, ज्या वेळेस आपण एकटे आहोंत असें आपणांस वाटतें. परंतु विश्वाच्या आत्म्याशीं स्वतःला जोडल्यावर निर्बलत्व जाऊन सामर्थ्याचा प्रत्यय येतो. मग तुकाराम महाराजांप्रमाणे

"बळीयाचे आम्ही असों बलवंत"

त्या बलवंत प्रभूचे आम्ही असल्यामुळे आम्हीहि बलवंत आहोंत असें निःशंकपणे मनुष्य म्हणूं शकतो. 'राम हें दुर्बलाचें बल आहे' याचा अर्थ हाच की ज्या क्षणीं तुम्ही जीवनांत राम आणाल, क्षुद्रता फेंकून विश्वंभराशीं, जगाशीं, मानवतेशीं स्वतःला जोडाल त्याक्षणीं एका नवीन शक्तीचा तुम्हांला प्रत्यय येईल. तुम्हांला मग अपार आत्मविश्वास वाटेल. प्रार्थनेंत ही जादु आहे. प्रार्थना म्हणजे क्षुद्र अहंचा बुडबुडा अनंतात मिसळून अनन्त होणें. म्हणून महात्माजींसारखे थोर पुरुष प्रार्थनेला अपार महत्व देत. प्रार्थना म्हणजे जगदंबेच्या, जगन्मातेच्या कुशींत शिरून येणें, तिचा आशीर्वाद घेऊन येणें. त्यावेळेस आपण क्षुद्रता विसरतों, द्वेषमत्सर विसरतों, एका महान् जीवन-सिंधूंत आपण डुबत राहतों. अनंतात रंगतों. जीवनांत प्रतिदिनीं पांच मिनिटेंच का होईना असा अनुभव आला तर ती अति मोलाची वस्तु आहे. "स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्"

पंढपूरच्या माझ्या उपवासाच्या वेळेस पूज्य विनोबाजींनीं उपवास करूं नका असें मला लिहिलें होतें. त्या पत्रांत ते लिहितात, "मी हिंदु धर्माचा फार सूक्ष्म अभ्यास केला आहे. हिंदु धर्म कोणाला हुतात्मा होऊं देणार नाहीं. हिंदु

धर्म क्षुद्रता टाकील. सॉक्रेटिस, ख्रिस्त, यांना हुतात्मा व्हावें लागलें. परंतु मला अति नम्रपणें म्हणावेंसें वाटतें कीं सॉक्रेटिस, ख्रिस्त, यांच्या जीवनांतहि थोडी हिंसा जणूं सूक्ष्मरूपें होती. ते लोकांवर संतापत. चिडत; कधीं जनतेचा ते उपहास करीत, क्वचित शापवाणीहि त्यांच्या मुखांतून बाहेर पडे. परंतु भारतीय संतांजवळ केवळ शान्ति. ज्ञानेश्वर, एकनाथ वगैरे संतांचे उद्गार पहा. कधीं जळफळाट नाहीं. सारी सहिष्णुता." अशा अर्थाचें पू. विनोबाजींनीं मला लिहिलें होतें. परंतु हिंदु धर्मानेंहि आज महात्माजींना हुतात्मा केलें. विनोबाजींच्या महान् आशेला, भारतीय संस्कृतिविषयींच्या त्यांच्या थोर कल्पनेला केवढा धक्का आज बसला असेल! मी हल्ली विचार करीत असतों व पू. विनोबाजींच्या पत्रांतले शब्द मला आठवतात. सर्वत्र शांतीचें, प्रेमस्नेहाचें वातावरण हवें असेल तर आपली वाणी, आपली लेखणी कधींहि शापरूप तोहां कामा नये. जपून तोलून बोललें पाहिजे, लिहिलें पाहिजे. नाहींतर सेवा होण्याऐवजीं हेवाच आणखी वाढावयाचा. आपल्या हातून भलें व्हावयाऐवजीं आपल्या अहंकारी भाषेमुळें अधिकच जखमा व्हावयाच्या. भेद कमी होण्याऐवजीं वाढायचे, द्वेषमत्सर अधिकच खोल जायचे, दृढमूल व्हायचे. म्हणून आपण जपून जाऊं या. जागतिक शान्तीसाठीं पांच मिनिटें तरी जगाचे नागरिक आपण होऊं या. महात्माजी विश्वाचें हृदय झाले होते. आपण प्रतिदिनीं तो थोर अनुभव घेऊं तर आपलें वैयक्तिक जीवन, सामाजिक नि राष्ट्रीय जीवन शुद्ध होत जाईल.. आपल्या जीवनाला निराळाच सुंदर रंग चढेल. प्रभु करो नि माझ्याकडून तरी यापुढें जपून लिहिणें बोलणें होवो. कर्तव्याचा आवाज निर्भय परंतु नम्र नि निरहंकारी असा असो. संकल्प पार पाडणें प्रभूच्या हातीं.



## जिवंत सत्य

राष्ट्राची कधीं भरून न येणारी अशी हानि झाली आहे. आणि हिंदी जनता त्यामुळें साहाजिकच शोकांत बुडून गेली आहे. गेलीं तीस वर्षें महात्माजींनीं दिलेल्या प्रकाशांत आपण पाउलें टाकीत होतों. परंतु तो मार्गदर्शक, तो सर्वांना सांभाळणारा, चुकणाऱ्या कोंकरांना पुन्हां सत्पथावर आणणारा आतां आपणांत शरीररूपानें तरी नाहीं. आतां आपण दुःख आंवरलें पाहिजे. चुनाविटांचीं मोठमोठीं स्मारकें उभारण्यांतच दंगून नाहीं जातां कामा. दगडी स्मारकांपुरतीच आपली भावना आहे का? आपल्या भावना अधिक खोल हव्यात, गंभीर हव्यात. गांधीजींनीं तुमच्या आमच्या हृदयांत जो दिवा प्रज्वलित करण्याचा सदैव उद्योग केला, तो दिवा पुढें कसा तेवत राहील याचा विचार केला पाहिजे.

गांधीजीनीं शतविध मार्गांनी राष्ट्राचा संसार समृद्ध केला. त्यांच्या त्या महान् सेवामय जीवनाचे घसे बसेपर्यंत आपण पोवाडे गाऊं. आपण नवीन संस्था उभारूं. गांधीजींची स्मृति त्या संस्थांतून कोंडून ठेवूं. नवीन स्मृतिशास्त्रें रचूं. नवीन सरकारी सत्तेच्या पाठिंब्यानें लढाऊ चढाऊ गांधीवादी कार्यक्रम म्हणून सर्वत्र उभा करूं. किंवा त्यांच्या नांवानें विरुद्ध पक्षीयांशीं युद्धहि पुकारूं. महात्माजींची सदिच्छा आपल्यासाठीं होती असे म्हणणारे वारसदार सर्वत्रच दिसूं लागतील. परंतु गांधीजींनीं जीं नवीन मूल्यें जीवनांत आणण्यासाठीं सारें जीवन दिलें, त्यांची जबाबदारी शिरावर कोण घेणार? त्यासाठीं त्याग करायला कोण उभा राहणार? त्या मूल्यांसाठीं गांधीजींना सतत झगडतच रहावें लागलें. मी गरिबांचा बोजा कमी करीत आहें, धडपडणाऱ्या जीवांना

नवीन आशा देत आहे, असें गांधीजींना वाटे आणि तेंच त्यांचें बक्षीस होतें.

संघटित प्रतिकाराशीं अविरत झगडून गांधीजी जीं नूतन मूल्यें मानवी जीवनांत आणण्यासाठीं धडपडत होते, तीं कोणतीं? आज ज्या गोष्टींवर समाज आधारलेला आहे, राजकारण वा अर्थकारण यांतील ज्या गोष्टी गृहीत धरल्या जातात, त्यांना गांधीजींनीं सर्व शक्तीनें आह्वान दिलें. गांधीजींच्या आह्वानापाठीमागें कोणतें सत्य होतें? ज्या सत्यासाटीं गांधीजी जगत होते, झगडत होते, तें सत्य आपण उराशीं न धरूं तर गांधीजींची स्मृति आपण अमर कशी करूं? हिंदी स्वातंत्र्याची भव्य इमारत ज्या गोष्टीवर ते उभारूं इच्छित होते ती कोणती?

गांधीजींची हत्या करणारा मनुष्य नव्हता. गांधीजी प्राण गेला तरी सत्य सोडणार नाहींत ही गोष्ट त्या मारेकऱ्याला माहीत होती. गांधीजींनीं तुमच्या आमच्या जीवनावर जो प्रकाश पाडला तो नाहींसा करण्यासाटीं कटवाले अधीर होते. गांधीजींना त्यांच्या मार्गापासून आपण रेंसभरहि परावृत्त करूं शकणार नाहीं ही गोष्ट खुनी मनुष्य पुरेपूर जाणत होता. या भूमींत जो मार्ग सिद्ध करण्यासाठीं, रूढ करण्यासाटीं गांधीजींनीं अविरत श्रम केले, तो मार्ग बुजवण्यासाठीं, लोकांना विमार्गगामी करण्यासाठीं, गोंधळ माजविण्यासाठीं, अंधार पसरण्यासाठीं, तो खुनी मनुष्य उभा होता. त्या आशेनें तो खून करायला तो प्रवृत्त झाला होता. खुनी विजयी झाला कीं गांधीजी? या प्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं प्रत्येक स्त्री-पुरुषानें स्वतःचें हृदय शोधावें.

सामाजिक प्रगतीसाठीं स्थिर आधार मिळावा म्हणून पाश्चिमात्यांनीं फारशी मदत दिलेली नाहीं. अशा वेळेस गांधीजीच आपला चकित करणारा संदेश घेऊन आले. मनुष्यानें सर्व भूतहितांतच स्वतःचें हित बघावें हा संदेश घेऊन ते आले. संशयात्मा भारताला महात्माजींनीं हिंदु-मुसलमानांनीं परस्परसहकार्यात परस्परकल्याण पहावें, परस्परसंघर्षांत कल्याण नाहीं, ही शिकवण दिली. हिंदु मुसलमानांचें हित परस्परविरोधी नाहीं असें गांधीजी सांगत आणि हीच गोष्ट मुस्लीमलीगवाल्यांस आणि हिंसदुभावाल्यांस रुचली नाहीं. दोघेहि महात्माजींवर चडफडत, दांतओठ खात.

धर्मभेदरहित नागरिकत्वाचें तत्त्व आपण जर प्रस्थापित करूं शकलों, तर स्वतंत्र हिंदुस्थानला बलवान् करणारी एक फार मोठी गोष्ट आपण केली, असें

होईल. मानवांमानवांतील हा जो शेजारधर्म, भाषाभेद वा धर्मभेद, जन्मभेद, जातिभेद हे दूर ठेवून राहणारा, त्यांच्या अतीत असणारा हा जो मानवधर्म, त्यांत गांधीजींच्या सामाजिक मूल्यांचा प्राण आहे.

आजच्या आणीबाणीच्या काळीं आपलें नुकतेंच जन्मलेलें स्वतंत्र राष्ट्र कसें टिकेल ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे. परंतु नागरिकाची निष्ठा मूक शरणागती-वरून मोजणें बरोबर होणार नाहीं. आजच्या राजकीय अवस्थेंत तों असंतोष प्रकटविणें कर्तव्यहि आहे. एका बाजूला कायद्याच्या अतिरेकी सत्तेपासून आपणांस राष्ट्र वांचवावयाचें आहे तर दुसऱ्या बाजूला असलेला असंतोषाचा फायदा घेऊन राष्ट्र कोणी कमजोर करूं पाहील तर तेंहि होणार नाहीं म्हणून जपलें पाहिजे. उजवे आणि डावे यांच्यामध्यें असा तोल राखणें यांत महात्माजींची अपूर्वता होती. गेलीं तीस वर्षें शक्तीचें एक नवीन केंद्र निर्मिण्यासाटीं ते झगडत होते. ही शक्ति कायदेशीर मर्यादा ओलांडून बाहेर जाऊं बघे तेव्हां गांधीजी तिला कह्यांत राखीत. गांधीजींनीं सामाजिक स्थित्यन्तराच्या शास्त्रांतही जी भर घातली, त्याला एक शब्द सत्याग्रह हा आहे. सत्याग्रहांतील शिस्त नि प्राणमयता जर आपण विसरूं तर गांधीजी एक निर्जीव मूर्ति बनतील.

ब्रिटिशांचें जाणें म्हणजे स्वातंत्र्य नव्हे ही गोष्ट भरपूर किंमत देऊन आपण आज शिकत आहोंत. त्याप्रमाणेंच जमीनदारी किंवा भांडवलशाही नष्ट झाली म्हणजे समाजवादी समाजरचना आली असें म्हणतां येणार नाहीं. जी नवीन सामाजिक रचना आपण आणूं इच्छितों, ती तेव्हांच येईल, जेव्हां नकारात्मक गोष्टींपेक्षां होकारात्मक गोष्टींवर आपण अधिक भर देऊं. गांधीजींच्या मरणानें आपण विधायक मूल्यांवर अधिकच भर द्यायला शिकलें पाहिजे. आपल्या कार्यक्रमांत नुसती निषेधक टीका नको. दैनंदिन जीवनांत, भांडवलशाहीशीं खटके, झगडे करीत असतांना आपण विधायक कार्यावरहि भर देत राहिलें पाहिजे. बारडोली यांतील धडे आजहि केवळ इतिहासजमा नसून रोज गिरवायला हवे आहेत.

गांधीजी अन्यायाशीं सदैव झगडत होते. परंतु वैयक्तिक द्वेष त्यांच्याजवळ कधींच नसे. गांधीजींच्या जीवन–दर्शनांतील ही किमया आपण राखूं शकूं का? प्रत्येक झगडा गांधीजी सामाजिक न्यायाच्या पातळीवर नेऊन उभा करीत. मानवजातीच्या हिताच्या भूमिकेवरून तो घोर लढा ते लढवीत. आणि

म्हणूनच कोणत्याहि शासनसत्तेशीं नसणारी अशी प्रभावी शक्ति गांधीजींच्या नेतृत्वांत असे. आपण थोर दृष्टि गमावूं, आणि वैयक्तिक हेवेदावे, सत्तेची लालसा यांतच बरबटूं, तर प्रत्येक न्याय्य गोष्टीसाठीं जी नैतिक शक्ति असावी असें गांधीजी सांगत ती आपण गमावून वसूं. त्याप्रमाणेंच आपण सामाजिक अन्याय दूर करण्यासाठीं प्रत्येक झगड्यांत जर भाग घेऊं, झगडा येईल म्हणून आहे तसेंच चालूं द्यायचें अशी जर वृत्ति ठेऊं, तर त्यामुळेंहि गांधीजींच्या जीवनमूल्यांपासून आपण दूर गेलों असें होईल. मानवाच्या मूलभूत चांगुल-पणावर विश्वास म्हणजे लोकशाही. गांजीजींच्या श्रद्धेचें यांत सार आहे.

काय खावें प्यावें यापासून तों राज्यशासनावरील प्रवचनांपर्यंत गांधिजींचें कर्मक्षेत्र पसरून राहिलें होतें तें उगीच नव्हे. राजकारण टाळतां येत नाहीं ही गोष्ट गांधीजी जाणत. अपरिहार्य अशी ही आपत्ति आहे. गांधीजी जी सामा-जिक क्रान्ति करूं पहात होते ती सर्वांगीण होती. साऱ्या जीवनाला व्यापणारी होती. त्यांचें जीवनकार्य विशाल होतें. ते केवळ राजकारणी नव्हते.

ज्यांना धार्मिक श्रद्धाच नाहीं, त्यांना सर्वधर्मसमभाव अर्थहीन वाटतो; दुसऱ्यांच्या धर्माविषयीं सहिष्णुता, आदर दाखविणें, त्यांना कळतच नाहीं. परस्परांशीं झगडणारे धार्मिक नि राजकीय पक्षोपपक्ष जर ही सहिष्णुता दाखव-तील तर लोकशाही मृतवत् न राहतां प्राणमय अशी अनुभवाची गोष्ट होईल.

गांधीजी आपणांस प्राचीन महात्म्यांची आठवण करून देतात. आपण अशी सहिष्णुता दाखवूनच गांधीजींचे अनृणी होऊं, त्यांची खरी पूजा करूं. सत्यासाठीं झगडा; स्वार्थासाठीं, पैशासाठीं नव्हे; हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. आपला प्रत्येक झगडा तरच सत्याग्रही स्वरूपाचा होईल. जगांतील सर्व पददलितांना जो अमर संदेश गांधीजींनीं दिला त्यांतील रहस्य तेव्हांच आपणांस कळलें असें म्हणतां येईल, जेव्हां आपला प्रत्येक लढा सत्यासाठीं असेल.

( अच्युत पटवर्धनांच्या लेखावरून )



## मानवजातीचे उपासक संत

माघ महिन्यांत दासनवमी येते तर फाल्गुन महिन्यांत तुकाराम महाराज, एकनाथ यांच्या पुण्यतिथि येतात. पू. विनोबाजींनीं म्हटल्या-प्रमाणें निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या देशांत परमेश्वर संतांना पाठवीत असतो, ही त्याची परम कृपा होय. सन्त सन्मार्ग दाखवायला येतात. तुकारामांनींच म्हटलें आहे,

> " संत कृपेचे हे दीप
> करिती साधकां निष्पाप "

जीवनाच्या मार्गावर प्रकाश दाखवण्यासाठीं संत येतात. पुनः पुन्हां तो मार्ग उजळावा लागतो. पुनः पुन्हां तो रस्ता बुजतो, जग आडमार्गानें जाऊं लागतें. आणि पुनः संत येतात नि मांगल्याचा मार्ग दाखवतात. अशा रीतीनें मानवजात मुंगीच्या पावलानें प्रगति करीत आहे.

संतांनीं संकुचित ध्येयें कधींहि डोळ्यांसमोर ठेवलीं नाहींत. त्यांच्यासमोर सारी मानवजात असते, एवढेंच नव्हे तर सारें ब्रह्मांड असतें. महाराष्ट्राला पुण्यप्रतापी श्रीशिवरायांनीं स्वराज्य दिलें. महाराष्ट्र आनंदवनभुवन त्यांनीं बनविलें. संतांचें ध्येय एका प्रदेशांत त्यांनीं मूर्त केलें. परंतु संत त्याच्या पलीकडे पाहणारे होते. महाराष्ट्रांत गांवोगांवीं दररोज जर कोणाच्या नांवाचा जयघोष होत असेल तर " ग्यानबा तुकाराम " या दोन पवित्रतम नांवांचा. महाराष्ट्राचे राष्ट्रपुरुष अनेक आहेत. परंतु जनतेच्या हृदयमंदिरांतील महा-पुरुषांच्या प्रभावळींत " ग्यानबा तुकाराम " ही जोडी चंद्रसूर्याप्रमाणें शोभत आहे. भारताचा हा मोठेपणा आहे कीं केवळ राजकीय स्वातंत्र्य देणाऱ्यांपेक्षां

ज्यांनीं मानवतेची पूजा शिकवली, सर्व जगाला डोळ्यांसमोर ठेवा सांगितलें, भेदाभेद गाळून सर्वांची सेवा करा, सर्वांच्या हितामंगलासाठीं झटा सांगितलें अशांची या देशांत अधिक पूजा केली जाते. राजे महाराजे आपण विसरून जातों. परंतु ज्ञानेश्वर तुकारामांना विसरणार नाहीं, सूरदास तुलसीदासांस विसरणार नाहीं. मीराबाई जनाबाई मुक्ताबाई यांना विसरणार नाहीं. कां बरें असें? कारण संतांनीं दिलेली शिकवण अजून पुरी करायची आहे. ती प्रत्यक्षांत आणावयाची आहे. साऱ्या जगाच्या कल्याणाचें ध्येय त्यांच्यासमोर असे. राष्ट्रसंघ, यूनो, इत्यादि संस्था जगांत शान्ति यावी म्हणून पहिल्या महायुद्धापासून स्थापन होऊं लागल्या आहेत. संतांनीं अशा संस्था स्थापिल्या नाहींत. परंतु ते संदेश देत गेले.

प्राचीन ऋषिमुनींनीं सर्वे सुखिनः सन्तु असा घोष केला. अमक्या जातीचा सुखी असो, तमक्या जातीचा सुखी असो, अमक्या धर्माचा, प्रांताचा वा देशाचा सुखी असो असें त्यांनीं म्हटलें नाहीं. त्यांच्या दृष्टीसमोर मानव मात्र सुखी होवो हे ध्येय होतें. ज्ञानेश्वर ज्ञानेश्वरीच्या अखेरीस मागणें मागतांना म्हणतात:

"जो जें वांछील तें तें लाहो। प्राणिजात ॥"

कोणाला कांहीं कमी न पडो. अन्नवस्त्र, घरदार, सुख, आनंद, सारें असो. अर्थात् याच्या आधीं ज्ञानदेवांनीं "विश्व स्वधर्मसूर्यें पाहो" असें म्हटलें आहे. सर्व समाजाचें धारण पोषण व्हावें ही जी धर्ममय वृत्ति, तिच्या प्रकाशांत तुम्हीं आपापल्या गरजा मागा नि पुऱ्या करून घ्या. रामराज्याचें वर्णन करतांना एक मराठी कवि म्हणतो, "त्या राज्यांत मी कोठें राहूं अशी चिंतेला चिंता पडली."

चिंतेसी चिंता असे"

असें राज्य, स्वराज्य यावें, सर्वांना यावें, सर्व मानवांना यावें, असें प्राचीन संतांना वाटे, ज्ञानदेवांना वाटे. तुकाराम महाराज म्हणतात:

"अवघाचि संसार सुखाचा करीन
आनंदें भरीन तिन्ही लोक"

सारा मानव संसार त्यांना सुखाचा करायचा होता. बुद्ध, खिस्त, ज्ञानदेव, तुकाराम, सारे हें महान् ध्येय देत आहेत. सारे भेदाभेद त्यांनीं पळविले, सर्वत्र एक आत्मा त्यांनीं अनुभाविला.

पू. विनोबाजी एकदां म्हणाले होते, "खिस्ताचें राजकारण अजून आम्हांला कळायचें आहे. त्याला काय राजकारण कळे असें नका म्हणूं. शेजाऱ्यावर प्रेम करा या त्याच्या लहानशा वाक्यांतील राजकारण अजून तरी कळलें आहे का? हा देश त्या देशाला खात आहे हेंच आजहि चाललें आहे." आज यूनोचा खेळखंडोबा चालला आहे. साधा काश्मीरचा प्रश्न, परंतु त्याच्या आड यांचीं कारस्थानें येत आहेत, जागतिक सत्तेचीं राजकारणें येत आहेत. शेजाऱ्यावर प्रेम करा. साधें वाक्य. साधें सूत्र. साधा संदेश. शेजारी म्हणजे घराजवळ राहणारा, आपल्या गांवाजवळ राहणारा, प्रान्ताजवळ राहणारा, देशाजवळ राहणारा. त्या वाक्यांतील अर्थ उत्तरोत्तर महान् होत जाईल. महात्माजींनाहि म्हणत कीं "हिमालयांत जा. राजकारण तुम्हांला कळत नाहीं." महात्माजी नम्रपणें म्हणत, "हिमालयांत जाणारा मी कोण? प्रभु प्रेरणा देणारा. मी येथेंच जनतेंत धडपडत राहीन." महात्माजींचें राजकारण समजण्याची अजून आमच्यांत कुवत नाहीं. ज्याचें राजकारण समजतें तो कसला राजकारणी? महात्माजींचें राजकारण स्वतःला राजकारणी समजणाऱ्यांस कळत नसे, यांतच त्यांच्या राजकारणाचा मोठेपणा आहे. महात्माजींचें राजकारण मानवजातीच्या सुखासाठीं होतें, शेजाऱ्यावर प्रेम करा या सूत्रांत होतें, संतांच्या शिकवणीनुरूप होतें. जातींचीं, धर्मांचीं विशिष्ट देशांचींच संकुचित राजकारणें करणाऱ्यांस महात्माजींचें विश्वव्यापी राजकारण कसें समजणार? तें समजलें नाहीं म्हणून तर एकानें अज्ञानानें त्यांच्यावर गोळ्याहि घातल्या. संतहि राजकारणी असतात या अर्थानें कीं ते जगाला सुखी करूं पहातात. सारे भेदाभेद त्यांच्यासमोर मावळतात. सूर्यासमोर अंधार टिकूं शकत नाहीं, अग्नीजवळ घाण असूं शकत नाहीं, त्याप्रमाणें संतांसमोर भेदांची घाण उरत नसते. म्हणून त्यांचा संदेश सदैव नवीनच आहे. सदैव ताजाच आहे. कारण त्यांचीं ध्येयें अजूनहि प्रत्यक्षांत आणायचीं आहेत. भारतीय जनता म्हणून त्यांच्या नांवाचा सदैव जयजयकार करते; कारण संत सर्व जगाच्या पुढें होते. त्यांच्याइतके पुरोगामी, प्रगतिपथावर असणारे दुसरे कोण होते? सर्व जगाला सुखी करूं पाहाणारें त्यांचें क्रान्तिशास्त्र होतें आणि हें कार्य स्वतः कष्ट सोसून ते करूं पहात होते.

शस्त्र क्रांतिशिवाय समाजवाद कसा येणार असें कोणी म्हणतात. कोठें कोठें कामगारांचीं लहान मुलें "आम्ही शस्त्र घेऊन क्रांति करूं" असें म्हणायला शिकवलेलीं आढळतात. कोणी क्रांतिकारक बंधु लहान मुलांना हें शिक्षण क्वचितच देत असतील. परंतु आपल्या देशांत लोकशाही मार्गानेहि समाजवाद आणतां येईल. उशीर लागेल. इंग्लंडमध्यें आज समाजवादी सरकार आहे. तेथें ७५ वर्षें समाजवादी विचारांचा प्रचार झाला तेव्हां आज सत्ता हातीं दिसते. सशस्त्र क्रान्ति करून हुकुमशाही निर्मून गरिबांचे संसार सुखी करूं पहाल. परंतु त्यांत धोके आहेत. सत्तेची लालसा असणारा वर्ग निर्माण होतो. व्यक्तिगत स्वातंत्र्याची येतां जातां गळेचेपी. असें स्वराज्य असावें जेथें अहिंसक रीतीनें संघटना करणाऱ्यांस, प्रचार करणाऱ्यांस मोकळेपणा असावा. म्हणून उशीर जरी लागला तरी भव्य मार्गानें जाऊं. देशांत रक्तपात नकोत. लोकांची उपासमार ही हिंसाच आहे. परंतु ती त्वरित टाळण्यासाठीं दुसऱ्या हिंसा नकोत. शेवटीं ज्ञान, विचार, कल्पना यांचा प्रसार करून तें होईल. मानव सुधारल्याशिवाय खरी क्रांति कोठली? चार लोकांनीं दंडुक्यांनीं केलेली क्रान्ति नको. आपण जनतेंत विचार नेऊं. कार्यक्रम ठेवूं. समाजवादी सृष्टि त्यांच्यासमोर ठेवूं. ते आपणांस मतें देतील. त्यांच्या बुद्धींत प्रकाश येऊन ते असें करतील. लागो वेळ. इतकी कळ सोसली, आणखी थोडी. अर्थात् भरल्या पोटीं मी असें म्हणणें शोभत नाहीं. परंतु वाटतें कीं काटाकाटीच्या छाटाछाटीच्या मार्गापेक्षां, डोकीं फोडण्याच्या मार्गापेक्षां, डोकीं मोजण्याच्या मार्गानें, मतप्रचाराच्या मार्गानें आपण जाऊं. संतांचा असा हा ज्ञानानें कर्मशुद्धि करण्याचा, सामाजिक क्रान्ति करण्याचा निर्मळ नि शाश्वत मार्ग होता. महात्माजींनीं तोच पुन्हां उजळला. तो पंथ आपण घेऊं. भारतांत भव्या मार्गानें समाजवाद आणूं. रक्तपात, द्वेषमत्सराचे गराळे नकोत. जातीयता, पिळवणूक, अन्याय, सारे भेद, यांच्यावर एकच उपाय म्हणजे मानवतेची पूजा हा आहे. आपण मानवी जीवन थोर मानूं या. खरेखुरे मानव होऊन समस्त संसार सुखाचा, मंगलाचा करण्यासाठीं धडपडूं या. अशी धडपड करणाऱ्या नि करायला शिकवणाऱ्या थोर संतांस सहस्र प्रणाम!



## महर्षि अण्णासाहेब कर्वे

येत्या एप्रिलच्या १८ तारखेस महर्षि अण्णासाहेब कर्वे यांना ९० वर्षें पुरीं होऊन ९१ वें वर्ष लागेल. भारतांतील सर्वांहून वडील असे ते थोर राष्ट्रसेवक आहेत. ईश्वरानें त्यांना दीर्घायुष्य दिलें याबद्दल कृतज्ञता व्यक्त करायला हवी. आपल्या देशांत सेवामय दीर्घायुष्य मिळणें ही दुर्मिळ गोष्ट आहे. विष्णुशास्त्री, आगरकर, गोखले, विवेकानंद, रामतीर्थ, किती तरी थोर माणसें अल्पवयी झालीं. महर्षि कर्वे आज जवळ जवळ साठ वर्षें एका ध्येयानें प्रेरित होऊन काम करीत राहिले ही केवढी धन्यतेची गोष्ट! महाराष्ट्राला, भारताला यांत केवढी कृतार्थता !

आपल्या देशांत केवळ इंग्रजांचीच गुलामगिरी नव्हती. आपल्या देशांत शेंकडों प्रकारची गुलामगिरी होती, अजून आहे. ही शतमुखी गुलामगिरी दूर करायला शेंकडों बाजूंनीं सुरुंग लावणें जरूर होतें. परकीयांची नि स्वकीयांची दोन्ही प्रकारची गुलामगिरी नष्ट करायची होती. अण्णासाहेब कर्वे यांनीं स्त्रियांची गुलामगिरी दूर करण्याचें थोर कार्य अंगीकारिलें. सारें जीवन त्यासाठीं दिलें. स्त्रियांना शिक्षण मिळावें, अल्पवयी विधवांची व्यवस्था व्हावी, गरीब मुलींची सोय व्हावी, त्यांना समाजांत मान मिळावा, प्रतिष्ठा लाभावी, यासाठीं अण्णा झिजले. त्यांनीं पुनर्विवाह केला. किती निंदा त्यांना सहन करावी लागली. हरिजन दौऱ्याच्या वेळेस ते मला म्हणाले, " अजून इतकीं वर्षें झालीं तरी मुरूड गांवीं मी गेलों तर मला निराळें बसवतात. तुम्ही तर अस्पृश्यांना सर्वत्र घ्या म्हणत आहांत. विचारप्रसार हाच उपाय आहे. सारखा विचार ओतीत जा. पाप म्हणजे अज्ञान. रूढी म्हणजेच त्यांना धर्म असें वाटतें. ज्ञान नेणें, खरा

धर्म नेणें, अशानेंच नीट काम होईल. अधीर नका होऊं." अण्णा महान् कर्मयोगी आहेत. तीन मुलींची संस्था त्यानीं सुरू केली. आज तिचा केवढा व्याप आहे. स्त्रियांचें पहिलें राष्ट्रीय विद्यापीठ स्थापण्याचें महान् कार्य त्यांनीं केलें. महाराष्ट्रांत, गुजराथेंत, अन्यत्रहि या विद्यापीठाला जोडलेल्या शाळा आहेत. अण्णांना आज एक प्रकारें कृतार्थ वाटत असेल. जें रोपटें त्यांनीं लावलें, त्याचा महान् वृक्ष झालेला ते पहायला हयात आहेत ही परम सुखाची गोष्ट होय.

अण्णा प्रत्येक क्षण कर्मासाठीं देतात. त्यांचें जीवन हेतुमय, ध्येयमय आहे. सार्वजनिक पैशाला त्यांनींच जपावें. ते अनाठायी कधीं खर्चणार नाहींत. हमालाशिवाय नेतां येईल एवढेंच सामान न्यायचें. पुणें स्टेशनवरूनसुद्धां चालत जायचे. स्वतःचीं मुलें बी. ए. वगैरे झाल्यावर त्यांना शिकायला अधिक पैसा त्यांनीं कर्ज म्हणून दिला. जीवनाकडे पहाण्याची त्यांची एक दृष्टि आहे. दुसऱ्याच्या बाबतींत जो न्याय, तोच मुलांच्या बाबतींत. अण्णा आज ९० वर्षांचे आहेत. परंतु सेवा सुरूच आहे. ते पुण्यांत घरोघर साक्षरता प्रसारार्थ मिळेल तें गोळा करतात. रोज दोन तास हिंडतात. व्यायामहि होतो. सेवाहि होते. साक्षरता प्रसाराबरोबर त्यांनीं समता मंडळहि स्थापन केलें आहे. जागतिक समता मंडळाची ती शाखा आहे. या संस्थेचें लहान नियतकालिक त्यांनीं सुरू केलें आहे. सर्वांना न्याय मिळावा, कोणी कोणास तुच्छ मानूं नये, अशी त्यांना तहान. माझ्या हरिजन दौऱ्याच्या वेळेस त्यानीं आशीर्वाद दिला होता. तेच आमच्या प्रचारसमितीचे अध्यक्ष होते. महर्षि अण्णासाहेब मानवतेचे उपासक आहेत.

१९३० मधील तो प्रसंग. मी शाळा सोडून कोंकणांत जात होतों. त्याच बोटींत महर्षि अण्णासाहेब होते. जगाची यात्रा करून ते नुकतेच आले होते. ते उभे होते. त्यांना जागा नव्हती. मी त्यांना ओळखलें. प्रणाम करून म्हटलें "अण्णा येथें बसा." मग ते अनेक अनुभव सांगत होते. म्हणाले, "परदेशांत असतांना गांधीजी मिठाचा सत्याग्रह करणार ऐकून मी हंसलों. परंतु मुंबईत उतरल्यावर 'नहि रखनी नहि रखनी । जालीम सरकार नहि रखनी' अशीं गाणीं म्हणत बेकायदा मीठ तयार करायला हजारों मायभगिनी निघाल्या आहेत, पोलिसांच्या लाठीला तोंड देत आहेत, असें दृश्य पाहून माझ्या

डोळ्याचें पारणें फिटलें. विलेपार्ले येथें जाऊन आपणहि एक सत्याग्रही स्वयं-सेवक व्हावें असें मनांत आलें." अण्णा सांगत होते. "माझ्या डोळ्याचें पारणें फिटलें" हे त्यांचे शब्द मी कधीं विसरणार नाहीं. त्या शब्दांत अण्णांची स्त्रियांच्या शिक्षणाविषयींची दृष्टि आहे. शिकून शेवटीं काय करायचें? खरें शिक्षण तें जें लहानशा संसारांतून मोठ्या संसारांत आणतें. तें शिक्षण जें दुसऱ्यांच्या सुखदुःखांशीं जोडतें. भारतीय नारी घरचा संसार सांभाळून राष्ट्रीय संसारांत पडत आहेत, स्वातंत्र्य युद्धांत निर्भयपणें भाग घेत आहेत, हें पाहून अण्णा उचंबळले. शिक्षणानें निर्भयता यावी; शिक्षणानें क्षुद्रता जावी; संकु-चितता जावी. ज्ञान म्हणजे भगवंताचें रूप. भारतीय स्त्रियांनीं सर्व क्षेत्रांत पुढें यावें असें अण्णांना वाटे.

अण्णांची दृष्टि राष्ट्रीय होती, तशी ती अति राष्ट्रीयहि होती. ते एका रीतीनें विश्वप्रेमी आहेत. ते एके ठिकाणीं लिहितात, "प्रार्थना करितांना शत्रूंचेंहि भलें चिंतावें. अशानें जीवनांत समतोलपणा येतो. उदारता येते." अण्णाच्या या थोर उद्गारांचा मी जीवनांत उपयोग करीत असतों. ज्यांच्याजवळ माझें पटत नाहीं, तेहि सुखी असोत, असें मी म्हणतों. अण्णांच्या त्या उद्गारांनीं मला किती तरी शिकविलें आहे.

असे हे थोर पुरुष आहेत. महर्षि अण्णा महाराष्ट्राचें, भारताचें भूषण आहेत. त्यानीं १९१५ मध्यें आपलें आत्मवृत्त लिहिलें. त्याला श्री. रघुनाथराव परांजपे यांनीं प्रस्तावना लिहिली आहे. तीत परांजपे लिहितात, "हें आत्म-चरित्र म्हणजे परमेश्वरासमोरची जबानी आहे." अण्णा म्हणजे अखंड यत्न; प्रामाणिकपणा; नम्रता नि निर्भयता; अण्णा म्हणजे ध्येयमूर्ति, सत्यमूर्ति. किती शांत ते असतात, कसें शान्तपणें बोलतात! प्रणाम अण्णांच्या चरणीं, सहस्र प्रणाम. महात्माजी 'हरिजनके वास्ते' असें म्हणून हात पुढें करीत. अण्णा साक्षरतेसाठीं दारोदार हिंडतात. असे हे राष्ट्रपुरुष पाहून हृदय उचंबळतें. अशांच्या रूपानें मानवतेचे महान् आदर्श जगाला मिळत असतात. महर्षींना एक लाख रुपयांची थैली मुंबई नगरवासी देणार आहेत. अण्णांना किती दिलें तरी तें कमीच आहे. आपण भक्तिप्रेमानें जें देऊं ते स्वल्प असलें तरी अमोल आहे. अण्णांचे महाराष्ट्रावर व सर्व राष्ट्रावर उपकार आहेत. भगिनींची मान त्यानीं उंच केली आहे. अण्णांपासून स्फूर्ति घेऊन आपण सर्वांना समता देऊं या; सर्वांचीच मान उंच करून खरें स्वराज्य आणूं या.



## दासनवमीचा संदेश

आज दासनवमी. समर्थ रामदास स्वामींच्या पुण्यस्मरणाचा आजचा दिवस. त्यांच्या संदेशाची आज अधिकच आवश्यकता आहे. समर्थांचा, श्री. शिवछत्रपतींचा काळ डोळ्यांसमोर आणा. समर्थांनीं हिंदुस्थानभर हिंडून महाराष्ट्र ही कर्मभूमि ठरविली. त्यांत पुनः सातारा जिल्हा ठरविला. महाराष्ट्र स्वराज्य आणील अशी त्यांना आशा. त्यांनीं महाराष्ट्रभर आणि हिंदुस्तानभर मठ स्थापिले. मठाच्याद्वारा विचारजागृति केली. प्रत्येक मठांत ग्रंथालय असे. विशेषतः रामकथेचा, रामोपासनेचा, मारुतीच्या उपासनेचा संप्रदाय त्यांनीं सुरू केला. राम म्हणजे देवांना सोडवणारा. रावणाला दूर करणारा. तरुण बुद्धिमान् मुलें हाताशीं धरून त्यांना विवेक वैराग्याची दीक्षा देऊन समर्थांनीं वातावरण उभें केलें. श्री शिवछत्रपती आणि त्यांचे ध्येयार्थी संवगडी उभे राहिले. "जो तो बुद्धीच सांगतो । करंटे मिळाले सर्व" अशा प्रकारची परिस्थिति होती. लोकांना खायला नव्हतें. स्वकीय नि परकीय गुंड जनतेस छळीत होते. अशा प्रतिकूल वातावरणांत परम पराक्रमी शिवाजी महाराज उभे राहिले. जनतेंतील तरुण त्यांच्याभोंवतीं उभे राहिले. महाराष्ट्रांतील ध्येयवादी नवीन पिढी जातपात विसरून महान् नेत्याभोंवतीं गोळा झाली. ब्राह्मण, प्रभु, मराठे, सारे एका ध्येयानें पेटले. एवढेंच नव्हे तर महाराष्ट्रांतील मुसलमानहि शिवछत्रपतींच्या भोंवतीं उभे होते. समर्थांनीं सांगितलें, "मराठा तेवढा मेळवावा" या चरणाचा अर्थ काय ? समर्थांनीं येथें जो मराठा शब्द योजिला तो सर्व महाराष्ट्रीयांस उद्देशून आहे. समर्थांची, शिवबांची दृष्टि मोठी होती. आपण आज मराठा म्हणतांच

विशिष्ट आडनांवें समजतों. सारे महाराष्ट्रीय ते मराठे ही विशाल भावना सतराव्या शतकांत होती. म्हणून चारी बाजूंस पातशाह्या असूनहि श्री शिवप्रभूंना जनतेचें स्वराज्य निर्मितां आलें. शिवाजी महाराज व त्यांचे सहकारी आपल्यापेक्षां विचारानें पुढें होते. समर्थांनीं स्वराज्य पाहिलें. किती त्यांना आनंद झाला. महाराष्ट्राला त्यांनीं " आनंदवनभुवन " या नांवानें गौरविलें. त्यानीं स्वराज्य संवर्धनाचा संदेश दिला. संकुचित राहूं नका, व्याप वाढवा. प्रयत्न म्हणजेच देव.

" व्यापासारखें वैभव "
" यत्न तो देव जाणावा "
" घालून अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्मांडाहून जाड ।
" तेथें कैचें आणलें द्वाड । करंटेपण ॥ "
" उत्कट भव्य तें घ्यावें । मिळमिळीत अवघेंचि टाकावें ॥ "

इत्यादि तेजस्वी शिकवण समर्थांनीं दिली. राज्य गरिबांचें. राजा जणूं संन्यासी. लोकांना खायला नाहीं, असें समर्थ कळवळून सांगतात. श्री. शिवछत्रपतींनीं खबरदार गरिबांना छळाल, लुटाल, तर अशीं आज्ञापत्रें प्रसिद्धिलीं. असा तो स्वराज्याचा महान् काळ होता.

पुढें स्वराज्याचें साम्राज्य झालें. परंतु सर्व जनतेला हें साम्राज्य आपलें वाटेल अशी नीति ठेविली पाहिजे होती. अटकेवर झेंडा लागला. तिकडे बंगालवर दरारा बसला. म्हैसूरकडचीं नंदनवनें आम्हीं आपलींशीं केलीं. परंतु समर्थांनीं त्या वेळेस महाराष्ट्रापुरतें राजकारण होतें म्हणून मराठा तेवढा मेळवावा असें घोषवाक्य दिलें. पुढच्या अठराव्या शतकांत हिंदु मात्र मेळवावा एवढेंच नव्हे तर हिंदी मात्र मेळवावा असें ब्रीदवाक्य देणारा महापुरुष हवा होता. पहिल्या बाजीरावास ही दृष्टि होती. छत्रसालाविषयीं बाजीरावास किती प्रेम. दिल्लीचा बादशहा मुसलमान असला तरी तो हिंदी मुसलमान आहे, या देशांतील आहे. बाहेरून नादीरशहा स्वारी करून आला. तर बाजीराव आपण होऊन दिल्लीपतीच्या रक्षणार्थ निघतो. आम्ही भांडूं. परंतु बाहेरचा आक्रमक आला तर आम्हीं येथें एक अशी दृष्टि पहिल्या बाजीरावाची होती. परंतु अशा विशाल दृष्टीचा अन्य दिसत नाहीं. एकाच मराठेशाहीचे शिंदे आणि होळकर राजपुतान्यांत दोन अलग रजपूत पक्षांस मिळतात आणि खंडण्या घेतात. एका शासन

संस्थेचे सरदार दोन परस्परविरुद्ध राजांच्या बाजूला जाऊन उभे कसे राहतील ? आमची दानत, न्यायबुद्धि गेली. आम्ही का रजपुतांस आपसांत झुंजवावें ? आम्हीं सर्वांस एकत्र आणलें पाहिजे होतें. आम्हीं मराठे साम्राज्यवादी नाहीं. आम्ही तुम्हांस स्वातंत्र्य द्यायला आलों आहोंत. आपण सारे एक. सारे हिंदु एक. मुसलमानहि गुण्यागोविंदानें वागतील तर तेहि आपलेच. आपण सारे हिंदी एक. असा महान् मंत्र कोणी दिला नाहीं. नानक, कबीर, चैतन्य वगैरे संतांनीं भेद कमी करून राम रहिम एक असा प्रचार चालविला. परंतु राज्य-कर्त्यांना ती विशाल जाणीव नव्हती. पुढें पुढें थोडी आली होती. गायकवाड मोहोरम साजरा करीत. हैदर दसरा साजरा करी. हिंदु मुसलमान एकमेकांच्या धर्माला, सणांना, दैवतांना मान देऊं लागले होते. हैदरानें गोवध-बंदी केली. टिपूनें संस्कृत ग्रंथालय स्थापिलें. परंतु पुढें इंग्रज आले. भेदनीति सुरू झाली. आपण त्या नीतीला बळी पडलों. आपण जातींच्या डबक्यांत पुनः घुसलों. आणि आज तीच शोचनीय स्थिति आपली आहे.

भारत दुखंड झाला आहे. हिंदुस्थानचा जो एक महान् भाग राहिला आहे, त्यांत तीस कोटि लोक अजून आपण आहोंत. आपण सारे एक होऊं या. उत्कट भव्य तें घेऊं या. सुदैवानें सारे धर्म या आपल्या भागांत आहेत. हिंदु, मुसलमान, शीख, ख्रिश्चन, पारशी, सारे आपण येथें आहोंत. सारे मिळून आपण हिंदी आहोंत.

कोणी विचारलें तुम्ही कोण तर मी हिंदी असें उत्तर पटकन् ओठावर आलें पाहिजे. खरें म्हणजे आपण मानव आहोंत. महर्षि सेनापतींनीं "माझी जात मानव, माझा धर्म मानव धर्म" असें खानेसुमारीच्या वेळेस उत्तर दिलें होतें. हेंच थोर उत्तर आपण सर्वांनीं दिलें पाहिजे. मनुस्मृतीचें खरें नांव "मानव धर्म स्मृति" असेंच आहे. ज्या सूत्रावरून ही स्मृति रचली गेली त्या सूत्रास "मानवधर्मसूत्र" अशी संज्ञा होती. हिंदुधर्म हें दुसऱ्यांनीं दिलेलें नांव आहे. इराणी लोक 'स'चा 'ह' उच्चार करीत. सिंधू नदीला ते हिंदु नदी म्हणत. सिन्धूच्या तीरावरचे ते हिन्दु. गुजराथी भाषेंत हा 'स' चा 'ह' दिसतो. साबू हाबू, सांजे हांजे, असे दोन्ही प्रयोग ते करतात. आपल्या धर्माचें नांव मानवधर्म किंवा सनातन धर्म असें होतें. सनातन म्हणजे बाबा वाक्यं प्रमाणं मानणारा नव्हे तर "सनातनो नित्य नूतनः" कालानुसार बदल करणारा,

सदैव ताजा, वर्धमान असा धर्म होता. सर्व–संग्राहक होता. म्हणून तो मानव धर्म होण्याच्या लायकीचा आहे असें विवेकानंदांनीं सांगितलें.

भारतीय बंधु–भगिनींनो, अतःपर ही थोर दृष्टि घ्या. मानवधर्माची दीक्षा घ्या. सर्वत्र सांगतांना मी हिंदी असें म्हणा. शाळेंत दाखल होतांना अमुक जात तमुक जात असें म्हणूं नका. हिंदी एवढें म्हणा. फार तर पुढें धर्म अमुक असें सांगा. शिक्षणांतील सोयी मागासलेल्या जातीचें नांव सांगितलें म्हणजे मिळतात. परंतु स्वराज्यांत जो जो गरीब आहे त्या सर्वांनाच लाभो, सोय मिळो. गरिबी ओळखूं या. जात विसरूं या. एका महान् मानव धर्माचे उपासक होऊं या. मानव प्रेमाच्या सिंधूंत डुंबूं या.

महात्माजी स्वतःला हिंदु धर्माचे म्हणवीत. परंतु त्यांचा अद्वैती हिंदुधर्म सर्वांविषयीं सहिष्णुता, सहानुभूति दाखवी. धर्म म्हणजे भक्तिप्रेमाचें, भ्रातृभावाचें अमृत देणारी माता. माता येथून तेथून साऱ्या पवित्र. खरा मातृपूजक सर्व मातांना मान देतो. खरा धर्मप्रेमी सर्व धर्मांना आदरितो. आज अशा सहिष्णु धर्मशीलतेची अत्यन्त आवश्यकता आहे. समर्थ सांगतात कीं भांडखोर, द्वाड करंटेपणा टाकून, विश्वासास मिठी मारणारे व्हा. सारे हिंदी एक होऊन जगाशींहि मिळून रहा. सर्व मानव जातीच्या सुखदुःखाशीं एकरूप व्हा. हिंदी जनतेची नाडी एक होऊन ती पुन्हां मानवजातीशीं एकरूप होवो. महात्माजी जगाचे झाले. तसे आपण होऊं या. समर्थांचा संदेश कालानुसार वाढवून आपण वागूं तर आपलें राष्ट्र समर्थ होईल, महान् होईल, वैभवशाली होईल.

आज तर समर्थांचा आत्मा व्यथित असेल. त्यांच्या चाफळ गांवीं घरें उध्वस्त आहेत. आनंदवनभुवन आज आक्रोशभूमि, क्रन्दभूमि आहे. माणसें जिवंत जाळलीं गेलीं. इंग्रजांनीं नाना नांव आहे एवढ्यावरून ५७ सालीं शेंकडों लोक फांशी दिले. आज गोडसे आडनांव आहे म्हणून जिवंत माणसें जाळलीं जात आहेत. हिंदु, मुसलमान, इंग्रज, जर्मन, जपानी कोणी असोत, सर्वांच्या ठिकाणीं पशुता आहे. वृकव्याघ्ररीस आपण क्षणांत बनतों. कोठलें स्वराज्य, कोठलें आनंदभुवन ! आपणांस साधी मानवता अजून शिकावयाची आहे. भाई मानवेन्द्रनाथ रॉय अनेक क्रांत्या पाहून, अनेक पक्ष बघून शेवटीं मानव-धर्माच्या उपासनेवर आले. सारे वर्गविग्रह, सारे द्वेषमत्सर दूर टेवा. आधीं मानवता शिका. मानव बनून थोर न्यायासाठीं झगडा. सर्वांना भावना आहेत.

सुखदुःखें आहेत. आत्मा सर्वत्र आहे. हें आधीं ओळखूं या. समर्थ म्हणाले—

" आपणास चिमोटा घेतला । तेणें जीव कासावीस झाला । आपणावरून दुसऱ्याला । ओळखीत जावें ॥ "

बंधुभगिनींनो, मनें मोठीं करा. पशुता नको. या भरतभूमीला शोभेसे वागा. थोरांचे तुम्ही वारसदार. ज्ञानेश्वर तुकारामाचे, समर्थ शिवबांचे, लोकमान्य महात्माजींचे वारसदार. मानवतेला कलंक नका लावूं. भारत आनंदाचें नंदनवन करा. आणखी काय सांगूं?



## जयप्रकाशांचा अहवाल

जयप्रकाशजींचा अहवाल धीरोदात्त आहे. "समाजवादीपक्षाचें धोरण अकरणात्मक असतें, घटनापरिस्पदेंत आलांत नाहीं, आतां की कुरकुर, इत्यादि आक्षेपाचें त्यांनीं खंडन केलें आहे. विधायक कामांत आम्ही गोडी घेतली नाहीं ही चूक झाली असें त्यांनीं प्रांजलपणें कबूल केलें आहे. महात्माजींची सर्वांत मोठी देणगी म्हणजे नैतिक मूल्यें. आपण ती दृष्टि सोडतां कामा नये. हुकुमशाही नको. साधनें शुद्ध असावींत. डाव्यांची एकजूट म्हणजे कोणाची ? कम्युनिस्टांशीं शक्यच नाहीं. ते रशियाचे हस्तक आहेत. पंचमस्तंभी आहेत. नेहरू सरकार उखडायला ते तयार आहेत. दुसरे डावे आहेत. ते स्टॅलिनचे पुजारी नसले तर आणखी कोणाचे असतात. म्हणून नुसते डावे एवढें म्हणून भागत नाहीं. ध्येय, तंत्र, साधनें, नैतिक मूल्यें या बाबतींत तरी एकवाक्यता हवी. सत्तेच्या राजकारणापासून दूर असावें. विधीमंडळांतील कामापेक्षां सेवेचें काम महत्त्वाचें मानावें" अशा प्रकारच्या धीरगंभीर आणि प्रांजळ विचारसरणीनें हा अहवाल भरलेला आहे. समाजवादी पक्षाचें हें उपनिषद आहे. त्यांच्या अहवालाचा सारांश पुढें देत आहें.

हें ऐतिहासिक अधिवेशन आहे. समाजवादी पक्ष नवीन पाऊल टाकणार. ज्यामुळें राष्ट्रीय राजकारणाला निराळा रंग चढणार अशा प्रसंगीं मी थोडें सिंहावलोकन केलें तर अप्रस्तुत होणार नाहीं. पक्ष स्थापून चौदा वर्षें झालीं. पक्षाची सभासदसंख्या कमी असली तरी आज दुसऱ्या नंबरचा तो सर्वांत मोठा राजकीय पक्ष आहे. पक्ष स्वतंत्र असला तरी स्वतंत्र म्हणून आपण राजकीय दृष्ट्या आजपर्यंत वागलों नाहीं. राजकीय दृष्ट्या आपण आपलीं

मतें फक्त काँग्रेससमोर मांडीत असूं. लोकांना वाटे हे नुसते टीका करणार आहेत. यांचें धोरण नकारात्मक असतें. आम्ही अल्पसंख्य असल्यामुळें तसें भासे. आमचें धोरण नकारात्मक नसे. देशासमोरील प्रत्येक महत्त्वाच्या प्रश्नावर पक्षाचें विधायक धोरण असे. १९३४ पासून काँग्रेस विधिमंडळाकडे ओढली गेली. छायामय विधिमंडळापासून फार आशा नका ठेऊं, लढ्याची तयारी करा, असें पक्ष सांगे. पंडित नेहरूंचेंहि तेंच मत होतें. मंत्रिमंडळें घेऊं नका आम्ही ३७ सालीं म्हटलें. पंडितजींचाहि तोच अभिप्राय होता. आम्ही मंत्रिमंडळविरोधी समितीहि स्थापली होती. रफी अहमद आणि मिनु मसानी तिचे चिटणीस होते. आम्ही मंत्रिमंडळें घेतलीं तें बरें केलें नाहीं असें आजहि मला वाटतें. कारण काँग्रेसमध्यें त्यामुळें सत्तेचें राजकारण चळावलें, जें आजहि काँग्रेसला मारक ठरण्याचा संभव आहे. असो. आपण काँग्रेसमध्यें डावे म्हणून अल्पसंख्य होतों. पुष्कळदां काँग्रेसशीं मतैक्य असे. विशेषतः राष्ट्रीय लढ्यांत आपण सर्व पणाला लावीत असूं. टीकाकार या सत्याकडे दुर्लक्ष करतात. तडजोडीच्या राजकारणाला आपण आळा घालीत असूं. काँग्रेसमध्यें समाजवादी वातावरण आम्हीं निर्माण केलें. आज प्रत्येकाला समाजवादी म्हणवून घेण्यांत अभिमान वाटतो. ह्याचें श्रेय समाजवादी पक्षास आहे. आपल्यावर एक खरा आक्षेप आहे. आपण विधायक कार्य क्रांतिकारक नाहीं असें समजून दूर राहिलों. ती चूक झाली. त्या अनुभवानें आपण संपन्न झालों असतों. काँग्रेबाहेर किसान, कामगार यांच्यांतही आपण काम करीत होतों. ट्रेड युनियनमध्यें एके काळीं आपणच प्रभावी होतों. आपण ट्रेड युनियन काम स्वातंत्र्याच्या लढ्यामुळें फार करूं शकलों नाहीं. परंतु आतां आपण जोरानें तें काम करीत आहोंत. राष्ट्रीय मजदूर संघाच्या सांप्रदायिक धोरणामुळें कम्युनिस्टविरोधी इतर कामगारशक्ति आपणच एकत्रित करूं शकूं. शेतकरी चळवळींमध्येंहि आपण अशी अखिल भारतीय संघटना उभारायला हवी. विद्यार्थी नि स्वयंसेवक चळवळीचाहि विचार हवा. स्वयंसेवक चळवळी अलग न ठेवतां अखिल राष्ट्रीय करा. विद्यार्थ्यांनीं कम्युनिस्टांच्या एकीच्या घोषणांनीं फसूं नये. समाजवादी पक्षसभासदांनीं विद्यार्थी काँग्रेसमध्यें गुंतूं नये. विद्यार्थ्यांनीं समाजवादी संघ स्थापून अभ्यास करावा, पक्षाचें कांहीं नियमित काम करावें.

पक्षाच्या स्थापनेपासून या ऐक्याच्या घोषणांनीं आपलें अपार नुकसान

झालें आहे. आज पुन्हां डाव्यांच्या एकीची भाषा ऐकूं येत आहे. हिंदुस्थानांत आज दंगल आहे. तिचें बी ४२ च्या मोडतोडी चळवळींत आहे, असें कोणी म्हणतात. ही फार सोपी कारणमीमांसा झाली. हिंदुस्थानांतील यादवी ही योजनापूर्वक आहे. तिचीं पाळेंमुळें समाजवादी राजकारणांत आहेत. जागतिक युद्धें, संकुलसत्ता, मानव्यांतील विस्कळीतपणा या सर्वांमुळें ही यादवी आहे. ४२ च्या आंदोलनाकडेहि कांहीं अल्प आरोप जाईल. असो. आजच्या राष्ट्रीय जीवनांत नैतिक मूल्येंच नाहींत. सर्वत्र सत्तेचें राजकारण, लांचलुचपत, वशीला, यांचें साम्राज्य आहे. असें कां ? सर्वत्र जातीयता कां दिसते ? याचें कारण अहिंसा नि सत्य तोंडभर बोलणारे पुष्कळ होते, परंतु मनापासून तसे कोणी नव्हते, नाहींत. यापेक्षां उघड हिंसा बरी. मी हिंसेचें समर्थन करीत नाहीं परंतु तिच्याहि नैतिक मर्यादा आहेत! हिंसेमुळें धोका येतो तर दांभिक अहिंसेनें, दांभिक सत्यानें अधिकच येतो.

आमच्यावर एक आरोप आहे कीं, तुमची अटकळ चुके, धोरण चुके. ब्रिटिशांशीं करार होणार नाहीं, पुन्हां लढा येईल असें तुम्हीं म्हणत असा. परंतु करार झाला, लढा करावा लागला नाहीं. चुकलें कीं नाहीं तुमचें ? तुम्हांला वाटलें कीं घटनासमिति हिंदी घटना बनवणारी सार्वभौम संस्था होणार नाहीं. परंतु चुकलांत कीं नाहीं ?

कॉंग्रेसनें मूलभूत, प्राणमय तत्त्वाचा त्याग केला नसता तर करार झाला नसता. हिंदुस्थानची फाळणी कॉंग्रेस कधींहि स्वीकारणार नाहीं अशी आम्हांला श्रद्धा होती. जिना वेव्हेल कारस्थानें पाहून तरी कॉंग्रेस पुन्हां वनवासी होईल असें वाटत होतें. फाळणी कॉंग्रेसनें मानली नसती तर अखंड भारत नि स्वातंत्र्य यासाठीं लढाच करावा लागला असता. स्वयंनिर्णयाचें तत्त्व त्या त्या प्रान्तांना असावें असें समाजवादी पक्षहि म्हणे. परंतु आधीं ब्रिटिशांनीं जावें. मग जनमत घ्यावें असें आमचें म्हणणें असे. कॉंग्रेसनें फाळणीच स्वीकारली असें नव्हे तर जें स्वातंत्र्य स्वीकारलें तेंहि अपूर्ण होतें. असें असून समाजवादी पक्षाचें धोरण खोटें ठरलें म्हणणें यांत न्याय नाहीं, प्रांजलपणा नाहीं. कांग्रेस ध्येयच्युत झाली नसती तर समाजवादी पक्षाच्या म्हणण्याप्रमाणें लढ्याशिवाय उपाय नव्हता.

तुम्हांला आतां पस्तावा होतो घटना समितींत न आल्याचा. असें म्हणून

आम्हांला कोणी हिणवतात. सत्तेची राजकारणें खेळणाऱ्यांना दुसरेहि आपल्या-सारखे आहेत असें वाटणें स्वाभाविक आहे. आम्ही घटनासमितीवर बहिष्कार घातला याचें वाईट नाहीं वाटत. ब्रिटिशांजवळ केलेला करार आम्हांस माहीत नव्हता. त्यांतील कांहीं भाग उचलणें, कांही धिक्कारणें, म्हणजे तो पराकाष्ठेचा संधिसाधुपणा झाला असता. मुस्लीमांनीं घटनासमितीवर बहिष्कार घालतांच ब्रिटिश करार फाडून जनतेनें निवडलेल्या खऱ्याखुऱ्या घटनासमितीची घोषणा आपण केली पाहिजे होती. ती घटनासमिति क्रान्तिकारक झाली असती. ब्रिटिश सत्तेला अखेरचें आव्हान देती. अशा सार्वभौम खऱ्याखुऱ्या प्राणमय घटनासमितीशीं समाजवादी पक्षानें संपूर्ण सहकार्य करून तिचे निर्णय अमलांत यावेत म्हणून पुरेपूर जबाबदारी घेतली असती. परंतु अशानें यादवी येईल असें सांगण्यांत आलें. पाकिस्तान स्वीकारून आपत्ति टळेल असें त्यांना वाटलें. परंतु पुढच्या घडामोडी काय झालें तें सांगतच आहेत. स्वस्तांत सत्ता घ्यायला गेलो परंतु केवढाल्या वेदनांतून जात आहोंत, अश्रूंची, रक्ताची, किंमत देत आहोंत तें इतिहास सांगत आहे. असें असूनहि आम्हींच शहाणे असें म्हणून स्वतःची पाठ थोपटून घेणारे लोक पाहिले कीं विस्मय वाटतो. समाजवादी पक्षानें चुका केल्या आहेत. परंतु ब्रिटिशांबरोबरचें धोरण आंखण्यांत त्यानें कधीं चूक केली नाहीं. पक्षाचीच भूमिका योग्य होती असें सांगायला आजहि मला अभि-मान वाटतो.

आतां पुढें काय ? हा प्रश्न म्हणजे काँग्रेसमध्यें रहायचें कीं नाहीं हा आहे. कांहीं दिवसांपूर्वी या प्रश्नासंबंधींचें माझें मत मी प्रसिद्धिलें होतें. परंतु नंतर आणखी घडामोडी झाल्या आहेत. राष्ट्रीय सभेची नवीन घटना झाली आहे. आज आणीबाणीच्या परिस्थितीतहि कांग्रेस संयुक्त आघाडी करायला तयार नाहीं. ती राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं लढणारी, सर्वांना जिच्याठायीं निष्ठा, ती कांग्रेस संपली. आतां कांग्रेस एक पक्ष होणार. खरें म्हणजे कांग्रेस हें नांवहि या पक्षानें सोडायला हवें होतें. तें थोर नांव पक्षांच्या राजकारणांनीं कलंकित कां करावें ! तेव्हां पक्षाला कांग्रेस सोडल्याशिवाय गतिच नाहीं. शिवाय आज विरोधी पक्षाचीहि जरूर आहे. ती जरूर अधिकच वाढत आहे. समाजवादी पक्षानेंच विरोधी पक्ष म्हणून उभें रहावें.

महात्माजी होते तोवर नागरिक स्वातंत्र्याची खात्री वाटे. परंतु आतां हुकूम-

शाही सर्वंकष सत्तेचे धोके आणखीच वाढतील. सरकारांत आजचीं माणसें आहेत तीं व्यक्तिशः चांगलीं आहेत. देशाची सेवा करायची त्यांना इच्छा आहे. परंतु त्यांच्यांतील थोडेसे लोकशाहीचे पुरस्कर्ते असले तरी इतरांना लोकशाहीचें सोहेरसुतक फारसें नाहीं. तें जुनें राज्ययंत्र जनतेची पर्वा न करणारं तसेंच आहे. ब्रिटिश गेले, परंतु नोकरशाही आहे.

पूर्वी कॉंग्रेस जनतेची सदसद्विवेकबुद्धि होती. परंतु आज कॉंग्रेस नि सरकार एकरूप आहेत. जनतेच्या हक्कांचें ती रक्षण करूं शकत नाहीं. सरकारला पाठिंबा हेंच जणुं तिचें काम !

आज परिस्थिति भीतिदायक आहे. विधायक टीकेलाहि अवसर नाहीं. आकाशवाणी वगैरे प्रचार साधनें सरकार पक्षासाठीं उपयोगीत आहे. राजकीय कार्यकर्त्यांची चळवळ दडपली जात आहे. राष्ट्रीय मजदूर संघानें सांगावें आणि कामगार कार्यकर्त्यास गिरफदार करावें असें चाललें आहे. सार्वजनिक सुरक्षिततेच्या कायद्याचा दुरुपयोग होत आहे. सरकारी शिक्षकांसहि राजकारणांत ढवळाढवळ करूं नका असें सांगण्यांत येतें. समाजवादाकडे जातांना अधिकाधिक लोक सरकारी नोकरींत येणार त्यांना का राजकारणांत भाग घेतां नाहीं येणार ? असें होईल तर मग सर्वंकष हुकुमशाहीच आली असें होईल. एकपक्षी सरकार होईल. विरोध सारा दडपूं पहाल तर फॅसिझम येणार. अशा परिस्थितींत समाजवादी पक्षच प्रभावी विरोधी पक्ष म्हणून काम करील असें म्हटलें तर त्यांत आत्मप्रौढी नाहीं. अतःपर कॉंग्रेस सोडून स्वतंत्र वागणेंच इष्ट नि अपरिहार्य आहे. यामुळें जबाबदारीहि अपार येते. अनेकांना दुःखहि होईल. आणीबाणीच्या परिस्थितींत हातांत हात घ्यायचे कीं दूर व्हायचें असें कोणी खेदानें म्हणतील. आपण अशांना निश्चिंत केलें पाहिजे. आपल्या देशाला अजून पार्लमेंटरी पद्धतीचा परिचय नाहीं. विरोधी पक्षांतील लोकशाहीपण अवगत नाहीं. कॉंग्रेस ब्रि. सरकारचा विरोध करी तसा कांहीं आमचा विरोध नाहीं. ब्रिटिशांचीं पाळेंमुळें दूर करायला कॉंग्रेस लढली. लोकशाहींत तो मार्ग विरोधी पक्षाचा नसतो. लोकशाहींत अधिकारारूढ सत्ताधारी नि पक्षविरोधी पक्ष, दोघांची राष्ट्राविषयी अभंग निष्ठा असते. राष्ट्रीय आणीबाणींत पक्षांचें स्वातंत्र्य राखून ते एकत्र येतात, राष्ट्रसेवा करतात. लोकशाहींत विरोधी पक्ष अराष्ट्रीय म्हणून तर नाहींच मानला जात, उलट सत्तारूढ पक्षापेक्षां अधिक चांगली सेवा पाहणारा म्हणून मानला जातो.

आपण लोकांना शिकवण दिली पाहिजे कीं काँग्रेसला विरोध करणें म्हणजे राष्ट्राला विरोध करणें नव्हे. त्याचा अर्थ एवढाच कीं कांहीं धोरणांस योजनांस विरोध. आणि लोकशाही मार्गानें सत्तारूढ पक्ष दूर करणें एवढाच अर्थ. देशासमोर संकटें आहेत. समान ध्येयाच्या कार्यकर्त्यांनीं सहकारानें तोंड दिलें पाहिजे. काँग्रेस व समाजवादी पक्ष यांच्यांत साम्य पुष्कळ आहे. जातिधर्म निरपेक्ष लोकशाहीवर दोघांचा विश्वास आहे. देशांतील इतर कोणत्याहि पक्षांपेक्षां काँग्रेस नि समाजवादी पक्षच एकमेकांस अधिक जवळचे आहेत. समाजवादी पक्ष राष्ट्र नि लोकशाहीच्या रक्षणार्थ प्रतिगामी नि जातीय शक्तीशीं लढायला सदैव सज्ज असेल. अशा कार्यांत काँग्रेसशीं सहकार्य आनंदानें करील. शब्दांपेक्षां कृतीनेंच हें आपण देशाला पटवूं. आपण काँग्रेसपासून दूर होत आहोंत. तेथें थोर थोर मित्र आहेत. वैयक्तिक भक्तिप्रेम नाहींसें नाहीं होणार. आपण बाहेर काम करीत असलों तरी त्यांचे हात आपण बळकट करूं. विरोधी पक्ष म्हणून काम करून त्यांचें ओझें हलकें करूं.

पाश्चिमात्यांकडे प्रतिपक्षीयास नामोहरम करतांना वाटेल त्या साधनांचा अवलंब करतात. केवळ असत्य प्रचार, लांचलुचपतीच नाहीं तर खुनांपर्यंत पाळया जातात. गेल्या कांहीं महिन्यांत अशा गोष्टी तिकडे झाल्या आहेत. प्राचीन काळापासून राजकारणांत नीतीला स्थान नाहीं असें म्हणणारा एक पक्ष आहे. परंतु सर्वंकष हुकुमशाह्या आल्यापासून, स्टॅलिन, हिटलर यांचीं तंत्रें आल्यापासून व्यापक प्रमाणावर या दुष्ट नीतीचा अवलंब केला जाऊं लागला. रशियांत स्टॅलिनी तंत्राचा विजय झाल्यापासून, मार्क्सिझममध्यें नैतिक मूल्यांस जागा नाहीं असें वाटूं लागलें आहे. परंतु मी स्पष्ट सांगतों कीं समाजवादी पक्ष तरी नीतीला परमोच्च जागा देईल, साधनांच्या शुद्धीला महत्त्व देईल. माणसाला नुसतें खायला प्यायला मिळून नाहीं भागणार; तो उदार, सुसंस्कृत, दयाळूहि हवा. चांगलें खायला प्यायला असलेल्या पशुसम मानवांचा समाजवाद आम्हांला नको.

महात्माजींनीं अनेक देणग्या राष्ट्रास, जगास दिल्या. परंतु नैतिक मूल्यांची साधनशुद्धीची त्यांची परम थोर देणगी होय. दिवसेंदिवस माझी खात्री पटत आहे कीं शुद्ध साधनांनींच थोर ध्येय मिळत असतें, मिळवावें. परवां मी नैतिक मूल्यांवर भर दिला म्हणून आजहि पुन्हां सांगतों कीं खुनी असत्यमय वागणा-

ज्यांच्या समाजांत, जेथें दया, सहिष्णुता, भ्रातृभाव, उदारता नाही, अशा समाजांत रहायला मला आवडणार नाहीं. मनुष्य जन्मतःच चांगला नसेल. परंतु शिक्षणानें तो होईल. म्हणून अन्नवस्त्राची जनतेची तरतूद करीत असतांना थोर नैतिक ध्येयांची स्फूर्तिहि आपणांजवळ असावी.

सत्तेचें राजकारण हाहि एक प्रश्न आहे. मला एवढेंच सांगायचें आहे कीं सत्तेच्या राजकारणाला महत्त्व असलें तरी सेवेचें कार्य अधिक महत्त्वाचें आहे. पक्षाला उद्यां सत्ताहि हातीं जनतेनें दिली तरी घ्यायला उभें राहिले पाहिजे. परंतु आपल्या पक्षांत सत्तेच्या राजकारणाला महत्त्व न येवो; सेवासंघटन करणाऱ्यांचीच अधिक प्रतिष्ठा राहो.

महात्मा गांधी आणि कार्ल मार्क्स दोघांचीहि इच्छा विशुद्ध लोकशाही निर्माण करण्याची होती. हळुहळु ही लोकशाहीच पूर्णत्वाला जाऊन सरकारहि नामशेष व्हावें असें त्यांना वाटे. म्हणून आपल्या पक्षांतसुद्धां अशींच माणसें तयार व्हावींत कीं जीं कोण कोणत्या अधिकारावर आहे हें पहात बसणारीं न होतां समाजसेवेचें कोठलें तरी क्षेत्र, मग तो व्यवसाय संघटनेचा असो कीं पंत-प्रधानकीचा असो–निवडलें कीं नाहीं तें पहातील. कार्यकर्त्यांच्या विविध चळवळीं-तूनच विशुद्ध लोकशाही अवतरेल. आपणांवर इतःपर सर्वांचीच नजर कडक रहाणार. म्हणून विधायक कार्याखेरीज इतर सर्व वावडें असें समजून आपण कामास लागूं तरच समाजवादी लोकशाहीचें ध्येय साध्य होईल.

'डाव्यांची एकजूट' याचाहि बराच 'पुकार' चालला आहे. या प्रश्नास दोन बाजू आहेत. (१) कम्युनिस्ट पक्षाशीं एकजूट व (२) इतर डाव्यांशीं एकजूट. कम्युनिस्टांशीं एकजूट करण्याच्या प्रश्नावर आपल्या पक्षाचें मत स्पष्ट आहे. जगांतील घटनांनीं तें आंखून दिलें आहे. कम्युनिस्ट रशियाचे हस्तक म्हणून वावरत आहेत हें झेकोस्लोव्हाकियामधील घटनांनीं स्पष्ट झालें आहे. परराष्ट्रीय पंचमस्तंभ्यांशीं एकजूट करणें शक्य तरी आहे काय? शिवाय 'लोकशाही'वर त्यांचा विश्वास नाहीं हें वेगळेंच. साधनांचें पावित्र्य ही चीजहि त्यांच्या गांवीं नाहीं. अतएव निष्कर्ष हा कीं कम्युनिस्टांशीं एकजूट कल्पनेंतहि शक्य नाहीं. इथें एक इषारा द्यावासा वाटतो तो हा कीं आपल्या लोकशाही वृत्तीचा फायदा घेऊन कम्युनिस्टांचे कांहीं बगलबच्चे

आपल्या पक्षांत शिरकाव करून घेऊन पार्टी फोडण्याचा त्यांचा मानस आहे म्हणून सावधान. थोडेसुद्धां फसूं नका.

पंधरा ऑगस्ट नंतर आपणाला नवहिंद घडवायचा आहे. कम्युनिस्टांना नवीन घडवायचें असें कांहीं नाहींच. सारें धोरण आगलावें. हिंद प्रबल झाला, एक तिसरी शक्ति म्हणून खडा झाला, तर मग रशियाचें काय होईल ही यांना भीति. कम्युनिस्टांचा प्रश्न निकालांतच निघाला. इतर पक्षांपैकीं प्रत्येकाचा कार्यक्रम व धोरण तपासून पहावें लागेल. उगाच 'डावे' पणाची चिठी कपाळास डकवणाऱ्या कोणाबरोबरहि सहाकार्य केलेंच पाहिजे असें नाहीं. देशांतील निरनिराळे डावे गट आणि कम्युनिस्ट यांच्यांत तसा फारसा फरक नाहींच.

कांहीं तर हिंदसरकारला 'केरेन्स्कीचें' सरकार म्हणतात. असल्या गटाशीं कसलें सहकार्य करणार?

आतां आपण स्वतंत्र पक्ष म्हणून बाहेर पडत आहोंत. पक्षाच्या मूलभूत ध्येयधोरणाशीं जुळणाऱ्याबरोबर आपण जरूर मिळतें घेऊं. ती व्यक्ति असो कीं गट असो.

शेवटीं सर्व कार्यकर्ते आपण मांडलेल्या सूचनांचा खोलवर विचार करतील अशी आशा प्रगट करून त्यानीं आपलें इतिवृत्त कथन संपविलें.



## समाजवाद हा एकच मार्ग

"आज आपल्या अधिवेशनाचा शेवटचा दिवस आहे. या अधिवेशनांत आपण अत्यंत महत्त्वाचे निर्णय घेतले आहेत. या महत्त्वाच्या निर्णयामुळें नाशिकचें हें अधिवेशन राष्ट्राच्या इतिहासांत अत्यंत संस्मरणीय ठरणार आहे. तुमच्यापैकीं ज्या असंख्य लोकांना आमच्या पक्षाबद्दल सहानुभूति वाटत आहे त्यांच्यासाठीं मी आज बोलत आहें.

समाजवादी पक्ष कॉंग्रेसमध्यें रहाणें कितपत योग्य आहे या प्रश्नावर गेले कित्येक महिने देशांत चर्चा होऊन राहिली आहे. अनेकांचीं अनेक मतें होतीं. पण कांहीं लोक असें मत व्यक्त करीत असत कीं, हा पक्ष जितक्या लौकर कॉंग्रेसमधून बाहेर पडेल तितकें चांगलें. आमचेंहि तसेंच मत होतें.

परंतु हें काम फार कठीण होतें. कॉंग्रेसवर आमचें गेल्या अनेक वर्षांपासून किती प्रेम होतें ! आम्हीं कॉंग्रेसमध्यें वाढलों होतों. राजकीय शिक्षण घेतलें होतें. आमचीं प्रिय माणसें, प्रिय पुढारी अजूनहि कॉंग्रेसमध्यें आहेत. अशा या प्रिय माणसांना व पक्षाला सोडून जाणें आम्हांला कमी का दुःखाचें वाटत होत ? आणि म्हणून आमचें मन मागें पुढें करीत होतें.

मध्यंतरीं काळ लोटतच होता. आणि आम्ही निश्चित निर्णय घेण्याचें ठरविलें. आज आम्ही कॉंग्रेसमधून बाहेर पडून स्वतंत्र पक्ष म्हणून काम करण्याचें नक्की ठरविलें आहे. हा निर्णय देशांतील अनेकांना पसंत पडणार नाहीं. त्यांना दुःख होईल, पण त्याला नाईलाज.

समाजवादी पक्ष अशी आशा बाळगून होता कीं, कॉंग्रेस जें स्वराज्य सत्यसृष्टींत आणील तें सर्वांना समाधानकारक असेल. तें किसान कामगारांचें असेल.

पण ही आशा फोल ठरली. स्वराज्यापूर्वी काँग्रेसनें जनतेला अनेक ठरावांमधून अभिवचनें दिलीं होतीं. पण तीं सर्व कागदावरच राहिलीं नाहींत काय? जीं कांहीं अभिवचनें पुरीं करण्याचा काँग्रेस प्रयत्न करीत आहे त्या बाबतींत काँग्रेस कल्पनेबाहेर सावकाश पावलें टाकीत आहे.

दिल्ली सरकार तर फारच धीमेपणानें कार्य करीत आहे. त्या सरकारांत आपले प्रिय पंडीतजी आहेत. पण त्यांना वेढलें आहे भांडवलदारी प्रवृत्तीच्या मंत्र्यांनीं! त्यांना स्वतःच्या इच्छेप्रमाणें क्वचितच वागतां येत असेल.

या प्रसंगीं मला चीन देशाची आठवण होत आहे सन् यत् सेन यांच्या नेतृत्वाखालीं चीनमध्यें एक मोठी क्रांति झाली. आपले महात्माजी तसेच त्यांचे सन् यत् सेन. परन्तु सन् यत् सेनचीं चीनसंबंधींचीं स्वप्नें सत्यसृष्टींत येऊं शकलीं नाहींत. त्यांचा आदर्शवाद हवेंतच राहिला.

पंडीत नेहरूप्रमाणें आज चिनी सरकार चँगच्या नेतृत्वाखालीं काम करीत आहे. पण तें सरकार संपूर्णपणें सडून गेलें आहे. तीच परिस्थिति हिंद सरकारची. या सरकारच्या नेतृत्वाखालीं राष्ट्र लांचलुचपतींत बुडून जात आहे.

ब्रिटिशांची राजवट संपल्यानंतर सरकारांत क्रांतिकारक बदल घडून येईल अशी जनतेची एक मोठी आकांक्षा होती. परंतु जनतेला पूर्वींच्या व आजच्या सरकारांत फरक तर कांहींच दिसत नाहीं.

भोंवताली दृष्टि टाका. सामान्य जनता पूर्वींच्याच दुःखांत बुडून गेलेली आहे. जोंपर्यंत ठराव कृतींत उतरविले जात नाहींत तोंपर्यंत काँग्रेसनें पास केलेल्या ठरावांना कसलीं किंमत?—आणि म्हणूनच आज सबंध राष्ट्रांतल्या परिस्थितींत संपूर्ण बदल घडवून आणण्याची वेळ आली आहे. उशीर केला तर फारच धोक्याचें ठरणार आहे. आज देश सर्व बाजूंनीं संकटांनीं वेढलेला आहे. पण त्यांतूनहि आपल्याला मार्ग काढायचा आहे. आणि तोहि अत्यंत आत्मविश्वासानें व सावधगिरीनें.

आज कामगारांना नेहरू सरकार सांगत आहे कीं उत्पादन वाढवा. तें देशाला आवश्यक आहे. हिंदी कामगारसुद्धां देशप्रेमी आहेत. ते उत्पादन वाढवून देशाच्या प्रगतीला मदत करण्यास नाखूष आहेत असें नाहीं. पण त्यांना सरकारनें कांहीं अभिवचनें दिलीं पाहिजेत. त्यांनीं केलेल्या कष्टांबद्दल त्यांना

मोबदला मिळाला पाहिजे. त्या कष्टांचे बक्षीस भांडवलदारांना मिळणार असेल तर काय उपयोग ?

याकरितांच आज देशांत परिवर्तनाची आवश्यकता उत्पन्न होऊन बसली आहे. आज एक नवें जग आपणाला निर्माण करावयाचें आहे. हें नवें जग निर्माण होईल, या नव्या जगांत आपल्याला रहातां येईल. असा विश्वास जर हिंदी कामगाराला वाटला तर तो कांहीं काळ अर्धपोटी राहूनहि देशांतील उत्पादनाला हातभार लावील

पण सरकार कचरतें आहे. भांडवलदार असहकार करतील म्हणून. पण असें का सरकार चालवावयाचें असतें ? याहि कठीण परिस्थितींतून सरकारनें मार्ग काढला पाहिजे. भांडवलदारांचा नाश झालाच पाहिजे.

हें नवपरिवर्तन घडवून आणण्यासाठींच आम्हीं आजचें नवीन धोरण आंखीत आहोंत. आम्हांला समाजवादी सरकार स्थापावयाचें आहे. आज पंधरा ऑगस्टनंतरची कॉंग्रेस मृतवत् झाली आहे.

कांहीं वर्षांपूर्वी आम्हांला असें सांगण्यांत येत असे कीं स्वातंत्र्यप्राप्तीनंतर कॉंग्रेसचा अंत करण्यांत येईल. महात्माजींनीसुद्धां आपल्या राजकीय मृत्युपत्रांत कॉंग्रेसचें लोकसेवक संघांत रूपांतर व्हावें असे लिहिलें होतें. कॉंग्रेसनें राजकारणापासून अलिप्त रहावें असें लिहिलें होतें. परंतु ही त्यांची इच्छा ऑल-इंडिया कॉंग्रेस कमिटीमध्यें संपूर्णतः डावलण्यांत आली. त्यांचें भावि कॉंग्रेस-संबंधींचें स्वरूप मोडक्यातोडक्या रूपांत लोकांपुढें आज कॉंग्रेसनें ठेविलें आहे.

महात्माजी तर गेले. परन्तु त्यांची समाजांतील आर्थिक परिस्थितिविषयींची कल्पना कोठें आहे ? कॉंग्रेस तर त्या कल्पनेपासून कधींच दूर सरकली आहे. आम्ही मात्र महात्माजींच्या तत्त्वांच्या जास्तींत जास्त जवळ आहोंत. महात्माजींचा संदेश आम्हींच कृतींत उतरविण्याचा प्रयत्न करीत आहोंत.

कॉंग्रेसच्या नांवाचा फायदा उठविण्याचा आमचा मुळींच हेतू नाहीं. आम्हीं प्रामाणिकपणें आमचें कार्य पुढें ढकलविण्याची इच्छा बाळगीत आहोंत. लोकहो, तुम्हीं आमचे विचार समजून घेण्याचा प्रयत्न करा, लोकांनाहि समजावून सांगा.

कॉंग्रेसमधील कांहीं लोकांना आमच्या बाहेर पडण्यानें दुःख होईल. वर्तमानपत्रेंहि आमच्याविरुद्ध गैरसमज पसरवितील. आमच्याजवळ वृत्तपत्रें नाहींत.

आमचा पक्ष गरीबांचा आहे. आणि म्हणून विरोधी प्रचारापासून तुम्हीं सावधगिरी बाळगा.

लोकांच्या हितासाठीच एक 'नई दुनिया' निर्माण करण्यासाठीं आम्हीं हा वेगळा पक्ष स्थापीत आहोंत. आज काळाची तशी मागणी आहे. आम्ही ती मागणी पुरी करीत आहोंत. भविष्यकाळ तर अत्यंत अडचणींचा आहे. परंतु तुमच्या मदतीनें आम्हीं आत्मविश्वासानें पाऊलें पुढें टाकूं.

किसान, कामगार, विद्यार्थी, मध्यमवर्गीय, नाडलेले, वगैरे सर्वच लोक हा पक्ष स्वतःचा मानीत. राष्ट्र आमच्या भावना व विचार समजावून घेवो.

आज राष्ट्रापुढें समाजवादाचा एकच मार्ग आहे. भांडवलदारांचे दिवस आतां भरलेच आहेत.

समाजवादी पक्ष तुम्हां सर्वांना या झेंड्याखालीं बोलावीत आहे. आपण सर्व मिळून एक जातिविरहित, आर्थिक समानता असलेला, ज्या समाजांत गरीबांतल्या गरीब इसमाला पुरेसे कपडे व अन्न मिळत आहे, व ज्या समाजांत प्रत्येकाला स्वतःच्या विकासाला संपूर्ण वाव आहे, असा समाज निर्माण करण्याचा प्रयत्न करूं या.



## समाजवादी पक्षाची परराष्ट्रीय दृष्टी

समाजवादी पक्षाचें परराष्ट्रीय धोरण काय असावें, आंतरराष्ट्रीय दृष्टि कशी असावी, यासंबंधीचा महत्त्वाचा ठराव डॉ. लोहिया यानीं मांडला. त्यांच्या नि इतरांच्या भाषणांचा आशय पुढें आहे.

जगांत आज दोन गट आहेत. अमेरिकेच्या बाजूचा गट आणि रशियाच्या बाजूचा गट. हिंदुस्थाननें या दोहोंत निवड करणें चूक ठरेल. अमेरिकेचा गटहि तितका ध्येयवादी नाहीं. रशियाचा मार्ग लोकशाहीचा नाहीं. एका गटाला भांडवलशाही रंग आहे तर दुसऱ्या गटाला हुकूमशाही रंग आहे. हिंदुस्थाननें काय करावें? या दोघांच्या तंबूंत शिरण्याऐवजी हिंदुस्थाननें स्वतंत्र असा तिसरा तंबू उभारावा. आपला ध्येयवादी डेरा अलग करावा. परंतु असें स्वतंत्र धोरण, नवसृष्टि निर्माण करण्याचें धोरण आज काँग्रेस अवलंबीत नाहीं. युनोमध्यें स्वतंत्र ध्येयाचें दर्शन हिंद प्रतिनिधि करूं शकत नाहींत. एक नवी रोशनी जगासमोर हिंदसरकार ठेवीत आहे असें दिसत नाहीं. १५ ऑगस्टनंतर जरी महान् आपत्ति ओढवल्या असल्या तरी हिंद सरकारनें जर जमीनदारी नष्ट केली असती, कारखानदारी राष्ट्रीय केली असती, कामगारांत नवआशा, विश्वास निर्माण केला असता तर हिंदुस्थानकडे जगांतील छोट्या राष्ट्रांनीं निराळ्या आदरपूर्वक दृष्टीनें पाहिलें असतें. आशियांतहि ब्रह्मदेश, इंडोचायना, सिलोन, अफगाणिस्थान आदि छोटीं छोटीं राष्ट्रें आहेत. त्यांना साम्राज्याची लालसा नाहीं. त्यांना स्वतःची वाढ करून घ्यायची आहे. त्यांनीं कोणाकडे बघावें ? हिंदुस्थाननें जर किसान कामगारांचें राज्य आणण्याचें उत्कटपणें सुरु केलें असतें तर अफगाणिस्थानांतील गरीब जनतेचें लक्ष हिंदकडे आलें असतें. रशियाचा आक्रमक, हिंसक, हुकुमशाही कम्युनिझमहि नको. अमेरिकेचें सोन्याचें राजकारण नको आपापल्या देशांत समाजवाद आणून इतर राष्ट्रांना एक नवीन प्रकाश देणें हें तिसऱ्या तंबूतील राष्ट्राचें काम आहे. परंतु हा तिसरा तंबू

हिंदुस्थानच उभारूं शकेल. ३० कोटींचें हें महान् राष्ट्र आहे. आशियांतील भागांत मध्यवर्ती आहे. महात्माजींनी एक नैतिक प्रकाश येथून दिला आहे. जुने सांस्कृतिक संबंध आहेत. म्हणून अमेरिका नि रशिया यांच्या घातकी मार्गाकडे न जातां इकडे या, जगाला तारणारा एक नवीन प्रकाश, एक नवीन मार्ग आपण निर्मूं असें हिंदुस्थानच जगांतील छोट्या राष्ट्रांना, आशियाई राष्ट्रांना म्हणूं शकेल.

हिंदुस्थानला जगांतील राजकारणांत ध्येयवादी, उदात्त असा तिसरा आदर्श ठेवायचा असेल तर दोन प्रकारचें कार्य करावें लागेल. आर्थिक प्रश्न समाजवादी पद्धतीनें सोडवून ती विषमता दूर करणें. आणि दुसरी गोष्ट म्हणजे धर्म-जातिनिरपेक्ष राष्ट्र उभें करणें. आर्थिक विषमता आणि धार्मिक, जातीय, सामाजिक विषमता दोन्ही नष्ट करायच्या आहेत. आर्थिक विषमतेनें आपण ग्रस्त आहोंत, तद्वत् जातीय नि धार्मिक विषमतेनेंहि. महात्माजी या दोन्ही विषमतांशीं झगडत होते. पंडित जवाहरलाल परवां वर्धा–नागपूरला म्हणाले, “जातीयवाद नष्ट करायला हवा. एक धर्म, एक जात असें घेऊन चालणार नाहीं. हिंदी बना, एवढेंच नव्हे तर जगाचे नागरिक बना.” पंडितजींचे विचार हिंदुस्थानभर कोण नेणार? कोणतीं प्रान्तिक सरकारें, कोणत्या कॉंग्रेस कमिट्या, कोणतीं वृत्तपत्रें या दृष्टीवर जोर देत आहेत? अशी दृष्टि सर्वांना यावी म्हणून सारी शक्ति कोण ओतीत आहेत?

हिंदुस्थानांत हिंदु-मुसलमान भेद पराकोटीला गेले आहेत. तद्वत् इंडोनेशियांतहि थोडें थोडें होऊं पहात आहे. ते लोक शर्थीनें उचांजवळ लढले. परंतु आमचा अध्यक्ष नेहमीं मुसलमानच हवा असें ते म्हणत आहेत. या गोष्टींना, प्रवृत्तींना कोण आळा घालणार? हिंदुस्थानांत हिंदु, मुसलमान, खिश्चन, शीख, पारशी असा भेद नाहीं; आम्ही सारे हिंदी आहोंत. ही ध्येयात्मकता आम्ही सत्यसृष्टींत आणली पाहिजे. अशा रीतीनें आर्थिक विषमता आपण दूर करूं तरच तिसरा पक्ष म्हणून, ध्येयवादी पक्ष म्हणून इतर राष्ट्रें आपणांकडे आदरानें बघतील.

समाजवादी पक्षांनींहि आपलें जागतिक संघटन करायला हवें. आज कम्युनिस्ट इंटरनॅशनल कागदोपत्रीं नसलें तरी तें प्रत्यक्षांत कार्य करीतच आहे. युरोपांत त्या त्या देशांतील कम्युनिस्ट एकाच तंत्रानें वागतात. आशियांतहि त्यांचें एक संघटन होणार आहे. आपण एकटे नाहीं. आपल्या पाठीशीं जगांतील राष्ट्रांतील संघटना आहेत असा हिंदी कम्युनिस्टांस सदैव आधार असतो. तिकडे रशिया आहे, इतर देशांतहि आम्ही प्रभावी होत आहोंत, असें त्यांना

बळ असतें. म्हणून त्यांचा धीर अदम्य असतो. समाजवादी पक्षानेंहि असें जागतिक संघटन करायला हवें. अनेक राष्ट्रांत समाजवादी पक्ष आहेत. ब्रह्मदेशांत नव्या निवडणुकींत तोच पक्ष बहुमतानें निवडून येईल. सर्व देशांत असे पक्ष आहेत. अशा जागतिक संघटना केल्या तर आज हिंदी समाजवादी पक्षाच्या कोणत्याहि मताला हिंदी सरकार, कॉंग्रेस पक्ष किंमत देत नाहीं, तसें उद्यां होणार नाहीं. जगांतील समाजवादी पक्ष निरनिराळ्या राष्ट्रांत लोकशाही समाजवाद यावा, वैयक्तिक स्वातंत्र्य नि समाजवाद यांचा मेळ घातला जावा, हुकुमशाही नसावी, नैतिक मूल्यें मानलीं जावींत, त्या त्या राष्ट्रांचें स्वातंत्र्य सुरक्षित राहून परस्पर सांस्कृतिक नि वैचारिक सहकार्य असावें, अशा प्रकारचा जागतिक राष्ट्रांचा एक समाजवादी भ्रातृसंघ उभारण्याचें कार्य करूं शकेल. असा हा थोर ध्येयांचा तिसरा कँप, तिसरा तंबू हिंदुस्थान स्थापूं शकेल. आपण ही दृष्टि ठेवून वागूं या, प्रयत्न करूं या." अशा आशयाचें लोहियांचें भाषण झालें. अशोक मेहता बोलतांना म्हणाले "अशा तिसऱ्या पक्षाला सर्वांत मोठा धोका रशियाचा आहे. रशिया ट्रूमनला तितका विरोध करणार नाहीं, जितका ॲटली, ब्लूम यांना करील. कारण लोकशाही समाजवाद लोकांना आकृष्ट करील, म्हणून तो ते आधीं नष्ट करूं पहातील. या गोष्टीची आपण जाणीव ठेवली पाहिजे." जाहीर सभेंत बोलतांना जयप्रकाश म्हणाले. "माणसें व्यक्तिशः चांगलीं असून भागत नाहीं. त्यांच्याभोंवतीं कोण सूत्रधार तें बघावें लागतें. चीनचा चँग कै शेक व्यक्तिशः त्यागी, ध्येयवादी असेल. परंतु त्याच्या भोंवतालचे सारे लांचलुचपती, वशिले, भांडवलशाही वृत्ति यांनीं बरबटलेले आहेत. आपल्याकडे पंडितजींसारखीं थोर माणसें सरकारांत आहेत, त्यांचे हात निर्मळ आहेत. परंतु त्यांच्याभोंवतीं पुंजीपति जाळीं गुंफीत आहेत. षण्मुखसारखी मंडळी अर्थमंत्री होऊन भांडवलदारांस सांभाळीत आहेत. कालपर्यंत ज्यांनीं कॉंग्रेसला शिव्या दिल्या ते खादी वापरून आज दिल्लीला मंत्री होत आहेत. अशानें देशांत वा परदेशांत प्रतिष्ठा कशी वाढेल? अमेरिका, रशिया, यांच्यापेक्षां हिंदुस्थान स्वदेशांत आणि परराष्ट्रांच्यासमोर एक निराळा आदर्श ठेवून वागत आहे, तेथें नवीन रोशनी देत आहे, असें दिसलें पाहिजे. त्यांनीं हिंदुस्थानच्या तिसऱ्या तंबूत दाखल व्हावें असें तुम्हां आम्हांस वाटत असेल तर कॉंग्रेसनें निराळीं पाऊलें टाकायला हवींत. तशीं तीं टाकलींत नाहीं असें दिसत असल्यामुळेंच समाजवादी पक्ष अलग होत आहे." लोहिया, अशोक, सीन्हा, जयप्रकाश या सर्वांच्या उद्गारांवरून हिंदचें परराष्ट्रीय राजकारण कसें असावें तें वरील संकल्पित सारांशावरून लक्षांत येईल.

